

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)


महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
राज्य मराठी विकास संस्था
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com



# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.



अनुक्रमणिका

नवयुग स्टार गीता निजामी



: सहकारी :
एस्. जी. आजगांवकर
एम्. बी. सामंत

: संपादक :
रॉय किणीकर  चित्रकार दलाल

: मुद्रक :
रघुनाथ दिपाजी देसाई
न्यू भारत प्रिंटिंग प्रेस,
केळेवाडी, गिरगांव. मुंबई ४.



: प्रकाशक :
दत्तात्रय गणेश जोशी
५३३ सदाशिव, पुणे.

: अनुक्रम :



अनुक्रमणिका

र. गो. सरदेसाई
रं. कृ. चिंचलीकर
चिं. वि. जोशी
कवि यशवन्त
ना. ह. आपटे
रघुवीर सामंत
राजा बढे
त्र्यं. वि. पर्वते
द. शं. कुलकर्णी
'मनमोहन'
पु. भा. भावे
ग. ल. ठोकळ
मनोहर केळकर
ज. नी. कर्वे
रा. प्र. कानिटकर
द. वा. केळकर
श्री. म. वर्दे
मेघदूत
वि. गं. देशपांडे
प्रभाकर पाध्ये
दत्तु बांदेकर
डब्ल्यू. एन्. भट
श्री. स. दाभोलकर
पु. य. देशपांडे
आणि
शेवटचें पान





# आदि स्त्री

कुसुमाग्रज—

माझी सृजनशक्ति—
आमावस्येचें आकाश नक्षत्रांनी मोहरून यावें
त्याप्रमाणें या विराट् भूगोलावर सर्वत्र उमललेली
मानवता—
केवळ माझ्या उदरांतून निर्माण झाली आहे !
मी मानवाची माता आहे
आणि त्याची कांताहि आहे !
या डोळ्यांत बालकावर अमृताचा अभिषेक करणारी
वत्सलता आहे !
आणि युवकांवर सोमरसाचें सिंचन करणारी
कामनाहि आहे !
माझ्या अधरावरचीं अंगाईगीतें हीं चिमुकलीं पांखरें
टिपून घेतात
आणि ते उन्मत्त पशू—
त्यांत दडलेल्या प्रणयगीतांसाठीं त्यांवर दन्तप्रहार करतात.
शैशवाचे क्षुधार्त ओंठ
आणि यौवनाचे कामार्त हात
माझ्या स्तनांचा शोध घेतात !
बालवयांत संरक्षणासाठीं, तारुण्यांत सुखासाठीं
मानव माझ्या कटीला विळखा घालतो.
मी मानवाची माता आहे कान्ता आहे—
माझी माताहि मीच आहे !

माझें नांव कोमलता आहे.
नंदनवनांतील एक अविनाशी सुमन देवदूतांनीं पृथ्वीला
आणून दिलें.
त्या सुमनाचें नांव स्त्री आहे.
उधाणलेले महासागर आणि उफाळलेले दावानल,
आकाशांत गेलेले विक्राळ पहाड आणि क्षितिजापर्यंत
पसरलेलीं कठोर वाळवंटें
माध्यान्हींचा दाहक प्रकाश आणि मध्यरात्रींचा अथांग
अंधःकार
सुरेल गीतस्वरांप्रमाणें मी या सर्वांतून हासतनाचत
संचार करतें
आणि त्या कठोरतेवर—
मोत्यांची आणि पुष्पांची, स्नेहाची आणि स्मितांची,
जीवनाची आणि चांदण्याची पखरण करतें.
मानवतेच्या महावस्त्रांत
दयेचे, प्रेमाचे, करुणेचे जरतारी धागे
अनन्त कालापासून मीच विणीत आहे.

( पान २१९ वर चालू )









—आचार्य दीक्षा काळेलकर

कोणत्याहि देशांत पहा; राष्ट्रगीतें लिहिणारे पुष्कळ असतात. त्यापैकीं कांहीं गीतें तर फारच उच्च दर्जाचीहि असतात; पण राष्ट्रमान्य गीत होण्याचें भाग्य कांहीं प्रत्येक गीताच्या वाट्यास येत नसतें, तें पद प्राप्त करण्यास विशेष भाग्य हवें असतें, त्या गीताच्या जन्मकाळचा अथवा उत्सृजन-काळचा मुहूर्तहि चांगला असावा लागतो.

'वंदेमातरम्' गीत 'आनंदमठ' या राष्ट्रभक्तिप्रेरक कादंबरींत नसतें तर कदाचित् बंगाली लोकांनींहि 'राष्ट्रगीत' म्हणून त्या गीताचा स्वीकार केला नसता. रवीन्द्रनाथांसारख्यांनीं आपल्या कोकिलकंठानें त्या गीताचा प्रचार केला नसता तर तें गीत इतकें लोकप्रिय झालें नसतें. वंगभंगाच्या अद्वितीय आन्दोलनाच्या द्वारें जर त्याचा प्रसार झाला नसता तर त्या गीताला अखिल भारतीय मान्यताहि-कदाचित् लाभली नसती! पण या गीताच्या नशीबीं या साऱ्या गोष्टी होत्या म्हणून तर 'वंदेमातरम्' गीत आसेतुहिमाचल 'राष्ट्रगीत' झालें! सर्व प्रांतांतील सर्व जातींच्या व सर्व धर्मांच्या लोकांनीं या गीताला आपलेसें केलें. प्रत्येक भाषेंत या गीताचे सुंदर अनुवाद झाले. राष्ट्रहृदयानें हेंच मूळगीत वैदिक मंत्राप्रमाणें जवळजवळ जसेंच्या तसें मान्य केलें.

ऐतिहासिक दृष्टीनें पाहिलें तर ही केवळ एक आकस्मिक घटनाच होती. पण श्रद्धेच्या दृष्टीनें पाहिलें तर हें सर्व यथा-योग्यच झालेसें वाटतें.

गुलाम भारताचें राष्ट्रगीत लिहिणारा कवि सरकारी नोकरीच्या शृंखलांनीं जखडलेला एक रायबहादुरच निघाला! हातांपायांत शृंखला असूनहि त्या शृंखलांना या राष्ट्रकवींच्या हृदयानें मानलें नाहीं—जुमानलें नाहीं! पराभूत भारताचा आत्मा अजर आहे —अमर आहे—एवढें त्याला माहित होतें. दुःखिनी जन्म-भूमीला तो 'बहुबलधारिणी' व 'तारिणी' च्या स्वरूपांत पाहूं शकत होता. दबलेल्या व भीतिग्रस्त झालेल्या राष्ट्राला स्वातंत्र्याचा संदेश ऐतिहासिक रूपकाच्या द्वारेंच देणें त्याला शक्य होतें. आयर्लंडच्या राष्ट्रकवींना आपल्या देशभक्तिपर गीतांत आयर्लंडचें नांव देखील घालतां येत नव्हतें!

बंकिमबाबूंना 'नवरात्री'च्या दुर्गेची उपासना दाखवायची नव्हती; 'सुजला सुफला व मलयजशीतला' 'शस्य श्यामला' 'बहुबल धारिणी' 'तारिणी' अशा भारतमातेची उपासना त्यांना दाखवायची होती. जेव्हां त्यांनीं 'सप्तकोटी' कंठांचें स्मरण केलें तेव्हां त्यांत बंगालचे हिंदु—मुसलमान, व ख्रिस्ती

वंदे मातरम्

ब्राह्मी, सारेच्या सारे आले ! आणि भारतानें जेव्हां हें गीत मानलें तेव्हां या देशांत देवीपूजक शाक्तांची संख्या किती आहे याचा विचार नाहीं केला ! स्वातंत्र्याची आकांक्षा बाळगणाऱ्या सर्व भारतवासीयांचा हिशेब करून 'सप्तकोटी'च्या जागीं 'त्रिंशकोटी' चा हिशेब राष्ट्रानें ठेऊन दिला !

ज्यानें हा राष्ट्रमंत्र सर्वांत आधीं पाहिला, ज्यानें हा राष्ट्रधर्म सर्वांत आधीं रुजविला, ज्यानें मातीच्या, धातूंच्या मूर्तींच्या जागीं ही भावमय मूर्ती प्रत्येक भारतीयाच्या हृदयमंदिरांत स्थापन केली, तो खरोखरीच एक क्रांतिदर्शी ऋषी होता असेंच ठरतें. बंकिमचंद्र चट्टोपाध्याय यांच्या काळीं पुष्कळ साहित्यिक झाले; त्यांचा शताद्धिउत्सव वंगवासी जरूर पाळीत असतील ! वंगदेश हा आमच्याच मातृभूमीचा एक भाग आहे व वंगभाषा ही आमची स्वकीय भाषा आहे म्हणून आम्हीहि त्यांची शताद्धि पाळूं,पण बंकिम बाबूंची शताद्धि एका साहित्यिकाची शताद्धि नव्हे; राष्ट्रधर्माच्या ऋषीची शताद्धि आहे ती ! वंदेमातरम् गीत बंगाली भाषेंत आहे म्हणून तिला परकें मानण्यापेक्षां आमचें राष्ट्रगीत ज्या भाषेंत आहे, ती भाषाच आपण आत्मसात् करूं. हिंदी भाषा राष्ट्रभाषा म्हणून आमच्या मनांत जो आदर आहे तोच आदर या राष्ट्रगीतामुळें बंगाली भाषेविषयींहि आहे. हिंदी आमची राष्ट्रभाषा आहे तर बंगाली आमच्या राष्ट्रगीताची भाषा आहे. दोन्ही भाषांकडे आपण विशेष आदरभावानें पाहूं !

महाराष्ट्रांत 'वंदेमातरम्' चा एक सरस संस्कृत अनुवाद झालेला आहे. आमच्या लहानपणीं आम्ही तो अनुवादहि गात असूं. पण राष्ट्रीय महत्वाच्या प्रसंगीं आपण नेहमींच बंकिम बाबूंचें गीतच गायिलेलें आहे. मन्त्रावर भाष्यें लिहिलीं जातात, तीं चालतात; पण मूळ मंत्राच्या जागीं कांहीं कोणी त्याचा अनुवाद चालवीत नाहीं ! कुराणाच्या जागीं त्याचें भाषांतर घेतां येत नाहीं. वंदेमातरम्चें माहात्म्य हें असें आहे. दुसरें कोणतेंहि गीत त्या गीताचें स्थान घेऊं शकत नाहीं—शकणार नाहीं !

राष्ट्रहृदयाला जीं कांहीं थोडीं गीतें रुचलीं आहेत त्यांत परलोकवासी सर मुहम्मद इकबाल यांचें "सारे जहाँसे अच्छा हिंदोस्तां हमारा" हें गीतहि आहे. ऐतिहासिक दृष्टीनें पाहिलें तर एका निराळ्या देशांतून आपला 'कारवाँ' घेऊन या देशांत येऊन वसती करणाऱ्या लोकांचें तें गीत आहे. पण राष्ट्रहृदय अशा प्रकारचें ऐतिहासिक संशोधन करीत बसत नाहीं. राष्ट्राला—भिन्न भिन्न मतमतांमुळें भग्नहृदय झालेल्या राष्ट्राला जो मंत्र पाहिजयाचा होता, जें आश्वासन हवें होतें, तो मंत्र, तें आश्वासन या गीतांत राष्ट्राला मिळालें !

मजहब नहीं सिखाता
आपसमें बैर रखना
हिन्दी है हम
वतन है हिन्दोस्ताँ हमारा !

या कवितेचा जनक, हिंदुस्थानचा हा बुलबुल, आपलें घरटें सोडून परलोकीं जाऊन अगदीं थोडींच वर्षें झालीं. आपल्या काव्यसमृद्धिमुळें इकबाल जगांत प्रसिद्ध आहेतच; पण त्यांच्या पुण्यतिथीच्या दिवशीं आंसवांबरोबर त्यांच्या स्मृतीला पुष्पांजली अर्पण करतांना साऱ्या राष्ट्रांच्या हृदयांत इकबालचें हें गीत व त्या गीतांतीलहि या दोनच ओळी स्फुरत होत्या, निनादत होत्या ! "खाके वतनका मुझको हर जर्रा देवता है—" हे शब्द मातृभूमीच्या उत्कट भक्तीनें ओथंबलेले आहेत. या भक्तीसाठींच राष्ट्रानें इकबालला श्रद्धांजली अर्पण केली—यापुढेंहि प्रतिवर्षी करीत राहील !

भारताच्या सुदैवानें, त्याच्या भाग्य विधात्यानें आणखीहि एक हिमालयासारखें गीत दिलें आहे. उत्तुंग भावनांच्याच दृष्टीनें पाहिलें तर "जनगणमन अधिनायक जय हे" हें कवीन्द्र रवीन्द्रनाथ ठाकुरांचें गीत आमच्या राष्ट्रगीतांत गौरीशंकरासारखें आहे. या गीतांत, रात्रीची पहांट झाली आहे, रवीचा उदय आपणाला दिसत आहे, राजराजेश्वराच्या स्वागताच्या तयारींत आपण आहों, व युद्धाच्या प्रारंभींच अंतिम विजयाचें स्पष्ट दर्शन आपणांस होत आहे ! या भारतगीतांत हिंदुस्थानाचा पूर्वेतिहास, वर्तमानकालाची परिस्थिति आणि भविष्यकालाविषयींच्या आकांक्षा पूर्णपणें प्रतिबिंबित तर आहेतच; पण याहूनहि विशेष म्हणजे, कवीनें 'हे मोर चित्त–पुण्यतीर्थे' या आपल्या गीतांत भारताचें जें मिशन (Mission) चित्रित केलें आहे, तेंच या गीतांत स्पष्टपणें घोषित झालें आहे. या दोन गीतासाठींहि आपण 'शाश्वतीः समा' वंगभाषेशीं कृतज्ञ राहूं—अनुरक्त राहूं.

पण यासाठीं आपण बंकिम बाबूंचें उपकार मानले पाहिजेत; कारण त्यांच्याच परंपरेनें आपणाला गुरुदेव ठाकुर मिळाले. ज्यानीं आपल्या स्वर्गवासाच्या शंभर वर्षांच्या आंतच राष्ट्राला पूर्ण स्वराज्याच्या यात्रेस प्रेरित केलें एवढेंच नव्हे तर दुरून कां होईना पण स्वातंत्र्यलक्ष्मीच्या शिखराचें दर्शन करविलें—त्या बंकिम बाबूंचा हा महिमा आहे—बंकिम बाबूंचाच हा विजय आहे !

# तरुणांनो, अविचारी व्हा !

—आचार्य अत्रे

सत्तावीस अठ्ठावीस वर्षांपूर्वी पुण्याच्या कॉलेजांतील आम्ही कांहीं तरुण विद्यार्थ्यांनीं 'यंग मेन्स यूनियन' नांवाचें एक लहानसें मंडळ स्थापन केलें होतें. हेतू असा होता कीं आम्हां तरुणांच्या हातून समाजाची कांहीं तरी सेवा घडावी, कांहीं तरी कार्य व्हावें. काय करावें आणि कसें करावें याबद्दलच्या आमच्या कल्पना पुष्कळशा अस्पष्ट आणि संदिग्ध होत्या. तथापि कांहीं तरी करून दाखविण्याची इच्छा मात्र अंतःकरणांत प्रबळ होती. अशाच मानसिक धडपडींत वर्ष निघून गेलें. नवीन वर्षाचा प्रारंभ **अच्युतराव कोल्हटकरांच्या** अध्यक्षतेखालीं करावयाचें आम्ही ठरविलें. सकाळची वेळ होती. आमच्या मंडळाचे कार्यालय होते मोरोबा दादांच्या ऐतिहासिक वाड्यामध्यें. तिसऱ्या मजल्याच्या गच्चीवर आम्ही पाच पंचवीस तरुण एकत्र जमलों होतों. अच्युतराव म्हणजे त्यावेळीं एक जळजळीत निखारा होता. श्रोते अतिशय थोडे आहेत किंवा ते फारच तरुण आहेत इकडे त्यांनीं अजिबात दुर्लक्ष्य केलें आणि आपल्या वक्तृत्वाची तोफ धडाडून डागली. ते गरजले, तरुणानों, मला तुम्हांला एकच विनंति करावयाची आहे कीं कृपा करून कसलाही विचार करूं नका ! विचार म्हाताऱ्यांनीं करावा. डोकीं म्हाताऱ्यांनीं खाजवावींत. अगदीं रक्त येईपर्यंत खाजवावींत, माझी त्याला कांहीं हरकत नाहीं. पण तरुणानें मात्र विचार करीत बसूं नये. तरुणांचा विचार त्यांच्या रक्तांत असतो. तरुणांचे सामर्थ्य त्यांच्या मनगटांत असते. तरुणांना डोक्यानें निराळा विचार करावयाची कांहीं एक जरूरी नाहीं. तरुणांनीं अविचार करावा ! जगामध्यें ज्या मोठमोठ्या गोष्टी घडल्या त्या विचारामधून निर्माण झाल्या नाहींत ! क्रांतिचा जन्म विचारामधून होत नाहीं तर अविचारामधून होतो ! शिवाजी महाराज हॅम्लेटप्रमाणें विचार करीत बसले नाहींत. त्यांनीं भोंवतालची परिस्थिती पाहिली आणि त्यांचें डोकें फिरलें ! आणि त्यांनीं त्यावेळीं जो अविचार केला त्यामधून मराठ्यांचे स्वराज्य जन्माला आलें ! म्हणून तरुणांनीं डोकीं फिरवून घेतलीं पाहिजेत ! तरुणांनीं अविचार केला पाहिजे ! फासावर चढावयाची तरुणांची तयारी पाहिजे ! बंदूकीच्या गोळ्या छातीवर झेलावयाची तरुणांची सिद्धता असावयाला पाहिजे ! तरच त्यांच्या हातून खरें कार्य होईल आणि देशाला स्वातंत्र्य मिळेल !" इतकीं वर्षें झालीं तरी अच्युतरावांचें तें अविचाराचें तेजस्वी स्तोत्र अद्यापिही माझ्या स्मरणांत घुमत आहे. अविचाराचा अर्थ प्रथम त्यावेळीं मला कळून आला. अविचार म्हणजे कुविचार नव्हे. अविचार म्हणजे अत्याचार नव्हे. अविचार म्हणजे वेडावाकडा विचार किंवा घाईघाईनें केलेला विचार नव्हे. अविचार म्हणजे विचार मुळीं करावयाचाच नाहीं. विचार करण्याचा तेथें प्रश्नच निर्माण होत नाहीं. अविचार म्हणजे जिवंत स्फूर्ति किंवा ज्वलन्त प्रेरणा. अविचार म्हणजे अंतःकरणांतला आवाज. तो ऐकावयाचा आणि कड्याकरून दरींत उडी फेकावयाची. अहाहा, तरुणांना विचार करतां येत नाहीं, तरुण अविचारी असतात हें तरुणांचें केवढें जबरदस्त सामर्थ्य आहे. ९ ऑगष्ट १९४२ रोजीं देशाचे आवडते पुढारी सरकारनें बलात्कारानें जेव्हां कारागृहांत कोंडले त्यावेळीं देशांतील स्वातंत्र्यप्रेमी तरुण पुण्याच्या 'डेक्कन क्लबां'तील सभासदांप्रमाणें आरामखुर्चीवर आपापली डोकीं खाजवीत बसले असते तर ? तर 'नऊ ऑगष्ट' चें क्रांतिकारक आंदोलन काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत एकाद्या विद्युल्लतेच्या चमकाऱ्याप्रमाणें या देशांत कडाडून गेलें असतें काय ? छे, छे, शक्यच नाहीं ! नऊ ऑगष्ट रोजीं देशांतील असंख्य तरुणांनीं अविचार केला म्हणून राष्ट्र आज जिवंत राहिलें, सरकारी दडपशाहीच्या टांचाखालीं तें चिरडलें गेलें नाहीं, जपान जर्मनीप्रमाणें तें दोस्तांच्या युद्धयंत्रामुळें जमीनदोस्त होऊं शकलें नाहीं ! 'नऊ ऑगस्ट' चा तेजस्वी अविचार देशामध्यें घडून आला म्हणूनच आज सारें राष्ट्र एकमुखानें ओरडून परकी राजसत्तेला सांगू शकत आहे कीं, "आम्हांला स्वातंत्र्य द्या; नाहींतर देशामधून चालते व्हा !" सातारच्यामधील शेकडों तरुणांनीं अविचार केला म्हणूनच राष्ट्रांतील स्वातंत्र्यप्रेमाचा अग्नि दडपशाहीच्या झंझावातामुळें आजपर्यंत विझू शकला नाहीं ! उलट तो शतपटीनें अधिकच भडकून उठलेला आहे. आजच्या तरुणांच्या अविचारामधूनच उद्यांचें राष्ट्राचें स्वातंत्र्य उदयास येणार आहे. म्हणून अच्युतराव कोल्हटकरांनीं आम्हांला दोन तपापूर्वी देऊन ठेवलेला अविचाराचा ओजस्वी संदेश '**दीपावली**' च्या तरुण वाचकांना मी आज देऊन ठेवतो. तो त्यानीं एकमेकाला गुपचुप सांगावा. बाहेर विनाकारण त्याची वाच्यता करूं नये. तरुणानों, विचार करूं नका, कुविचार करूं नका, अत्याचार करूं नका, अविचार करा ! डोकीं भडकून द्या. रक्त उसळूं द्या. मनगटें शिवशिवूं द्या. छातीमधल्या आगीच्या ज्वाळा धगधगूं द्यात ! म्हणजेच तुमच्या कृतीमधून जीवन आणि नवीन रंग निर्माण होईल. डोकीं खाजवीत बसल्याने देश स्वतंत्र होणार नाहीं हें नीट लक्ष्यांत ठेवा !

३०।१०।४५

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका







अनुक्रमणिका








# पार्वती

## —ना. सी. फडके

• • संबंध पुस्तक जाळून टाकल्यानंतर तिनं दिवा मालवून टाकला. आतां कसलंहि पुस्तक वाचण्यासाठीं ती पुन्हां कधीं दिवा लावणार नव्हती. कारण——



चरायला सोडलेल्या गुरांच्या मागोमाग डोंगराच्या चढणीवरून जाता जाता पार्वती एकदम थांबली. एका झुडपांत छापील कागदाचा एक तुकडा फडफडलेला तिला दिसला होता. हातांतली काठी सरसावीत ती चार सहा पावलं पुढें गेली. झुडपाच्या कांटेरी फांद्या काठीनं तिनं दूर केल्या व कागदाचा कपटा अलगद काढून घेतला. जुन्या वर्तमानपत्राचा तो तुकडा कुठून तरी वाऱ्यावर उडत उडत रानांतल्या या जागीं आला असावा. पाऊसपाण्यानं भिजून आणि उन्हांत तापून त्याचा रंग काळा पिवळा झाला होता, आणि त्यावर काळसर ओघळ उठले होते. पण जणू एखादी मोलाची वस्तु अचानक हातीं आल्याप्रमाणें पार्वतीनं तो उचलून घेतला आणि झपाट्यानं अंधुक होत चाललेल्या संध्याकाळच्या प्रकाशांत त्यावरील मजकूर वाचण्यासाठीं हातांतली काठी टाकून देऊन पार्वती एका दगडावर बसली. मजकूर वाचण्यासाठीं असं म्हणण्यापेक्षां त्या कागदावर छापलेल्या अक्षरांपैकीं ओळखता येतील तेवढी अक्षरं ओळखण्यासाठीं पार्वती बसली असं म्हणणंच अधिक बरोबर होईल. कारण ट ट प प करीत अक्षरं ओळखण्यापर्यंतच तिची मजल गेली होती. मात्र त्या गोष्टीचा तिला विलक्षण छंद लागलेला होता. लहान मोठा छापील कागदाचा तुकडा रानांत, रस्त्यावर, चावडीपुढें, देवळाजवळ, वाण्याकडून आणलेल्या पुरचुंडींत सांपडला रे सांपडला कीं ती तो आधाशीपणानं हातीं घेई, आणि त्यांतलीं लागतील तितकी अक्षरं लावल्यावांचून तिला चैन पडत नसे. ती दगडावर बसली व आपला नेहमीचा प्रयोग तिनं सुरू केला. गुरं रेंगाळूं लागलीं तिकडे तिनं लक्ष दिलं नाहीं.

रोज तिच्याबरोबर राखणीला येणाऱ्या तिच्या वयाच्याच महादूनं ओरडून म्हटलं, "ए पारे, नीट वख्ताला गुरं पोचवायची हैती का न्हाई तुला ?"

"आल्यें आल्यें. तूं हो म्होरं." पार्वतीनं वर मान न करतां ओरडून सांगितलं. दिसेनासं होण्यापूर्वी हातांतल्या त्या कागदाच्या तुकड्यावरची सगळी अक्षरं ओळखण्याची तिची फार इच्छा होती.

महादू मनाशी म्हणाला, "ही पारी एखाद्या खुळ्याबानीच करायला लागलीय् आताशा." त्यानं थुंकीची पिचकारी टाकली, आणि तो जागच्या जागीं थांबून पार्वतीकडे पहात राहिला.

महादूचा विचार कांहीं खोटा नव्हता. त्यानं तिला खुळी ठरवावी असंच ती आताशा करूं लागली होती. त्याला स्वतःला लिहिता वाचता येत नव्हतं. त्या लहानशा खेडेगांवांतल्या रयतांपैकीं कुणालाच येत नव्हतं. कागदांचे जुने कपटे हातांत धरून घटका दोन घटका त्यांकडं बघत बसायचं म्हणजे त्यांच्या दृष्टीनं खुळेपणाच होता. स्वतः पार्वतीनं सुद्धां एक महिन्यापूर्वी या गोष्टीला खुळेपणाच म्हटलं असतं. पण ती आतां पूर्वीची पार्वती राहिली नव्हती. तिच्यांत फार मोठा बदल झाला होता. छापील कागदाचा उपयोग काय, तर चहा. साखरेच्या अशा वस्तू त्यांत बांधतां येतात असं उत्तर पार्वतीनं पूर्वी दिलं असतं. पण आतां

छापील कागदाचा दुसरा उपयोग तिला माहीत झाला होता. त्यांवर जीं अक्षरं छापलेली असतात तीं ओळखण्यांत गंमत असते हें तिला ठाऊक झालं होतं. कधी कधी दहावीस अक्षरं ओळींत वाचली कीं त्यांतून कांहीं तरी अर्थ आपल्या मनापर्यंत पोंहोचतो आणि तो पोंहोचला कीं विलक्षण आनंद होतो असाहि अनुभव मधून मधून तिला आला होता.

सुमारे एक महिन्यापूर्वी इनामदारांची थोरली लेक माघारपणाला आली होती, तिच्या तान्ह्या मुलाला संभाळायला म्हणून पार्वती राहिली होती. रात्रंदिवस ती त्यांच्याच घरीं असे. इनामदारांची मुलगी कुसुमताई तिला एकदां म्हणाली होतीं, "पारे, तूं पुष्कळदां उगीच गप्प बसलेली असतेस. तुझा वेळ वाया जातो. मी तुला लिहायला वाचायला शिकवितें. शिकशील का ?" पार्वती म्हणाली होती, "माझा बा कधी शिकला न्हाई, अन् मी शिकू म्हणतां ? मला बाई माणसाला काय करायचं हाये शिकूनशान् ?" पण कुसुमताईनं साक्षरतेच्या महत्त्वावर तिला एक लहानसं व्याख्यान दिलं होतं, आणि आग्रह करून तिला शिकायला भाग पाडलं होतं. महिनाभरांत पार्वती बालबोध पहिलं पुस्तक वाचूं लागली होती. ती जात्या फार हुषार होती. तिला आणखी शिकवावं अशी कुसुमताईची फार इच्छा होती. परंतु नवऱ्याची तार आल्यामुळें तिला आपला माहेरचा मुक्काम संपवून परत सासरी जाणं भाग पडलं होतं, आणि पार्वतीचं शिक्षण संपलं होतं. कुसुमताईनं जाताना तिला बजावलं होतं, "पारे, तुला आतां अक्षरओळख चांगली झाली आहे. तुला हीं दोन पुस्तकं मी देतें तीं वाच. पुनः पुन्हां वाच. शिवाय कुठे कांहीं छापलेलें दिसलं कीं वाचायची धडपड करीत जा. कळो न कळो, वाचीत सुटलीस कीं हळु हळु कळूं लागेल." त्याप्रमाणें वागायचं पार्वतीनं आनंदानं कबूल केलं होतं. एका कुळवाड्याच्या मुलीला साक्षर करून आपण माणसांत आणून सोडलं आणि आयुष्याच्या सार्थकतेचा मार्ग तिला दाखविला या कल्पनेच्या आनंदांत कुसुमताई त्या गांवढ्या गांवाहून परत गेली होती. आयुष्याचं सार्थक वगैरे कल्पनांचा वास देखील पार्वतीला असणं शक्य नव्हतं. परंतु एक नवीन आनंद आपल्या हातीं आला येवढं तिला कळत होतं. कुसुमताईनं दिलेलीं पुस्तकं पुनः पुन्हां वाचण्याचा क्रम तर तिनं ठेवलाच, पण शिवाय सांपडेल तिथें मिळेल तो छापील कागद उचलायचा आणि घरीं आणायचा असा तिनं सपाटा चालू केला होता. हे जमविलेले सारे छापील कागद तिनं मोठ्या काळजीपूर्वक एका फडक्यांत बांधून ठेवले होते.

तिचा म्हातारा बाप रामजी यानं कांहीं दिवस तिचं कौतुक केलं. इनामदारांच्या ताईनी आपल्या पोरीला एक पुस्तक शिकविलं या गोष्टीची त्याला मोठी धन्यता वाटली. पण पुढें जेव्हां पार्वतीनं कागद गोळा करून संग्रही ठेवण्याचा उद्योग सुरू केला तेंव्हां तिचं तें करणं त्याला अगदीं खुळेपणाचं वाटूं लागलं. कुळवाड्याच्या मुलीला लिहिण्यावाचण्याशीं करायचंय् काय ? बापानं लग्न करून दिलं कीं संसाराच्या वाटेला लागायचं, आणखी आया आज्या ज्या गोष्टी करीत आल्या त्या करीत मरेपर्यंत तीं वाट चालायची, या पलीकडे पार्वतीसारख्या मुलीला दुसरं कांहीं जिणं असूं शकतं काय ? खुळी कुठली ! एक दोनदां त्यानं पार्वतीला हा वेदान्त सांगून पाहिला. पण तिचं वाचण्याचं वेड ती कांही सोडीना. तेव्हां त्यानं मनाशी विचार केला कीं तिच्यावर रागावण्यांत कांहीं अर्थ नाहीं. चालूं दे हिचा खुळा छंद. किती दिवस चालेल ? लगीन होऊन आपल्या नवऱ्याच्या घरीं गेली आणि नांदू लागली कीं आपोआप संपेल हें सारं ! आणि तें व्हायला आतां फार अवकाश होता काय ? तिच्यासाठीं त्यानं नवरा बघून ठेवला होता. येत्या मार्गेसरांत तिला हळद लागायची हें ठरलेलं होतं.

रामजीच्या योजनेप्रमाणें पार्वतीचं लग्न झालं, आणि लखु सांवताच्या घरांत त्याची सून म्हणून ती नांदायला गेली. पण रामजीचा साराच हिशोब कांहीं खरा ठरला नाहीं. घर-काम शेतकाम संभाळून सुद्धां पार्वतीनं आपला वाचण्याचा उद्योग चालूच ठेविला. तिचा नवरा शिवराम म्हणजे सामान्य अडाणी शेतकऱ्याचा नमुना होता. लिहिणं वाचणं त्याला जन्मांत माहीत नव्हतं. रात्रीं राकेलच्या डबड्याच्या उजेडांत पार्वती वाचीत बसलेली त्याला दिसली कीं तो मनाशी म्हणे, "हिचं काय डोकं बिकं बिघडलय् काय ?" पण घरकाम चोख करून पार्वतीनं ज्याप्रमाणें आपल्या सासूसासऱ्यांना तक्रार करायला जागा ठेवली नव्हती, त्याप्रमाणें ती पत्नीधर्म उत्तम प्रकारें पाळीत होती, आणि त्यामुळें शिवराम मनाशी म्हणे, "मरेना का वाचीना. तिच्या वाचण्याच्या मूर्ख नादाकडे दुर्लक्ष करणं त्याला अवघड वाटत नसे."

एकदां त्यानं मोठ्या प्रेमानं पार्वतीला विचारलं, "तुला लहानसा दागिना करून घालायची माझी इच्छा आहे. तुला काय आवडेल ? सांग. उद्या बैलगाडी घेऊन मी जाणार आहे शहराला. काय घेऊन येऊं तुझ्यासाठीं ? सांग"

पार्वती म्हणाली, "मला काय हवं खरं सांगू ? आणाल तुम्ही ?"

"वा ! तूं माझी लाडकी पारू नाहीस काय ? तूं सांगशील तें आणीन."










अनुक्रमणिका

" माझ्यासाठीं एक चांगलसं पुस्तक घेऊन या."

शिवराम मोठमोठ्यानं हंसूं लागला. तो म्हणाला, " पुस्तक हवं तुला ? कशी वेडी ग तूं. तें काय तूं नाकांत घालणार कीं कानांत घालणार कीं डोक्यांत ?"

पार्वतीनं गंभीरपणानं त्याच्याकडे पाहिलं व म्हटलं, "तुम्ही आणा म्हणजे झालं."

शिवराम म्हणाला, " आणतों. दागिनाबी आणतो. अन् तुला आवडेल असं छानपैकीं पुस्तकबी आणतों."

बायकोसाठीं पुस्तक आणायच्या हेतूनं शिवराम घरून निघाला खरा, परंतु त्याबद्दल तो अधिक विचार करूं लागला तेव्हां त्याच्या लक्षांत येऊं लागलं कीं जी गोष्ट करायचं त्यानं मनाशीं ठरवलं होतं ती कांहीं सोपी नव्हती. त्यानं जन्मांत कधीं पुस्तक विकत घेतलेलं नव्हतं. चांगलंसं पुस्तक कशाला म्हणतात याची त्याला कल्पना नव्हती. शहरांत पुस्तकांचं दुकान त्यानं पाहिलं होतं. पण तिथें आपण गेलों तर चांगलसं पुस्तक दुकानदार देईल याची काय खात्री होती ? एकदां त्यानं शहरांतल्या एका दुकानांत जाऊन चांगलासा अडकित्ता मागितला होता अन् दुकानदारानं आणा शपथा घेऊन उत्तम पात्याचा म्हणून दिला तो त्यानं खरेदी केला होता. पण महिनाभरांत त्या अडकित्यांत बोटाचं पेर देखील सांपडलं तरी दुखावयाचं नाहीं अशी त्याची अवस्था झाली होती, अन् सारे लोक त्याला हंसूं लागले होते. तसंच आतां या पुस्तकाच्या बाबतींत झालं म्हणजे ? चांगल्या मिठाईचीं वाईट मिठाईचीं वेगवेगळीं दुकानं असतात त्याप्रमाणें पुस्तकांचीहि असलीं पाहिजेत. खात्रीलायक चांगला माल जिथें मिळतो, लहान पोर गेलं तरी जिथें चांगलंच पुस्तक दिलं जातं असं एखादं शेलकं पुस्तकांचं दुकान शहरांतल्या बाजारपेठेंत असलंच पाहिजे....पण तें आपल्याला सांपडायचं कसं ?....बरं या बाबतींत विचारायचं कुणाला ?.... बैलगाडी तीन मैल गेली तरी या अडचणींतून वाट कशी काढायची तें कांहीं शिवरामला सुचेना.

पण मग एकदम त्याला एक युक्ति सुचली. गोखले मास्तरांची त्याला आठवण झाली. दादा गोखले कुठल्या शाळेंत मास्तर होते तें त्याला माहीत नव्हतं. पण त्यांची थोडी शेती शिवरामच्या गांवाच्या आसपास होती, त्यामुळें ते कधी कधी त्या बाजूला येत, आणि ते आले कीं जो तो त्यांना गोखले मास्तर म्हणत असे येवढं शिवरामला माहीत होतं. त्यांची आठवण होतांच शिवराम मनाशीं म्हणाला, "हां रे हां, गोखले मास्तरना विचारावं म्हणजे ते बरावर सांगतील आपल्याला कुठल्या दुकानांत कुठलं पुस्तक घ्यायचं तें." या विचारानं शिवरामला अगदीं हायसं वाटलं, आणि चाबूक उगारून व हातांतला कासरा ढिला सोडून त्यानं आपल्या आवडत्या बैलांना जरा जलदी करण्याचा इशारा दिला. शहरांत गेल्यावर शिवरामनं प्रथम गोखले मास्तरांचं घर गांठलं, आणि त्यांची गांठ पडल्यावर आपण कोणत्या बाबतींत त्यांचा सल्ला घ्यावयास आलों तें त्यांना निवेदन केलं.

ते त्याची हकीगत ऐकून चकीत झाले आणि खूषहि झाले. ते म्हणाले, " शिवराम, अरे अशी बायको मिळाल्याबद्दल तुला मोठा अभिमान वाटला पाहिजे रे ! " शिवराम त्यांच्याकडे बघत राहिला. त्याला पार्वतीचा अभिमान वाटत नव्हता असं थोडंच होतं ? ती घरकाम उत्तम प्रकारें करीत होती, सासू सासऱ्यांचीं सेवा करीत होती, या सर्व गोष्टींमुळें कोणत्याहि नवऱ्याला बायको आवडावी तितकी ती त्याला आवडत होती, आणि तितक्यापुरता तिचा त्याला अभिमानहि वाटत होता. परंतु यापलीकडे कसला अभिमान धरायचा तें त्याला कळत नव्हतं. पुस्तकं वाचण्याची पार्वतीची हौस त्याला फक्त एक चमत्कारिक लहरीसारखी वाटत होती. तिच्यावर त्याची ममता होती म्हणूनच केवळ त्या चमत्कारिक लहरीचं कौतुक करायला तो तयार झाला होता....मनांतले हे विचार बोलून दाखविण्याची शिवरामला अक्कल नव्हती. पण ते त्याच्या मनांत आले, आणि एखाद्या निर्बुद्ध मुक्या जनावराप्रमाणें तो मास्तरांकडे पहात राहिला. मास्तर अर्धवट स्वगत म्हणाले, " आतां तुझी बायको चांगलंसं पुस्तक मागते तेव्हां कोणतं पुस्तक द्यावं तिला ? अनेक पुस्तकांचीं नांवं त्यांनीं भराभर आठवून पाहिलीं. परंतु त्यांतलं एकही पुस्तक त्यांच्या मनाला पटेना त्यांची चर्या जरा त्रासल्यासारखी झाली. कपाळाला आंठी घालून ते स्वगत उद्गारले, " कोठलं पुस्तक द्यावं ? " परंतु तितक्यांत त्यांची कपाळावरची आंठी दूर झाली व ते हंसत शिवरामला म्हणाले, " अरे होय रे गड्या. एक पुस्तक आहे. अगदीं तुझ्या बायकोला देण्यासारखं. तें पुस्तक तिनं वाचलं कीं तिला नीति, धर्म, लौकिकआचार, फार उत्तम कळूं लागेल. आपले पूर्वज कसे वागत असत त्याचा कित्ता डोळ्यासमोर सदा ठेवायचा असेल तर या पुस्तकासारखं दुसरं पुस्तक नाहीं असं मोठमोठ्या विद्वानांचं मत आहे. हेंच पुस्तक घेऊन ये तूं पार्वतीला, ऐकलंस का ? जा, हेंच पुस्तक दे. "

शिवराम म्हणाला, " पर मास्तर त्या पुस्तकाचं नांव कुठं सांगितलंत तुम्ही ? "

" अरे खरंच कीं ! नाहींच सांगितलं नाहीं कां ? त्याचं नांव महाभारतांतील कथा. "

" पार्वतीनं चांगलसं पुस्तक घेऊन या म्हणून सांगितलया. तुम्ही म्हनता तें पुस्तक अगदी चांगलसं हाये ना ?"

" अरे चांगलसं म्हणून काय विचारतोस ? तुझ्या बायकोच्या

हाती द्यायला या सारखं दुसरं पुस्तक नाहीं बघ. जा त्या बाजारपेठेंतल्या मोठ्या दुकानांत आणि हें पुस्तक माग."

"दुकानदार नेमकं देईल ना? मला फसवायचा नाहीं ना?"

मास्तर हंसले व म्हणाले, "हं जा जा."

शिवराम तडक दुकानांत गेला व त्यानं मास्तरानीं सांगितलेलें पुस्तक विकत घेतलें. पुस्तकाच्या जाड पुठ्ठ्यावरचं रंगीत चित्र पाहिल्यावरून त्याच्या चांगुलपणाबद्दल त्याची पुरती खात्री पटली. पीतांबर कसलेला उघड्या अंगाचा अर्जुन धनुष्याला बाण लावून मत्स्यवेध करीत असल्याचं चित्र होतं तें. इतकं सुंदर चित्र ज्या पुस्तकावर होतं तें चांगलं पुस्तक असणार याबद्दल संशयाला जागा कुठली? शिवरामानं मनांतल्या मनांत मास्तरांचे आभार मानले आणि पार्वतीला हें पुस्तक फार आवडणार या कल्पनेच्या आनंदांत स्वारीनं बैलगाडी गांवाकडे परत वळविली.

पार्वतीला तें पुस्तक इतकं आवडलं कीं फुरसतीच्या वेळांत एक क्षणभरही ती तें हातावेगळं करीना. पुस्तक लिहिणाऱ्यानं तें सोप्या सुबोध भाषेंत लिहिलं होतं त्यामुळें ज्यांचा अर्थ तिला माहीत नव्हता अशा शब्दावर क्वचित् स्थळीं जरी ती अडखळे तरी मजकुराचा मुख्य गाभा तिच्या हातीं लागत असे आणि एकंदर कथेचं मर्म तिला सहज कळत असे. तिनं प्रथम पुस्तक वाचून काढलं तें केवळ एकेका कथेंत काय काय घडलं तें जाणून घेण्याच्या ओढीनं. पण मग तिनं त्या पुस्तकाचं पुन्हां वाचन सुरू केलं त्या वेळीं तिचं मन केवळ कथाभागाच्या चमत्कृतींत न रमतां प्रत्येक गोष्टींत जें कांहीं सांगितलं होतं त्यावर ती विचार करूं लागली. ज्या काळांतल्या त्या गोष्टी होत्या त्या काळांत समाज अमक्या तऱ्हेचा होता, चालीरीती अमक्या प्रकारच्या होत्या, स्त्रिया पुरुषांशीं अमुक तऱ्हेनं बोलत चालत, पुरुष अमक्या तऱ्हेचे असत व अमक्या तऱ्हेनं वागत इत्यादि कल्पना अस्पष्टपणें कां होईना परंतु तिच्या मनांत उद्भवूं लागल्या—

आणि स्वतःच्या वाट्याला आलेल्या आयुष्याची, माणसांची व परिस्थितीची त्या पुस्तकांत रंगविलेल्या चित्रांशीं ती मनांतल्या मनांत तुलना करूं लागली. दमयंती, रुक्मिणी, द्रौपदी, सुभद्रा, या स्त्रियांनीं आपापले नवरे स्वतःच्या मतानं शोधून काढले होते. बापानं नवरा ठरवावा आणि मुलीनं तो पत्करावा असा प्रकार कुणाच्याच बाबतींत झाला नव्हता. रुक्मिणीनं तर मोठं चतुर कारस्थान रचून कृष्णाशीं लग्न लावलं होतं; आणि थोरल्या भावानं ठरविलेलं लग्न मोडून अर्जुनाशीं लग्न करण्याच्या बाबतींत प्रत्यक्ष देवानं सुभद्रेला साहाय्य केलं होतं. स्वयंवराच्या या कथा पार्वती वाचूं लागली कीं त्यांचा तिच्या मनावर फार परिणाम होई. ज्या स्त्रियांच्या हकिगती ती वाचीत असे त्यांनीं मिळविलेल्या सुखाची कल्पना मनांत येतांच तिच्या अंगावर रोमांच उभे राहात. त्या स्त्रियांचीं ज्या पुरुषांशी लग्नं झालीं त्यांच्या सौंदर्याची वर्णनं कितीदांहि वाचली तरी तिला पुरेशी वाटत नसत. आणि तीं वाचतां वाचतां कधीं कधीं ती एकदम थांबे. पुस्तकांतल्या सृष्टींतून तिचं मन एकदम हेलकावा खाऊन तिच्या स्वतःच्या जीवनसृष्टींत येऊन पडे, आणि तिच्या मनाला मोठाच धक्का बसे. स्वतःच्या लग्नाविषयीं, शिवरामविषयीं ती मनांतल्या मनांत भलभलते विचार करूं लागली. शिवराम तिचा नवरा होता म्हणजे काय? त्याला कुणी पसंत केलं? तिची आवड निवड तिच्या बापानं कधीं विचारांत घेतली? लखू सावंताला मुलगा होता, आणि रामजीला मुलगी होती. लखूला सून हवी होती, रामजीला जांवई हवा होता, येवढ्याच कारणानं तिचं शिवरामशी लग्न झालं होतं! आणि रामजीची निर्बुद्ध साधीभोळी लेक मुकाट्यानं सावंताच्या घरांत नांदायला आली होती!....असं कां घडावं? कसं घडतं? महाभारतांत ज्या गोष्टी सांगितल्या आहेत त्या तर प्रत्यक्ष घडलेल्या आहेत. इथें आपल्या

देशांतच घडलेल्या आहेत! पुराणाला कीर्तनाला जमणारी सारी माणसं त्या आदरानं व भक्तिभावानं ऐकतात. त्या गोष्टी वाईट होत्या असं कोणी म्हणत नाहीं. उलट ज्या स्त्री-पुरुषांच्या त्या गोष्टी आहेत त्यांची नांवं ऐकल्याबरोबर बायका पुरुष हात जोडून नमस्कार करतात. माणसांनीं कसं वागावं याबद्दल त्या गोष्टी म्हणजे कित्ते होत असं सारीजण सांगतात!....

आणि तरी शिवरामशीं तिचं लग्न लावून देतांना तिला कुणीच कांहीं विचारलं नव्हतं. लखू सावंताचा जो आडमुठा, काळाबेंद्रा, कुरूप शिवराम शेतांत, चावडीवर, विहिरीवर पूर्वी शंभर वेळां तिनं पाहिला होता तो एकदम एके दिवशीं तिचा नवरा झाला होता! आणि तिनंही त्याला आपला नवरा मानला होता! कांहीं तक्रार केली नव्हती!....

परंतु आतां तिचं मन मोठी तक्रार करूं लागलं. शिवराम आपला नवरा आहे ही गोष्ट मान्य करून त्याप्रमाणें वागताना तिचं मन सारखं ओढ घेऊं लागलं! वरकरणी ती पूर्वीप्रमाणेंच मोठ्या आनंदानं घरकाम शेतकाम उरकून टाकी. पत्नीधर्माचं पालनहि ती करी. परंतु या गोष्टी करताना तिचं मन तक्रार करी, धुसपुसे, ओढ घेई, रडे, रागावे, जळे. अशा वेळीं मनाचं दुःख विसरण्यासाठीं ती अधिकच उत्कंठेनं महाभारतांतील कथा वाचीत सुटे. त्या कथांत पुरुषांचीं मनं बायकांवर जडलीं होतीं, बायकांची पुरुषांवर जडलीं होतीं. "मला सौंदर्यानं मोह घातला आहे, मला तू हवास" असं बायकांनीं पुरुषांना खुशाल सांगितलं होतं. त्यांनीं लाज धरली नव्हती. त्याबद्दल त्यांना कुणी दोष दिला नव्हता. स्त्रीला पुरुष आवडला पाहिजे हें सगळ्यांनीं मान्य केलेलं तत्व होतं....असल्या वर्णनांत ती बराच वेळ दंग होऊन राही. पण पुन्हां ती दचकून थांबे. पुस्तक तसंच हातांत धरून ती मनाशी म्हणे, या पुस्तकातल्या गोष्टीं नुसत्या विसरून जायसाठीं वाचायच्या काय? माझ्या वाटयाला जें आलं आहे तें या पुस्तकातल्या वर्णनापेक्षां किती निराळं? तिची नजर हळूच पलीकडच्या कोपऱ्यांतल्या अंथरुणाकडे वळे. राकेलच्या डबड्याच्या लालसर अंधुक प्रकाशांत अंथरुणावर पसरलेल्या शिवरामची आकृति व लगटच्या भिंतीवर पडलेलीं त्याची विचित्र सावली तिच्या दृष्टीस पडे. पहाटेचा गार वारा सुटलेला असे. शिवराम एखादे वेळेस अंगावरचं कांबळं सरसावून या कुशीवरचा त्या कुशीवर होई, आणि एखाद्या जनावराप्रमाणें मोठ्यांदा श्वास सोडी. तें पाहिलं कीं पार्वतीचं सबंध अंग शहारून जाई. अंतःकरणांत उठणारी तीव्र असमाधानाची लहर आवरावी कशी तें तिला कळेनासं होई....

ती पुस्तक टाकून देई, खोलींतून बाहेर पडून गोठ्यांत जाई, अन् खराटा हाती घेऊन शेणमूत झाडायला सुरवात करी. ओटीवर निजलेला तिचा सासरा खराट्याचा आवाज ऐकून विचारी,

"कोन त्ये?"

ती म्हणे, "मी!"

"कोंबडं आरवल्येलं तर ऐकलं न्हाई, पहाट झाली व्हय?"

"न्हाई. अवकाश हाये. तुम्ही निजा."

त्या तऱ्हेचं आयुष्य आपल्या वांट्याला आलेलं आहे त्यांत उघड उघड आपली फसवणूक झालेली आहे हा विचार पार्वतीच्या मनांत उत्तरोत्तर इतका बळावूं लागला, आणि त्यांतून उत्पन्न होणारं असमाधान तिला इतकं तीव्रतेनं जाणवूं लागलं, कीं ती मनाशी म्हणू लागली, हें जर असं आहे तर हें मी मुकाट्यानं सोसायचं काय म्हणून? मानेवरचं हें जोखड असंच राहूं द्यायचं कशासाठीं? एकीकडे असले विचार तिच्या मनांत जोरानं उसळून येत आणि दुसरीकडे तिला त्यांचं भय वाटे. ज्या पुस्तकाच्या वाचनानं तिच्या मनोवृत्तींत बदल झाला होता त्यांतल्या गोष्टी वाचण्याचं आकर्षण तिला एकीकडे वाटे पण दुसरीकडे तिला वाटे नकोत त्या वाचायला, त्या वाचल्या कीं मन भलतीकडे भडकूं लागतं. अगदीं प्रारंभीं एक चटकदार मनोरंजक पुस्तक म्हणून तें तिला आवडलं होतं. मग हळुहळु त्या पुस्तकानं तिला नवी दृष्टि दिली होती. पुढें स्वतःची परिस्थिति विसरण्यासाठीं त्या पुस्तकाच्या वाचनांत ती आपलं मन गुंतवूं लागली होती. आणि आतां अखेर अशी चमत्कारिक दशा आली होती कीं त्या पुस्तकाबद्दल जितकी ओढ तिच्या मनाला वाटे तितकीच भीतिहि वाटे. तिला ते हवंसंही वाटे आणि नकोसंहि वाटे. त्या पुस्तकांच्या वाचनानं आपल्या अंगीं जो शहाणपणा आला आहे त्यांतच आपला घात आहे अशी तिला धास्ती वाटे. शिवरामबरोबर पत्नीधर्मानं वागतांना सुख होण्याऐवजीं आपलं मन आणि शरीर होरपळून निघत आहे असं तिला वाटे. आणि या प्रकारचा उगम आपण वाचलेल्या महाभारतातील कथांत आहे असं तिच्या मनांत येई. त्या कथा तरी सपशेल खोट्या असल्या पाहिजेत किंवा त्या खऱ्या असूनहि केवळ पुस्तकांत वाचायासाठीं आहेत, त्यांचा आपल्या आयुष्याशीं कांहींच संबंध नाही असं तरी असलं पाहिजे—असं ती मनाशीं म्हणे. परंतु यापैकीं एकही गोष्ट मानायला ती तयार नसे. त्या पुस्तकांत ज्या ज्या गोष्टींचीं वर्णनं आहेत त्या खरोखरीच घडल्या असल्या पाहिजेत, आणि त्या गोष्टींचा कित्ता जर डोळ्यांपुढे ठेवायचा असेल तर प्रत्यक्ष आपल्या आयुष्यांत घडत आहे ती एक प्रचंड फसवणूक म्हटली पाहिजे असं तिला वाटे. पण पुन्हां तिला वाटे, कीं या प्रचंड फसवणुकीचं आपल्याला ज्ञान झालं यांतच घात आहे. विचारशून्य, निर्बुद्ध, आंधळी पार्वती, एखाद्या मुक्या जनावराप्रमाणें शिवरामशी संसार करूं लागली होती तसाच

तिनं मरेपर्यंत केला असता तर बरं झालं असतं. तिला डोळस-प्रणा आला होता, ती विचार करूं लागली होती यांतच धोका होता. या नव्या दृष्टीनं शिवरामकडे पाहिलं कीं तिचं मन आणि शरीर दोन्हीं बंड करीत. शिवरामनं तिला जवळ ओढलं कीं तिचं मन संतापानं व तिरस्कारानं त्याच्यापासून शक्य तितक्या दूर वेगानं जाई, आणि त्या दूरत्वाचा परिणाम तिच्या शरीराच्या व्यापारावर होई.

शिवराम अगदी निर्बुद्ध व अडाणी होता. परंतु त्यालासुद्धां तिच्या शरीराची तक्रार कळूं लागली. आपल्याला जें हवं तें बलात्कारानंच घ्यावं लागतं हें त्याला उत्तरोत्तर अधिकाधिक स्पष्ट दिसूं लागलं. एखाद्या मस्त जनावराप्रमाणें तो वागूं लागला. त्याच्या तसल्या वागण्यानं पार्वतीचं मन अधिकच विटूं लागलं. त्याच्या मिठीतून सुटण्यासाठीं तिचा देह धडपडूं लागला.आणि त्यामुळें शिवरामचा अडदांडपणा आणखीच वाढला.

अशा स्थितींत एके दिवशीं ऐन दुपारच्या प्रहरीं पार्वती पाणवठ्यावर गेली असतांना एक तरुण पुरुष तिच्या दृष्टीस पडला. तिनं त्याला पूर्वी कधींहि पाहिलं नव्हतं. तो कोण होता, कुठून आला होता, कशासाठीं या गांवीं आला होता, याची तिला कल्पनाहि नव्हती. पण तो दृष्टीस पडल्याबरोबर तिचं हृदय एकदम धडधडूं लागलं. महाभारतांतील कथांतील सुंदर पुरुषांचीं सारी वर्णनं तिला एकदम आठवलीं. जणू या पुरुषाला डोळ्यांपुढें ठेवूनच लिहिणाऱ्यानं तीं वर्णनं लिहिलीं होतीं असं तिला वाटलं. भरलेली घागर तशीच जमिनीवर ठेवून झाडाच्या आडोशानं ती त्या पुरुषाकडे पहात राहिली. तो जसा तिला दिसला तसाच कांहीं वेळानं दिसेनासा झाला. परंतु नंतर सबंध दिवसभर डोळ्यांत भरलेली त्याची सुंदर आकृति पार्वतीच्या डोळ्यांना स्पष्ट दिसत होती.

रात्र झाली. प्रथम तिचा सासरा घरीं आला. नंतर कांहीं वेळानें शिवराम आला. पार्वतीच्या छातींत एकदम धस्स झालं.

कामधाम आटपल्यावर ती निजण्याच्या खोलीकडे जाऊं लागली तेव्हां तिचं सबंध अंग थर थर कांपत होतं. ती आंत शिरली. तिनं दार लोटलं. पण त्याच क्षणीं तिला मूर्च्छा येऊन ती जमिनीवर मटकन् बसली. शिवरामचीं पावलं जवळ आल्याची चाहूल लागताच ती एकदम ताडकन् उभी राहिली, आणि जणू कांहीं जीव वाचविण्यासाठीं तिला दूर पळून जायचं होतं अशा घाईनं व भीतीनं तिनं दाराच्या कडीला हात घातला. पण शिवरामनं तिला धरलं आणि ओढीत नेलं. तिच्या मनानं आंतल्या आंत आकांत केला. तिच्या शरीरानं निकराची धडपड केली. शिवरामला स्वतःचा संताप आवरेना. त्यानं खाडकन् तिच्या तोंडांत भडकावली. पार्वती निश्चेष्ट पडली.

ती शुद्धीवर आली तेव्हां पहाटेचा गार वारा सुटला होता. खोली अंधारांत बुडली होती. रात्रीचा प्रकार तिला हलके हलके आठवला. कांहीं वेळ उघड्या डोळ्यांनीं अंधाराकडे पहात ती अगदी स्वस्थ पडून राहिली. तिच्या मनांत कसलाहि विचार येत नव्हता. जणू तिचं मन जागेवर नव्हतंच अथवा विचारचक्रांची क्रिया अजिबात बंद पडली होती.

पण चिरडलल्या पाखराच्या अंगात हळु हळु धुगधुगी यावी व त्याच्या पंखाची हालचाल पुन्हां सुरूं व्हावी तद्वत् तिच्या मनांतलीं विचारचक्रं हलके हलके फिरूं लागलीं. जवळ जवळ येणाऱ्या माणसाची पावलं अधिकाधिक स्पष्ट ऐकूं यावीं त्या प्रमाणें तिच्या विचारांचा आवाज तिला जास्त जास्त ऐकूं येऊं लागला. तो ऐकत ती खूप वेळ तशीच पडून राहिली.

नंतर ती उठली ती मात्र एकदम कसला तरी निश्चय केल्या-प्रमाणेंच. ती समोरच्या कोंपऱ्यांत गेली. काडी ओढून तिनं राकेलचं डबडं लावलं. धान्याच्या आडव्या पोत्यावर ठेवलेलं महाभारताचं पुस्तक तिनं उचलून घेतलं. त्याचा जाड पुठ्ठा तिनं टर्रकन् फाडला. नंतर चार पांच पानं एकदम फाडून दिव्याच्या ज्योतीवर तिनं तीं पेटवलीं. त्या जळत्या पानांवर पुस्तकांतलीं आणखी पानं फाडून तिनं धरलीं, मग आणखी पानं! मग आणखी पानं!

सबंध पुस्तक जाळून टाकल्यानंतर तिनं दिवा मालवून टाकला. आतां कसलंहि पुस्तक वाचण्यासाठीं ती पुन्हां कधीं दिवा लावणार नव्हती. ज्ञानाचं विष ती प्याली होती तें तिला ओकून टाकायचं होतं. तिला डोळसपणा आला होता. ते डोळे तिनं फोडून टाकले होते. तिला पुन्हां आंधळं होणं भाग होतं. खोलींत पुन्हां अंधार भरला होता. त्या अंधा-रांत तिनं भिंतीवर मान टेकली, आणि डोळे मिटून घेतले.....

बाहेरच्या गोठ्यांत गुरं अंगांची हालचाल करीत होतीं, शेपट्या हालवीत होतीं, मोठाले लांब श्वास सोडीत होतीं, रंवथ करीत होतीं! त्यांच्या जीवनांत आणि आपल्या जीवनांत कांहीं अंतर नाहीं, अंतर असतां कामा नये, त्यांच्याप्रमाणेंच आयुष्य घालवायला आपण जन्माला आलों आहोंत, उगाच दावणीशी ओढ घेण्यांत कांहीं एक अर्थ नाहीं, असा विचार पार्वती आपल्या मनाला शिकवीत होती.....

शिवराम सकाळी उठला. धान्याच्या पोत्यापाशीं राखेचा लहानसा पुंजका आणि दोन जाड पुठ्ठे त्याला दिसले. एका पुठ्ठ्यावर पीतांबर नेसलेल्या उघड्या अर्जुनाचं चित्र होतं. तो कांहीं वेळ पहात राहिला. किती हौसेनं त्यानं तें चांगलंसं पुस्तक पार्वतीसाठीं आणलं होतं आणि तिला तें किती आवडलं होतं. तिच्या हातांत तें सदा असलेलं त्याला दिसलं होतं. आणि तें पुस्तक—? शिवरामला अगदीं गोंधळल्या-सारखं झालं....

त्यानं कोंपऱ्यांतली तुटकी केरसुणी उचलून घेतली, आणि त्या दोन जाड पुठ्ठ्यांसकट ती राख झटकून कोंपऱ्यांत ढकलून दिली.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# हें माहीत हवं.....

— अनंत काणेकर

परवां एका मित्राबरोबर चहा पीत बसलों असतां गप्पा करतां करतां तो म्हणाला, "कांहीं लोकांचा जुलूम आहे, बुवा !"

"काय ?" मी म्हणालों.

"अरे, ते मला पुन्हां पुन्हां डॉक्टर म्हणतात !"

"मग त्यांत काय झालं ?" मी हंसत म्हणालों, "तूं डॉक्टरणीचा नवरा आहेस म्हणून तुला डॉक्टर म्हणतात ! वकीलाच्या बायकोला स्वतःचं नांव लिहितां येत नसलं तरी वकीलीणबाई, डॉक्टरच्या बायकोला डॉक्टर या शब्दाचं स्पेलिंग येते नसलं तरी तिला डॉक्टरीणबाई नाहीं का म्हणत ? उलट तसं कुणी नाहीं म्हटलं तर त्या बायकांना राग येतो !"

"छे, बुवा, पण आपणाला कसंसंच वाटतं", तो आंबट चेहरा करून उद्गारला.

त्याच्या बायकोचं आणि त्याचं मुळींच भांडण नाहीं. दोघांचं एकमेकांवर चांगलं प्रेम आहे. दोघांना एकमेकांविषयीं अतिशय आदर आहे. त्याला कमीपणा वाटण्यासारखंही कांहीं नाहीं, लंडन विद्यापीठाचा तो अर्थशास्त्राचा बी. एस. सी. असून चांगली चारशें रुपये पगाराची त्याला सरकारी नोकरी आहे. उलट त्याच्या बायकोचाच पगार त्याच्यापेक्षां कमी आहे. कुठल्या तरी हॉस्पिटलांत तिला अडीचशें रुपये मिळतात. दोघांची एकमेकांविरुद्ध तक्रार नाहीं. डॉक्टरच्या बायकोला कुणी डॉक्टरीण म्हटल्यास तिला वाईट वाटत नाहीं; उलट बरंच वाटतं. मग डॉक्टरणीच्या नवऱ्याला कुणी चुकून डॉक्टर म्हणाला तर त्याला कसंसंच कां वाटावं ? त्याचं कारण उघड आहे. शतकानुशतकं समाजांतल्या पुरुषांच्या वर्चस्वामुळें पुरुषांत एक प्रकारचा अहंगंड निर्माण झाला आहे. कसाही पुरुष असला तरी आपल्या बायकोच्या नांवानें किंवा पदवीनं आपण ओळखलं जाणं त्याला कमीपणाचं वाटतं. ज्या कारणामुळें पुरुषांना कसंसंच वाटतं त्याच कारणामुळें स्त्रियांना तसल्याच परिस्थितींत बरं वाटतं. अनेक वर्षांच्या संवयीनें पांखराला पिंजरा किंवा कुत्र्याला पट्टा प्रिय वाटावा त्याचप्रमाणें नवऱ्याचं नांव किंवा पदवी स्त्रियांना भूषणासारखी वाटते.

अशिक्षित आणि अडाणी स्त्रियांना हे पिंजरे आणि पट्टे प्रिय वाटतात याचं मला मुळींच आश्चर्य वाटत नाहीं. मला आश्चर्य वाटतं तें स्वतःला पुरुषांच्या बरोबरीच्या समजणाऱ्या आणि बरोबरीचं स्थान मिळावं म्हणून झगडणाऱ्या सुशिक्षित आणि पुढारलेल्या स्त्रियांनाही या गोष्टी भूषणास्पद वाटतात त्याचं. कांहीं हाताच्या बोटांवर मोजण्याइतक्या स्त्रियांना असं वाटत नाहीं हें मला माहीत आहे. मी सर्व सामान्य सुशिक्षित स्त्रियांसंबंधीं बोलतों आहे. आपली बायको ज्या सभेची अध्यक्ष आहे त्या सभेला बायकोनें आपणाला बरोबर नेलं नाहीं म्हणून तक्रार करणारा एकही छोटा किंवा मोठा पुरुष मला आढळलेला नाहीं; पण अशाच प्रसंगीं नवऱ्यानें बरोबर नेलं नाहीं म्हणून रागावणाऱ्या डझनावारी सुशिक्षित आणि सुधारलेल्या स्त्रिया मी पाहिल्या आहेत. अमके राव किंवा तमके पंत यांच्या अध्यक्षतेखालीं एखादा समारंभ चालू आहे, आणि हुशार मुलांना किंवा मुलींनां रावांच्या किंवा पंतांच्या विदुषी पत्नीच्या हस्तें बक्षिसें वाटण्यांत येत आहेत, हें दृश्य नेहमींचें आहे; पण अमक्या राणी किंवा तमक्या देवी या एखाद्या समारंभाच्या महनीय प्रवक्त्या आहेत, आणि यशस्वी खेळाडूंना त्यांच्या विद्वान् पतीच्या हस्तें पेले, ढाली देण्यांत येत आहेत, असा देखावा कधीं पाहिलेला तुम्हाला आठवतो काय ?

स्त्रीजातीच्या स्वाभिमानाचा हा प्रश्न आहे. समतेसाठीं पुरुषांबरोबर झगडणाऱ्या स्त्रीलढवय्यांनीं पुरुषांच्या पलटणींनां तोंड देण्याकरतां आपलें दल सज्ज करण्यापूर्वीं आपल्या शिपायांच्या माना ताठ करण्याची ही चळवळ आधीं हातीं घेतली पाहिजे, असें मला वाटतें. स्त्रियांनां संपूर्णपणें पुरुषांच्या बरोबरीचें स्थान मिळावें अशा मताचा मी आहे. पण ही बरोबरी म्हणजे काय याची कल्पना बऱ्याच स्त्रियांना नाहीं. कांहीं दिवसांपूर्वीं एका विचारी राष्ट्रिय पुढाऱ्यानें आपल्या एका महत्वाच्या भाषणांत सांगितलें, कीं सुशिक्षित स्त्रियांनीं पुरुषांच्या क्षेत्रांत स्पर्धा करण्यांत वेळ दवडण्याऐवजीं आपल्या विशिष्ट क्षेत्रांत मोठेपणा मिळविण्याचा प्रयत्न करावा. त्यांच्या या सांगण्याचा

उद्देश खात्रीनें असा नव्हता कीं सरोजिनी नायडूंनीं जन्मभर चूल फुंकीत बसावें किंवा मॅडम् क्यूरीनीं झबलीं टोपडीं वेतण्यांत आयुष्य व्यतीत करावें. पण आपण केवळ स्त्रीच्या जन्माला आलों एवढ्यानेंच क्यूरीनायडू झालों अशा भ्रमानें झपाटलेल्या दोन चार कुमारिकांनीं लगेच किंकाळ्या ठोकल्या, 'पहा हो पहा, हे पुरुष कसे आप्पलपोटे आहेत तें. आम्ही स्त्रिया पुरुष करतात तीं सर्व कामें करूं शकूं !' तुम्ही मुळींच करूं शकणार नाहीं, हें त्याला उत्तर आहे. आणि पुरुषांचीं कांहीं कामें तुम्ही करूं शकणार नाहीं यांत कोणत्याही प्रकारचा कमीपणा नाहीं. पुरुषानांहीं स्त्रियांचीं कांहीं कामें कधींच करतां येणार नाहींत. सुमाता होण्याचा मान नेहमी स्त्रीलाच मिळेल; पुरुष कितीही थोर झाला तरी त्याला कधींही मिळणार नाहीं. रशियांत स्त्रियांना संपूर्ण समता आणि संपूर्ण स्वातंत्र्य देण्यांत आलेलं आहे. पण एका प्रख्यात रशियन शास्त्रज्ञानें आपल्या 'बायालॉजिकल् ट्रॅजेडी ऑफ् वुमन्' या पुस्तकांत हीच गोष्ट स्पष्ट केली आहे, पुरुषांची बरोबरी म्हणजे पुरुष करतील तें मी करणार असं म्हणणाऱ्या स्त्रिया, शेजारणीनें सरी घातली म्हणून स्वतःचा गळा, सरीशिवाय शेजारणीच्यापेक्षां शतपट सुंदर दिसत असतांही, दोरी घालून ज्याला फांस लावणाऱ्या स्त्रीच्याच जातीच्या होत.

पुरुषांची बरोबरी या शब्दाचा अर्थच या असल्या स्त्रियांनां कळत नाहीं, हेंच खरें. 'माझ्या सर्व मोठेपणाचं श्रेय माझ्या आईला आहें,' असं म्हणणाऱ्या नेपोलिअनची आई पुरुषांच्या बरोबरीची नव्हती असं कोण म्हणेल ? मुलांचं उत्तम पालन पोषण करून देशाला एक दोन चांगले नागरिक देणारी स्त्री, पुरुषांच्या बरोबरीनें कचेरींत काम करून पुरुषां इतकाच पगार मिळवणाऱ्या स्त्रीपेक्षां कोणत्याही प्रकारें कमी प्रतीची आहे असं समजण्याचं कारण नाहीं; किंबहुना ती कांकणभर सरसच ठरेल. सुशिक्षित स्त्री ही अधिक चांगली माता होण्याचा संभव, पण सुमाता होण्यापेक्षां पगार अधिक महागाई मिळवण्यांत आपण मोठा पराक्रम केला आणि पुरुषांच्या बरोबरीला आलों, असं समजणाऱ्यांचा शहाणपणा काय वर्णावा ! पुरुषांचीं कामें स्त्रियांनीं करूं नयेत किंवा चूल आणि मूल हेंच स्त्रियांचें क्षेत्र असें माझें मुळींच म्हणणें नाहीं. ज्या स्त्रियांनां जमेल त्यांनीं पुरुषांचीं कामें खुशाल करावीं. पण असलीं कामें करण्यांतच समता आणि स्वातंत्र्य आहे ही कल्पना चुकीची आहे. अशा स्त्रिया केव्हांही थोड्याच असणार, आणि स्त्रियांच्या कर्तृत्वाचं क्षेत्र यांहून किती तरी मोठं आहे.

बॅरींच्या नाटकांतल्या एका नायिकेची मला इथें आठवण होते. दिसायला सामान्य, शिक्षणानें ही ती सामान्यच होती, पण आपली शक्ति ती जाणून होती; पुरुषांशी भलतीच बरोबरी करण्याचा तिला हव्यास नव्हता. तिचा नवरा पार्लमेंटचा सभासद झाला, मोठेपणाला चढला. पार्लमेंटासाठीं त्यानें लिहिलेल्या भाषणांत ती बारीक सारीक फेरफार सुचवी; पण त्यामुळेंच भाषण रंगे. अर्थात त्याला तें सर्व स्वतःचंच मोठेपण वाटे. त्याच्या त्या समजुतीला ती उत्तेजनच देई. एका चटोर पोरीच्या तो प्रेमांतही पडला. त्या पोरीच्या संगतींत रहायला या बाईनें त्याला खुशाल परवानगी दिली. चार दिवसांत तो कंटाळेल याची तिला पूर्ण खात्री होती. त्याला काय हवं, काय नको, त्याच्या स्वभावाचे खांचखळगे काय आहेत, हें आपणाला माहीत आहे, त्या पोरीला मुळींच माहीत नाहीं याची तिला पूर्ण खात्री होती. त्या पोरीच्या संगतींत राहून त्यानें लिहिलेलें भाषण पार्लमेंटांत सपशेल पडलें. पूर्वीच्या त्याच्या भाषणांत मधून मधून ज्या सुंदर, सर्वांच्या अंतःकरणाच्या पकड घेणाऱ्या घरगुती छटा असत त्या या भाषणांत मुळींच नव्हत्या. असं पार्लमेंटांतले त्याचे मित्र आणि पुढारी म्हणूं लागले. त्याच्या डोक्यांत प्रकाश पडला. त्या पोरीचा त्याला वीट आला. नाक धरून तो बायकोकडे परत आला. या नाटकाला बॅरीनें नांव दिलें आहे—' जें प्रत्येक स्त्रीला माहीत असतें.' प्रत्येक स्त्रीला हें माहीत असतेंच असें नाहीं. असायला पाहिजे एवढं खरं.

---

## "Oh, Hell !"

" माझे हे पति, मित्र हे "—परिचया देई करूनी वधू;
हस्तांदोलन हो,—सगर्व पतिच्या आनंद राजे मुखीं.
मित्राच्या हृदयांतुनी परि स्मृती ज्या दाविती वांकुल्या,
एकेक स्मृति त्यांतली पति-मुखा ' *oh hell !* ' म्हणाया पुरे.

—बा. सी. मर्ढेकर

अनुक्रमणिका




# PRODUCTION NOT PREDICTION

WITH

*Full determination and confidence in ourselves having received the training in various departments of FILM PRODUCTION, DIRECTION, and CINEMATOGRAPHY under the able supervision and guidance of Mr. V. SHANTARAM, the ace-director of India, we not only predict to give you the best but promise to keep the name of our great master in High esteem by giving you the best production of all times. Mind it is not a*

**PREDICTION BUT A PRODUCTION**

K. T. ADVANI, F. A. I.
K. K. MALHOTRA, F. A. I.

UNDER PRODUCTION

## "ONCE UPON A TIME"

IN HINDI

PRODUCTION CHIEF
P. BHARUCHA

—DIRECTION—
KRISHAN ADVANI

CAMERA
K. K. MALHOTRA

अनुक्रमणिका









# खंवचट तिळगूळ

— कै. वा. म. जोशी —

जड जनां जड तिळगुळ। जडीं द्यावा जो निष्फळ।
स्नेह मधुर, हृदय विमल। अमूर्त तिळगुळ अजडांसि रुचे ॥
दुसऱ्या 'वर्षा' ऐसा तिळगुळ। मनें निर्मिलें देतां विपुल।
अव्हेरिला तो त्यांनीं सकल। अन्योच्छिष्ट म्हणोनियां ॥
दुसऱ्या तिळगुळा कारणें। प्राप्त झालें शोध करणें।
सादर आणि सोत्साह मनें। चिंतीतसे उपाय ॥
परी स्निग्ध विमल अजड तिल। शोधूं जातां यत्न विफल।
मन तेधवां दुःखाकुल। काय करूं असें म्हणे ॥
तंव एक म्हणे वर्ग देख। गुणराशीच सत्य लेख।
गुणांतून तिलोत्तम निःशंक। मनें घेईं अनंत ॥
सत्वगुणांच्या अनंत राशि। चमकती चांदण्या हृदयाकाशीं।
चांदण्यांमाजी तिळांची कैशी। प्राप्ति मजशी होइल ? ॥
दोष तामस असतील जरी। तिळ अनेक मिळतील तरी।
परी दिसेना दोष तिळभरि। तोहि मार्ग खुंटला ॥
तिलाभावीं तिळगुळ। वृक्ष जेंवि नसतां मूळ।
पाकळ्या नसतां किंवा फूल। तेंवि विपरीत निश्चित ॥
हें जाणोनि सोडा खूळ। किंवा अ-जड आणा तिळ।
ते मिळतील तरी तिळगूळ। मिळेल पुष्कळ, तुम्हां आम्हां ॥
असो आतां हें माझें पुराण। कुकाव्य-देवतेचें पूजन।
अनर्थ अक्षरांचें वमन। करुनि हें केलें असे ॥
चांभार देवा खेटर पूजन। याचि न्यायें मौर्ख्य-वमन।
करीतसे वाम वामन। देवता ती रुष्ट होवो ॥
करुनि खटपट लटपट। केला ग्रंथाचा शेवट।
तिळगूळ ऐसा खवचट। पुरे पुरे पुरे हा ॥

—वाम वामन



# धंदा आणि जीवन

## —मो. ग. रांगणेकर

[ माणूस मोठा होऊन मेला म्हणजे त्याच्या हयातींतल्या चिल्लर गोष्टींनाही भलतेंच महत्त्व प्राप्त होतें. विशेषतः, लेखकांच्या बाबतींत याचें मोल फार. त्यानें खरडलेल्या कसल्याही अपूर्ण गचाळ लेखानांही त्याच्या मृत्यूनंतर भलतेंच मोल येऊन, त्याचेंही उगाचच कौतुक केलें जातें. कर्मधर्मसंयोगानें मीं पुढें मागें मोठा लेखक झालों, तर माझ्यानंतर माझें कौतुक केलें जावें म्हणून मीं खालील नमुन्याचे कांहीं लेख अपूर्ण स्थितींत लिहून तयार ठेवीन म्हणतो ! ]

**म्हणजे त्याचें असें झालें—**

सिनेमा धंद्यांत त्यानें अत्यंत कसबी व व्यवहारनिपुण असा लौकिक पैदा केला होता. त्या धंद्याशीं संबंध असलेलें निरनिराळे लोक त्याच्या भोंवतीं सदा घोंटाळत असत व कांहीं काम मिळवीत असत. लिथो प्रेसचा मालक, जाहिरात एजंट, थियेटर-वाले, ब्लॉकमेकर, वर्तमानपत्रवाले वगैरे सिनेमा धंद्यावर जगणारे निरनिराळे लोक दररोज त्याला सलाम करून त्याच्या प्रकृतीची चौकशी करीत असत ! ही संवय त्याच्या इतकी आंगवळणी पडली होती, कीं एखाद दिवशीं कोणीही हजेरी देण्यास चुकला, तर त्याच्यावर त्याची मर्जी खप्पा होत असे.

आणि एक दिवस असा आला; कीं त्याच्या घरीं बरेच दिवस येऊन राहिलेला त्याचा म्हातारा चुलता दम्यानें मेला. ही बातमी वाऱ्यासारखी पसरली—म्हणजे त्यानें आपल्या कचेरींतील नोकरां-कडून सर्वांना कळवली. त्याबरोबर कित्येक वर्तमानपत्रकार आपल्या हातांतलें काम टाकून त्याच्या घरीं धावले. ब्लॉकमेकर्सनीं त्याच्या चुलत्यांच्या फोटोचे ब्लॉकस् तयार करून बिल खिशांत घालून नेलें, जाहिरात एजंट दाढी न करतां चेहरा काळवंडल्यासारखा करून त्याच्या घरीं गेले. अशा तऱ्हेनें तासा दोन तासांनीं त्याच्या घरीं पांच पन्नास मंडळी हांहां म्हणतां जमली. त्याच्याकडे पाहातांच जणू काय त्यांतील प्रत्येकाचाच चुलता मेला असावा, असें एखाद्याला वाटलें असतें. सगळे जण त्या चुलत्याच्या प्रेता-सारखेच चुप बसले होते. कारण त्यांचा पोशिंदा समोरच्या आरामखुर्चीवर गंभीर चेहऱ्यानें बसला होता. सर्वजण त्याच्या तोंडून एखादा शब्द बाहेर पडतो कीं काय, या उत्सुकतेनें त्याच्या चेहऱ्याकडे मधून मधून पाहात होते.

दोन तास झाले. सगळ्यांनाच बसून राहाण्याचा कंटाळा येत होता. पण तो चेहऱ्यावर व्यक्त केला तर पुढें आपल्याला त्याच्या-कडून काम मिळणें अवघड होईल म्हणून ते सारेच जण मोठ्या प्रयासानें सतरंजीवर हालचाल न करतां पुतळ्यासारखे बसून राहिले होते. एका वर्तमानपत्रवाल्याचा हात तपकिरीच्या बाटली साठीं पुन्हां पुन्हां खिशाकडे जात होता आणि एका ब्लॉक-मेकरची नजर त्या हॉलमध्यें टेबलावर ठेवलेल्या सिगरेटच्या डब्याकडे पुन्हां पुन्हां जात होती. एकाला खोकला येत होता, पण त्यामुळें तेथील शांतता भंग पावेल म्हणून तो आंतल्या आंत गुदमरत होता आणि दुसरा एकजण सर्दीमुळें येणारी शींक दाबतानां वेडेवांकडे चेहरे करीत होता.

अखेर त्या चुलत्याचें प्रेत उचलण्यांत आलें, तेव्हां सर्वांनीं त्या घरांतल्या मंडळींपेक्षांही वाईट चेहरे करण्याची चढाओढ चालवली. आरामखुर्चीवर बसलेल्या आपल्या पोशिंद्याला उठतांना



ती हसली...    तोहि हसला...    तिनं जवळ बोलाविलं    आणि एक ठेवून दिलं—

कारण? पान २४ वर पहा.

मदत करण्यासाठीं कांहींजण पुढें आले, तसेंच कांहीं जण एक-मेकाला मागें ढकलून प्रेताला खांदा देण्यासाठीं पुढें सरसावूं लागलें आणि हें आपल्या पोशिंद्यांच्या लक्षांत यावें म्हणून खटपट करूं लागले !

पण तो निर्विकार होता. तो चुलता बरींच वर्षें दम्यानें खिळून पडला असल्यामुळें त्याच्या आजच्या मरण्याचें त्याच्या दृष्टीनें विशेष महत्त्व नव्हतें. आणि शिवाय आज संध्याकाळीं एका उत्तर हिंदुस्तानांतल्या फिल्म कंपनीचा नवीन तयार झालेला बोलपट विकत घेण्याचा करार त्याला करावयाचा होता, तो थोडक्यांत कसा 'पाडतां' येईल याचा विचार यावेळीं त्याच्या मनांत घोळत होता. पण हा विचार करीत तो प्रेत-यात्रेबरोबर चालत असतांना देखील नेहमींच्या मंडळींपैकीं कोण कोण येण्याचे राहून गेले आहेत, हेंही मागे वळून तो मधून मधून पाहात होता. मागून चालणाऱ्या मंडळींतही आपापसांत ही कुजबूज चालू होती. अमुक वर्तमानपत्रकार प्रेतयात्रेला हजर नसल्यामुळें, या पुढें त्याच्या वर्तमानपत्राची जाहीरात बंद होणार असा ते अंदाज करीत होते. ज्यांना त्याच्या घरीं पोचण्यास उशीर झाला होता असे कांहींजण रस्त्यांत त्या मिरवणुकींत गुपचुप दाखल होऊन, आपणांकडे त्याचें लक्ष जावें व आपली हजेरी नमूद केली जावी, या हेतूनें त्याच्या दृष्टीच्या टप्प्यांत येण्याचा प्रयत्न करीत होते, आणि—अमुक अमुक आला नाहीं काय असें आपापसांत पण त्याच्या कानीं पडावें—अशा आवाजांत एकमेकाला विचारीत होते. आणि अशा रितीनें गैरहजर माणसांबद्दल आपला खाजगी सूड उगवीत होते.

कांहीं जणांची तर यापुढें मजल जात होती. नेहमीं मोटारीं-तून तो फिरत असल्यामुळें प्रेतयात्रेबरोबर पायीं चालण्यानें त्याचे पाय दुखले असतील या विचारानें "खांद्यावर बसतां काय ?" असेंही एक दोघांनीं त्याला विचारलें. पण त्यांच्या ह्या लाचारपणाबद्दल नुसतें आपलें ठरावीक स्मित करून त्यानें नकार दर्शविला. पण यामुळें खजिल न होतां, प्रेतयात्रा ठराविक ठिकाणीं थांबून तो खालीं बसतांच, त्यांनीं त्याचे पाय चेपण्यास सुरवात केली व चेपतांचेपतां आपल्या वर्तमानपत्राचा दिवाळी अंक निघणार असल्याचें त्याच्या कानीं घातलें. लगेच त्यानें जाहिरातीच्या दराबद्दल चौकशी केली व पंचवीस टक्के कमिशन कापून त्यांना फुलस्केप जाहीरात देऊन टाकली !

त्यांच्या ह्या सेवेचें त्यानां फळ मिळालेलें कळतांच इतरजण पुढें सरसावण्यासाठीं निमित्त शोधूं लागले. कोणी त्यानां चहा आणूं का ? विचारलें; तर कोणीं इतका वेळ खिशांत ठेवलेला सिगरेटचा 'टिन' त्याच्यापुढें केला. त्यांतलीं एक सिगरेट त्यानें घेतांच, दुसऱ्यानें झर्रकन काडी पेटवून सिगरेटला लावली आणि तिसरा एकजण राख टाकण्यासाठीं आपली टोपी हातांत उलटी घेऊन त्याच्या शेजारीं उभा राहिला ! (अपूर्ण)

[ लेखाच्या आरंभी खुलासा केल्याप्रमाणें हा लेख मी मुद्दामच अपूर्ण ठेवला आहे.—आणि तो मी माझ्या ह्यातींत पूर्ण करणार नाहीं, हें सांगावयास नकोच ! ]

---



---

पान २३चें उत्तर—

त्यानें तिच्याशी लगटपणा केला म्हणून नव्हे तर हसतांना त्याचे दात जे दिसले ते 'हारबिंजर'च्या 'टस्का' टुथपावडरने घासलेले नव्हते म्हणून !

# ॥ गाथा सप्तशति ॥

स. आ. जोगळेकर

एम. ए. एल्एल्. बी.



• • प्राकृत महाराष्ट्रीय भाषेंतील बहुशः हा पहिलाच ग्रंथ आहे; त्यांत महाराष्ट्रीय जनतेचें नैसर्गिक जीवन प्रामाणिकपणें प्रतीत झालेलें आहे आणि श्राव्य भावगीतांची आधुनिक महाराष्ट्रीय परंपरा अत्यंत प्राचीन कालपर्यंत नेऊन पोंचविणारी साधनसामुग्री या लोकगीतांत आहे. अशा या अद्वितीय ग्रंथाचा ओझरता परिचय या लेखांत करून देण्यांत आला आहे.

सातवाहन या महाराष्ट्र महावंशांतील सतरावा राजा हाल यानें सुमारें दोन हजार वर्षांपूर्वी संपादित केलेला गाथासप्तशती हा काव्यकोश प्राचीन प्राकृत वाङ्मयांत अग्रगण्य आहे; काळाच्या आणि गुणांच्याहि दृष्टींनीं. सातशें भावगीतांचा हा संग्रह समजण्यास सोपा आहे, श्लेष अगदीं थोडे आहेत, विषय मुख्यत्वें करून शृंगारिक आहे; तरी त्यावर आजवर कमींत कमी पंधरा टीका उपलब्ध झाल्या आहेत. अलीकडे क्रमीक पुस्तकांवर अनेक पोटभरू अध्यापक जुजबी टीका लिहितात, त्यांच्या संख्येवरून मूळ ग्रंथाच्या लोकप्रियतेबद्दल निष्कर्ष काढतां येणार नाहीं. गाथासप्तशतीवरील टीका अशा नाहींत. या लोकगीतांचा ध्वनितार्थ व्यक्त करण्यासाठीं अगर रसग्रहणांसाठीं या टीका वेळोवेळीं देशोदेशींच्या रसिक पंडितांनीं लिहिल्या आहेत. अमर, निर्दोष व अश्लीलतेपासून अलिप्त सुभाषित गीतांचा कोश, असा प्रस्तुत ग्रंथाचा उल्लेख बाणभट्टानें केलेला आहे. काव्यप्रकाश, सरस्वतीकण्ठाभरण यांसारख्या साहित्यशास्त्राच्या तात्विक ग्रंथांत यांतील अनेक गीतें उदाहरणांदाखल ऊधृत करण्यांत आलीं आहेत. साधारण जनतेला जें प्रिय वाटतें त्याचें अभ्यासजड विद्वानांना बहुशः वावडें असतें; केवळ नाक मुरडण्याचें साहित्य एवढेंच लोकप्रिय वाङ्मयाचें, अशा विद्वानांच्या जगांत स्थान असतें. सुदैवानें विद्वानांप्रमाणेंच सामान्य जनतेलाहीं प्रिय झालेल्या ह्या ग्रंथाची आधुनिक महाराष्ट्राला फारशी माहिती नसावी ही दुर्दैवाची गोष्ट आहे. आपणां महाराष्ट्रीयांना तर हा ग्रंथ विशेष भूषणावह आहे. कारण याची रचना महाराष्ट्रांत झाली; प्राकृत महाराष्ट्री भाषेंतील बहुशः हा पहिलाच ग्रंथ आहे; त्यांत महाराष्ट्रीय जनतेचें नैसर्गिक जीवन प्रामाणिकपणें प्रतीत झालेलें आहे आणि श्राव्य भावगीतांची आधुनिक महाराष्ट्रीय परंपरा अत्यंत प्राचीन कालपर्यंत नेऊन पोंचविणारी साधनसामुग्री या लोकगीतांत आहे. अशा या अद्वितीय ग्रंथाचा ओझरता परिचय या लेखांत करून देण्याचें योजलें आहे.

सातवाहन वंशांतील पहिला राजा सिमुक ऊर्फ श्रीमुख हाच मृच्छकटिकाचा कर्ता राजकवि शूद्रक असावा असा अनेक विद्वानांचा अभिप्राय आहे; पण निश्चित पुराव्याचे अभावीं हा निष्कर्ष अद्याप सर्वमान्य झालेला नाहीं. साहित्यिक परंपरा असलेल्या या महावंशांतील "कविवत्सल" हाल राजानें स्वतःच्या व आपल्या आश्रयाला असलेल्या कवींच्या "एक कोटि गाथा जमविल्या आणि त्यांतून अलंकारांनीं सजलेल्या अशा सातशें गाथा निवडून त्यांचा हा संग्रह केला," असें प्रस्तुत ग्रंथाच्या प्रास्ताविक भागांत वचन आहे. हाल राजा खरोखरीच कविवत्सल होता. प्रबन्धचिंतामणींत आख्यायिका आहे कीं हाल राजानें चार कोटि सुवर्णमुद्रा देऊन चार गाथा मिळविल्या. तो असा दानशूर होता, म्हणूनच त्याच्या कारकीर्दींत साहित्यिक नवयुग सुरू झालें. या हाल राजाच्या जीवनावर लिहिलेलें एक प्राकृत महाकाव्य अलीकडेच उपलब्ध झालें आहे. या आख्यायिका बनावट असल्या पाहिजेत असें मानणारे संशोधक आहेतच. हा संग्रह प्रथम कविवत्सल नांवाच्या कवीनें केला आणि हाल राजानें त्यावरून हात फिरवून त्यांत स्वतःचीं कांहीं गीतें भरीस घालून प्रचलित गाथाकोश सिद्ध केला, असें डॉ. गोपालाचारि म्हणतात! बाणभट्टानें उल्लेखिलेल्या ग्रंथाचें नांव 'गाथाकोश' असून प्रस्तुत ग्रंथाचें तसें नांव नसल्यामुळें तो ग्रंथ हा नसावा, असा

डॉ. देवदत्त भांडारकर तर्क करतात. सुदैवानें खुद्द भांडारकर इन्स्टिट्यूटच्या संग्रहींतच गाथाकोश व शालिवाहन कोश असें नांव असलेलें गाथासप्तशतीचें एक प्राचीन सटीक हस्तलिखित आहे. सप्तशतक हा संग्रह हाल सातवाहनानेंच तयार केला अगर तो त्याच्याच आश्रयाखालीं तयार झाला असला पाहिजे, असें डॉ. व्हिन्सेंट स्मिथ यांचें मत आहे, व तेंच बरोबर आहे. बाण, मेरुतुंग हे कांहीं सातवाहनांचे आश्रित नव्हते कीं त्यांनीं हा गीतसंग्रह हालाच्या नांवावर दडपून द्यावा.

सातवाहनांचे अंतःपुरांतील व्यवहार प्राकृत भाषेंत चालत, अशी आख्यायिका राजशेखरानें नमूद केली आहे. वसंतोत्सवांत जलक्रीडा करीत असतांना आपल्या सुसंस्कृत राणीचें बोलणें न समजल्यामुळें सातवाहनाचा उपहास झाला; यामुळें व्यथित झालेल्या राजाला शर्ववर्म्यानें कातंत्र व्याकरणाचे सहाय्यानें अल्पकाळांत सुसंस्कृत केलें—ही आख्यायिका कथासरित्सागरांत आहे. बृहत्कथा हा पैशाची प्राकृतांतील कथासंग्रह गुणाढ्यानें सातवाहन राजाला अर्पण केला होता. बृहत्कथा व कातन्त्र व्याकरण यांबद्दलच्या आख्यायिका हाल राजाला अनुलक्षून असाव्या असें गृहीत धरणें योग्य होईल, असें डॉ. स्मिथ यांचें मत आहे. पंतजलीचे नेतृत्वाखालीं अवन्ती व महाराष्ट्र देशांत अश्वमेध संस्थेचा पुनरुद्धार झाल्यानंतर समाजांत शास्त्रीपंडितांना व दरबारांत संस्कृत भाषेला विशेष महत्व आलें असणें संभवनीय आहे. तरीही सातवाहनांच्या दरबारांत, अंतःपुरांत व प्रजेच्या व्यवहारांत महाराष्ट्री प्राकृत भाषा चालत असे, असें मानण्यास भरपूर पुरावा आहे. सातवाहनांचा अस्त झाल्यानंतर दरबारची व वरिष्ठ वर्गाची भाषा संस्कृत आणि स्त्रियांची व सर्वसाधारण जनतेची प्राकृत, असा भेदभाव निर्माण झाला. हाल राजाबद्दलच्या आख्यायिकांमध्यें संस्कृत व प्राकृत या भाषांमधील स्पर्धेचा इतिहास बीजरूपानें आढळतो. त्याच्या अंतःपुरांतील व्यवहार प्राकृतांत चालत, हें राजशेखर मुद्दाम सांगतो, कारण ही परिस्थिति अपवादात्मक असली पाहिजे. जणूं राणीशीं राजा प्राकृतांत बोलला तर तें असभ्य अगर ग्राम्य व संस्कृतांत बोलला तरच तें सुसंस्कृत ! आपल्या छोटयाशा जीवनक्षेत्रांतील व घरकुलांतील व्यवहार आंग्ल भाषेंत चालविण्याची खटपट करणारे महापण्डित आपल्या आठवणींत अगर डोळ्यांसमोर आहेतच. संस्कृत भाषेला व संस्कृतीला सातवाहन कांहीं परके नव्हते कीं हिंदी मुसलमान अरबी भाषेबद्दल व संस्कृतीबद्दल दाखवितात तसा त्यांनीं कृत्रिम अभिनिवेश दाखवावा. बोलून चालून परक्या असलेल्या क्षत्रप राजांनीं संस्कृत भाषेचा जाणून बुजून पुरस्कार केला. कारण भारतीय जीवनांत समाविष्ट होण्यासाठीं त्यांना वरिष्ट वर्गाचा आधार व पाठींबा हवा होता. अव्वल मुसलमानी अगर इंग्रजी अमदानींत शास्त्री पंडितांच्या अदूरदर्शी दुर्लक्षामुळें मातृभाषेला आलेली निकृष्टावस्था नष्ट करून तिला चैतन्यपूर्ण करण्यासाठीं त्या त्या काळच्या मातृभाषाभिमानी साहित्यिकांनीं उपहास सोसूनही कार्यसिद्धी केली, जनतेचे विचार व भावना सशब्द व चिरंजीव केल्या आणि महाराष्ट्र महोदयाचा पूर्वरंग थाटला—हा इतिहास आपणांस विदितच आहे. हाल राजाचा उद्योग अशाच प्रकारचा असावा. जिवंत समाजांत सळसळणाऱ्या भावना ज्यांमध्यें व्यक्त झाल्या आहेत अशा गाथा त्यानें केल्या, करविल्या व प्रचलित असलेल्या लोकगीतांचा संग्रह केला. त्यावेळच्या परिस्थितीबद्दलचा उल्लेख प्रस्तुत ग्रंथांत आहे. "आबालवृद्धांना सहज समजणारें, सर्वांना आनंद देणारें, अमृतासारखें रसाळ प्राकृत काव्य वाचीत नाहींत अगर गाइलें जात असतांना ऐकत नाहींत आणि " आपल्या विद्वत्तेचें अगर रसिकपणाचें प्रदर्शन करण्यासाठीं "कामशास्त्रांतील तंत्राची कोरडी चर्चा मात्र करीत बसतात, त्यांना लाज कशी वाटत नाहीं ? " अथवा, चार अर्धवटांनीं परस्परांवर पाण्डित्याचा आरोप करून शेवटीं सर्वांनींच विद्वान व्हावयाचें, जिवंत जगाला विन्मुख होऊन आपल्या पुरतेंच कृत्रिम जग निर्माण करून त्यांत गंभीर अगर आंबट तोंड करून रंवथ करीत बसावयाचें—अशी परंपरा असणाऱ्या विद्वानांचा वृंद चैतन्यपूर्ण जीवनाप्रमाणेंच लज्जेलाही पारखा व्हावा, यांत आश्चर्य तें कोणतें ? रसाळपणांत अमृताशीं स्पर्धा करणाऱ्या प्राकृत काव्याबद्दलचे प्रस्तुत गाथेंतील उद्गार वाचून अमृतातेंही पैजा जिंकणाऱ्या ज्ञानेश्वरांच्या उद्गारांची कोणाला आठवण होणार नाहीं ? आणि शिक्षित व म्हणून सुसंस्कृत म्हणविणारे लोक ज्ञानेश्वरांसह सर्व महाराष्ट्रीय कवींची अगदीं अलीकडेपर्यंत अवहेलना करीत नव्हते काय ?

गाथासप्तशतींतील भौगोलिक उल्लेखांवरून अनुमान काढतां येतें कीं या संग्रहाची रचना विन्ध्य व गोदावरी यांचें दरम्यानच्या प्रदेशांत झाली असली पाहिजे. गोदावरीच्या खोऱ्यांतला नाशिक नजीकचा गोवर्धन प्रांत आणि प्रतिष्ठान राजधानी हीं सातवाहनांच्या इतिहासांत प्रसिद्ध आहेत. ह्या प्रदेशांतील सृष्टिसौंदर्याचीं वर्णनें पहा : विन्ध्य पर्वताची शिखरें काळीभोर झालेलीं पाहून विरहिणीला वाटतें पावसाळ्याच्या प्रारंभीचे ढगच डोंगरांवर दाटले आहेत—आणि आशा वाटते कीं आतां लवकरच पति प्रवास संपवून घरीं परत येईल—पण हाय—उन्हाळ्यांतल्या वणव्यांच्या धुरामुळें पर्वतशिखरें धूसर झालीं आहेत असें सांगण्यांत आल्यावर ती निराश होते. त्यांवर ढग खरोखरच जमतात तेव्हां कवींला तें विन्ध्य पर्वताच्या वल्कलासारखें वाटतात. डोंगरांवर जमणाऱ्या हत्तींच्या कळपांसारखे



अनुक्रमणिका

असतात. गोदावरीच्या कांठच्या प्रदेशाचीं वर्णनें पाहून तर वाटतें कीं सांजसकाळ गोदातीरीं जाणाऱ्या लोकांचे हे उद्गार असले पाहिजेत. गोदातीरावरील सर्व झाडींतल्या मधूक वृक्षाच्या फांद्या फुलांच्या भारानें जमीनीपर्यंत लवल्या आहेत, तीं वेंचण्याच्या निमित्तानें पण वस्तुतः अभिसरणासाठीं तेथें जाणाऱ्या तरुणी विनवितात, कीं हे मधूक वृक्षा, तूं आपलीं फुलें हळूं हळूं जमीनीवर टाक, म्हणजे ती वेंचावयास वेळ लागेल आणि राईंत रेंगाळण्यास सबब मिळेल. स्त्रीपुरुषांना प्रिय असलेल्या गोदातीराला सर्वांचीं रहस्यें माहीत असणारच. पावसाळ्याचे दिवस, गोदावरीला बेफाम पूर आला होता, मध्यरात्रीची वेळ, पण संकेत तर पैलतीरावर ठरला होता, मग काय करणार ? ती पोहून पलीकडे गेली. ती म्हणते, " माझें साहस व त्याचें भाग्य गोदातीराला व पावसाळ्यांतील मध्यरात्रीला माहीत आहे." प्रवाह ओलांडतांनाही आठवण ठेवण्यासारखे प्रसंग घडतातच. उतार अवघड असल्याचें निमित्त करून एकीनें आपला भार सोबतीला आलेल्या इसमाच्या अंगावर टाकला, आणि केवळ अनुकम्पेमुळें त्यानें तिला सांवरून धरलें–कवि म्हणतो, हें आलिंगन खरोखरीच निष्पाप आहे !–अगदीं चालू जमान्यांतील पवित्र गुन्ह्यांसारखें.

गाथासप्तशतींत नागरिक स्त्री-पुरुषांच्या मदिरासक्तीचेही वरेच उल्लेख आहेत, मद्यपान हें त्या काळांत निंद्य व्यसन मानलें जात असावें असें वाटत नाहीं. प्रिया रूसली होती, दयितानें तिचें मुख जबरदस्तीनें वर केलें व तिला मदिरेचा घोट पाजला; कवी म्हणतो, " रुसव्यावर असें दुसरें उत्कृष्ट औषध नाहीं." आणि हें औषध पेल्यांतूनच पीत नसत. " प्रियकरानें आपल्या मुखांतून दिलेलीं मदिरा मानिनी थोडी थोडी पीत आहे." दारू जितकी जुनी व मुरलेली तितकी ती अधिक रूचकर असें आपण पाश्चात्य वाङ्मयांत वाचतों; त्या काळांतही हा गुण माहीत होता. कवि विचारतो–" ती तरूण आहे व स्वतंत्र आहे, तिचा नवरा म्हातारा आहे व गांवांत पुष्कळ तरूण आहेत, वसंत ऋतु आला आहे व तिच्या संग्रहीं जुनी दारू आहे; अशा परिस्थितींत तिनें अ-सती होऊं नये, तर काय मरावें ?" सोंगट्यांचा खेळ त्या काळांतही प्रिय होता. कवि म्हणतो, " पटावर घरोघर हिंडणाऱ्या सोंगटीप्रमाणें ती भटकत आहे, त्वरा कर नाहींतर कोणी तरी फांसा टाकून तिला खाऊन टाकील." स्त्रिया हातांना धातुरंग व पायांना लाक्षारस लावीत-इतकेंच नव्हे तर ओठांनाही रंग लावीत, हें वाचून पुष्कळांना आश्चर्य वाटेल. " तिच्या ओंठाना लावलेला रंग रात्रीं प्रियकराच्या ओंठांनीं पुसला गेला व सकाळीं तिच्या सवतींनीं हें पाहिलें तेव्हां तो त्यांच्या नेत्रांचे ठिकाणीं प्रकट झाला." स्त्रिया अंगाला हळद व उटणीं लावीत; हातांत जाळीच्या बांगड्या घालीत व कानांत रत्नांचे डूल घालीत; कपाळीं तिलक लावीत व कमरपट्टा घालीत. " अग्नि व वरुण यांचें व्रत केल्यामुळें कमरपट्ट्याला तुझ्या कमरेला मिठी मारण्याचें सौख्य लाभलें." वसंतोत्सव, फाल्गुनोत्सव असे उत्सव स्त्रीपुरुषांना प्रिय होते. हे दोन्ही उत्सव मदन-महोत्सवाच्या स्वरूपाचे असावेत असें वाटतें. फाल्गुनोत्सवांत अंगावर चढणारा चिखलाचा अलंकार निर्दोष असल्याचा व वसंतोत्सवांत कुसुंब्याच्या रंगानें भिजलेल्या चोळ्या धारण करणाऱ्या तरुणींचा उल्लेख आढळतो. वधूला ऋतु प्राप्त झाला म्हणजे तिच्या मैत्रिणी लालभडक रंगाचा आनंदपट गांवांत मिरवीत असत. रजस्वला स्त्रिया मुखाला वर्णवृन नांवाचे हरिद्रा-मिश्रित उटणें लावीत ; आणि लगट करणाऱ्या पतीच्या अंगाला तें लागूं नये म्हणून त्या केवढी काळजी घेत. " रजस्वलेचें दर्शनही निंद्य व अमंगल " मानीत असत. अशीं धार्मिक बंधनें त्या काळीं आजच्या पेक्षां कितीतरी कडक असलींच पाहिजेत; पण बंधनें घातलीं म्हणून मनुष्यस्वभाव काय बदलतो ? एक तरुण पति आपल्या पत्नीला म्हणतो–" पुष्पवती, लोक हंसले तर हंसू देत, निंदा झाली तर होऊं दे–मला तुझ्याशिवाय झोंप येत नाहीं. इकडे ये ! "

स्त्रियांचीं, त्यांच्या व त्यांच्यावरील प्रेमाचीं वर्णनें वाचून किटून गेलेल्या आधुनिक वाचकालाही गाथा–सप्तशतींतील उद्गार ताजेतवाने वाटल्यावांचून राहणार नाहींत. हें वर्णन पहा: " काण्या डोळ्यानें बघते, लाडे लाडे बोलते, भिरीभिरी चालते, गालांतल्या गालांत हंसते—अशा स्त्रियांचें प्रेम पूर्वपुण्याईनेंच मिळतें." ओझरत्या ओळखीच्या अगर पुण्याईचे अभावीं अप्राप्य म्हणून आपण निःश्वास सोडलेल्या एकाद्या खेळकर व खोडकर आजतागायत तरुणीचेंच हें वर्णन असलें पाहिजे असें वाटत नाहीं का ? एक सुंदर व तरुण माळीण फुलें विकावयाला मंडईंत बसली होती. व " लंपट तरुण फुलांची किंमत पुनः पुनः विचारीत तिच्या भोंवतीं घोंटाळत होता." हे व असे रोज दिसणारे प्रसंग किती तरी आढळतात. स्त्रीचें आकर्षण हें तर अनंताचें रहस्य आहे. " तिचा सहवास अमृतासारखा सुखद व विरह विषासारखा असह्य वाटतो–कारण विधात्यानें अमृत व विष यांच्या मिश्रणापासून स्त्री निर्माण केली आहे." प्रत्यक्ष सहवासांतही ती किती भिन्न भिन्न रूपांत प्रकट होते ? सुरतकालीं आनंदानें गाल फुलेलेले असतात तेव्हां ती प्रियकराला शेंकडों आज्ञा देते—" एक वचनांत सुद्धां ! " मात्र सकाळ झाली कीं मान खालीं घालून ती कामाला लागते, तेव्हां तीच का ही, असा प्रश्न पडतो. " जगांत सर्व प्रकारचीं माणसें असावयाचींच, त्यांच्या भिन्नतेवरच संसारांतील सुखदुःख आधारलेलें आहे. पति प्रवासाला गेला आहे, त्याची स्त्री म्हणते—" चंद्रा, तूं मला ज्या किरणांनीं स्पर्श करतोस त्याच किरणांनीं त्यांनाही स्पर्श


अनुक्रमणिका

कर—म्हणजे तुझ्या मार्फत आमची भेट होईल." इच्छित प्रियकर प्राप्त व्हावा म्हणून एक स्त्री म्हणते, "मदनाच्या प्रेमशरांनीं तूं मला विद्ध केलेंस त्याच बाणानें तूं त्याला जखमी केलेंस तर मी जन्मोजन्मीं माझ्या पंचप्राणांनीं तुझ्या चरणांची पूजा करीन" एका बाजूला एवढी निष्ठा तर दुसरीकडे केवढा चंचलपणा. शेजारीण कशी सूचना देते पहा: "शेजाऱ्या, रात्र दुष्ट आहे, पति प्रवासी आहे, घरांत दुसरें कोणी नाहीं; जागा रहा; नाहीं तर चोर यावयाचें !" सगळाच चोरांचा बाजार. कोठें पति प्रवासाला गेला म्हणून सुकणाऱ्या सुनेचें सासू संजीवनीप्रमाणें संरक्षण करते, तर कोठें सासूबाई व सूनबाई दोघीही परस्परांना चुकवून वेळूच्या बनांत संकेत ठरवून जातात व अमलें रहस्य कोणाला कळलें नाहीं म्हणून खुशींत असतात. पण दोघींच्या अंगांना बांबूचीं पानें चिकटलेली असतात ! एका व्यभिचारिणीचें दुर्वर्तन तिच्या नवऱ्याला समजल्यामुळें त्यानें तिला एका भिकार खेड्यांत बंदींत ठेवलें; "तिला तेथील दारिद्र्याबद्दल वाईट वाटत नाहीं–आपल्यासाठीं येणाऱ्या प्रिय जनाला परत जावें लागणार याचा तिला खेद होतो." केवढे औदार्य ! तर दुसरी सुंदर, तरुण स्वतंत्र, हमरस्त्यावर राहणारी–स्वतः बिघडत नाहीं एवढेंच नव्हे तर मैत्रिणीचें शील बिघडूं नये म्हणून स्वतः शृंगार करीत नाहीं ! एक भावजय दीर ताळ्यावर यावा म्हणून लक्ष्मणाचें चित्र भिंतीवर काढते तर दुसरीला दीर वेलीच्या फोंकानें मारतो तेव्हां तिचें अंग अनुरक्तीमुळें रोमांचित होतें. गाथाकारांनीं प्रेमाचें वर्णन फार हळुवारपणें केलेलें आहे. प्रीतीच्या वक्रतेचा अनुभव नसल्यामुळें विव्हळ झालेल्या मैत्रिणीला सखि म्हणते, "प्रेमाची गति कांकडीच्या कोंवळ्या तंतूसारखी वाकडीच असावयाची." प्रेम जडायचें असलें म्हणजे तें कोणावर व कां जडेल याचा नेमच नसतो. कवी म्हणतो, "कांकडीचा वेल झाडाला बिलगतो, मग झाड जीर्ण असो अगर वेडेवाकडे असो. निळ्या कमळांच्या सुगंधानें भरून गेलेल्या शरद् ऋतुचा हा दोष." प्रियकराच्या प्रेमाला प्रियेनें योग्य वेळीं साथ दिली नाहीं आणि मागाहून त्याची लालसा धरली तर त्यांत गोडी रहात नाहीं–कवी म्हणतो–तें तापवून गार केलेल्या पाण्यासारखें बेचव लागते." प्रेम नेहमींच नाजूक असतें असेंही नाहीं. कवी म्हणतो, "प्रेम विषासारखें असह्य आहे" हें अंगांत भिनलें कीं त्यावर उतारा नाहीं.

आपला पति एकपत्नीव्रताचें पालन करणारा असावा असें स्त्रियांना खरोखरच वाटतें का ? पतीच्या नीरस निष्ठेमुळें रुष्ट झालेली सुंदरी म्हणते, "देवा, अन्य महिलांशीं माझ्या पतीचा संबंध होऊं दे, म्हणजे तरी त्यांना माझे गुण समजतील; एकनिष्ठ पुरुषांना स्त्रियांचे गुण समजत नाहींत व दोषही उमगत नाहींत." केवढा अहंकार ! आणि पतीला काय वाटतें ? "अन्य महिलेबरोबर विलास करतांना पत्नीची आठवण होऊन तो विमनस्क होतो–कारण येथें त्याला तिच्या कांहीं गुणांचा अभाव दिसून येतो." ही भ्रमरवृत्ति पुरुषांचे मनांत कां उत्पन्न होते ? "पिकलेल्या कवठाच्या वासाला लुब्ध होऊन मधुकर कमलाला सोडतो–प्रत्यक्ष स्पर्श होईपर्यंत त्याला फरक कळत नाहीं." हा दोष कोणाचा ? कवी म्हणतो–"आज ह्या, उद्यां त्या, अशा वेगवेगळ्या फुलांचा आस्वाद घेण्याची भ्रमर इच्छा करतो–हा दोष फुलांच्या नीरसतेचा–भ्रमराचा नाहीं !" एकादा भ्रमर तरी किती रसिक व कुशल ! "मालतीच्या कोंवळ्या कळीचा भार तो आपल्या घोंगावणाऱ्या पंखांनीं तोलून धरतो आणि हळुवारपणें ती उमलवून मकरन्दाचा आस्वाद घेतो." पण तो तरी तिच्याभोंवतीं किती दिवस घोंटाळणार ? "मधुकर पूर्वी मालतीशिवाय दुसऱ्या कोणत्याही पुष्पाकडे वळत नव्हता मालतीला फुलांचे ऐवजीं फळें आलीं व फुलांचा पण बहार संपला, म्हणून त्यानें तिचा त्याग केला." हें चालायचेंच. कवीच्या सृष्टींत सर्वच भावना इंद्रधनुष्याच्या रंगासारख्या मोहक व क्षणभंगुर असतात. वेगवेगळ्या अवस्थांमधील सुखदुःखें निरनिराळीं असावयाचींच. "सुनेला प्रथमच डोहाळे लागले होते; सखीनें विचारलें, तुला कशाची हौस आहे ? विचारीनें आपल्या पतीकडे चोरून पाहिलें !" विचारी, अगदीं खरें—हें किती दिवस चालणार ? "सुकुमार श्यामला प्रथमच बाळंतीण झाली होती; बारशाच्या वेळीं वल्लभाचें नांव घेण्याबद्दल तिच्या मैत्रिणी तिला आग्रह करूं लागल्या. बाळंतपणांत तिला इतका त्रास झाला होता कीं ती चिडून म्हणाली–त्याला माझा वल्लभ म्हणूं नका, मी त्याचें नांवसुद्धां घेणार नाहीं; तेव्हां साऱ्या जणी हंसूं लागल्या." हें प्रसूति–वैराग्यही क्षणिकच असतें. माता लव-

करच पुत्रसुखांत रंगून जाते. " मुलाला पहिले दांत आले आणि तो आईलाच चावला; व्रण उमटलेला गाल पतीला दाखवून ती म्हणते—घ्या–हें बघा ! "

गाथा सप्तशतींत देवादिकांचीं वर्णनें ठिकठिकाणीं आलीं आहेत. शंकर हा सर्वांत प्रिय देव दिसतो. मंगलाचरणच शिवस्तुतिपर आहे. एक कवी म्हणतो, " विपन्नावस्थेतील कुलांचा उद्धार करणें फक्त दोघेच जाणतात. एक गौरीचा हृदयेश्वर आणि दुसरा शालिवाहन राजा. " आपल्या मनोविकारांचा देवांवर आरोप करण्याची प्रथा या गाथांमध्यें बीजरूपानें आढळते. " आपण विवस्त्र आहोंत हें शंकराला दिसूं नये म्हणून पार्वतीनें त्याला बिलगून त्याच्या डोळ्यांवर हात ठेवले व कपाळावरील त्याच्या तृतीय नेत्राचें चुंबन घेतलें—" हा गाथा सप्तशतींतील प्रयोग कालिदासानें उलटा करून वापरला आहे; त्याच्या शंकराच्या तृतीय नेत्राला पार्वतीच्या चुंबनाचें सुख मिळालें नाहीं पण दर्शनाचें मिळालें ! वासुदेव कृष्णाची पूजा त्या काळांत प्रिय झाली होती. मथुरा, माळवा, महाराष्ट्र या प्रदेशांतील तत्कालीन शिलालेखांतही वासुदेवाला नमन केलेलें आढळतें. कृष्णाच्या चरित्राचा लौकिकही लोकप्रिय झाला होता. कृष्णाबद्दल बोलणें चाललें असतांना यशोदा म्हणते, " बाळ दामोदर अजून लहान आहे; तेव्हां आजूबाजूला बसलेल्या गोपी कृष्णाकडे चोरून पाहून हंसल्या ! " काळ्या विन्ध्य पर्वतावर पांढरे ढग जमले तेव्हां कवीला क्षीरसागर-मंथनाच्या वेळीं अंगावर दूध उडालेल्या कृष्णाची आठवण झाली. अग्नि हा तर कुमारिकांचा स्वामी, स्त्रियांच्या लैंगिक स्वातंत्र्याचा आद्य पुरस्कर्ता आणि प्रसिद्ध पारदारिक. ओलीं लांकडें पेटेनात म्हणून गृहिणी रागावली होती. कवी म्हणतो, " रागावूं नको. तुझ्या श्वासाला पाटल पुष्पांचा सुगंध येत आहे, त्यांचा स्वाद घेण्यासाठीं अग्नि धुराच्या रूपानें तुझ्या मुखाभोंवतीं घोंटाळत आहे; " कारण विस्तव पेटला कीं त्यावर कांहीं तरी शिजत लावून ती दुसरीकडे जाईल अशी त्याला धास्ती होती. गाथाकारांचा दीपही असाच रसिक. " तरुणांची क्रीडा पाहतांना दीप इतका तल्लीन झाला कीं तेल संपलें तरी तो तेवतच राहिला ! "

गाथाकारांचा ज्या जीवनाशीं परिचय होता तें जीवन ग्रामीण होतें. राजांचे उल्लेख अगदीं थोडे, बड्या अधिकाऱ्यांचा निर्देशही नाहीं. पाटील हा त्या काळचा ग्रामाधिकारी. त्याचे व त्याच्याबद्दल अनेक उल्लेख आहेत. गांवावर परचक्र आलें होतें. पाटील आसन्न मरण होता. गांव सोडून विन्ध्य पर्वतांत पळून जाण्याचा गांवकऱ्यांचा विचार चालला होता. त्यांना पाटलांचा एक स्नेही सांगतो—" पाटील अझून जिवंत आहेत. गांव सोडून पळून जाण्याची तुमची भाषा त्यांनीं ऐकली तर ते ताबडतोब प्राण सोडतील. " पाटील आजारी पडला तर गांवच्या रक्षणाची जबाबदारी त्याच्या पुत्रावर असे. पाटलाच्या तरुण पोरावर गांवच्या साऱ्या उनाड बायांची दृष्टि. एक पोरगा बिचारा आपल्या बायकोच्या तंत्रानें वागत असे. त्याला एक मैना म्हणते. "—तूं कडू लिंबाच्या झाडावरील किड्यासारखा आहेस. तुला त्यांतच स्वारस्य वाटतें. " आणि पाटलाच्या पोरीवर साऱ्या गांवकऱ्यांचा डोळा. कवी म्हणतो, "पाटलाची पोरगी अशी सुंदर आहे कीं सारे गांवकरी तिच्याकडे अनिमिष नेत्रांनीं पाहतात. " देव कधींच डोळे झांकीत नाहींत. या न्यायानें तिच्यामुळें " सारा गांव देवमय झाला. " खेडेगांवांत राहणाऱ्या गाथाकारांचा तेथील जीवनाशीं दाट परिचय असणारच. गाईला डोळ्याजवळ खाज सुटली म्हणजे ती काय करते हें तुम्ही पाहिलें आहे काय ? " पहा—गोठ्यांत गाय आपलें सौभाग्य प्रकट करीत आहे. बैल खट्याळ आहे तरी तिला त्याची भीति नाहीं. ती त्याच्या शिंगावर डोळा खाजवते. " माकडाला भुंगा चावला होता. त्याला झाडावर एक जांभूळ दिसलें. पण "भुंग्याच्या शंकेनें तें चमकलें, मागें सरकलें व फांदी हलवून ओरडूं लागलें. " पावसाळ्यांत मोर मान उंच करून गवताच्या टोंकावर लटकणारा पाण्याचा थेंब चोंचींत घेत होता. कवी म्हणतो–"जणूं पाचूच्या सुईनें विद्ध झालेला मोतींच तो चोंचींत घेत आहे. " झोंपडीच्या छपरापासून लोंबणाऱ्या धाग्याला कोळी लटकलेला पाहून कवीला वाटलें कीं " सूक्ष्म धाग्यांत गुंफलेलें हें बकुळीचें फूलच " आहे !

गाथासप्तशतीचें सामान्य स्वरूप हें असें आहे. प्रतिगामी वृत्तीच्या चोखंदळ वाचकांना अगर लब्धप्रतिष्ठित टीकाकारांना कांहीं गाथा अश्लील वाटण्याचा संभव आहे. हा संग्रह अश्लील नाहीं अशी बाणभट्टानें ग्वाही दिलेली आहे. पण बाणभट्टालाही चावट ठरविणारे पंडितब्रुव आहेतच. खरें पाहिलें असतां असभ्य अगर ग्राम्य, अश्लील आणि संभोगोत्तेजक अशी शृंगारिक वाङ्मयाची विभागणी करून शेवटला प्रकारच त्याज्य ठरविला पाहिजे. असो. या लेखावरून कांहीं वाचकांना तरी गाथासप्तशतीचें वाचन अध्ययन करण्याची इच्छा झाली तर हा प्रास्ताविक लेख सफल झाला असें मी मानीन.

---






— —पूना गेस्ट हौस-

लक्ष्मी रोड, पुणे.



**•• खोटं वाटेल परंतु लढाईच्या धामधुमींत आमच्या घरावर बॉंब पडून आमचा सत्यानाश होऊं दे म्हणून मी देवाला रोज नवस करीत होते. .... लढाई थांबली आहे. आतां तीहि आशा नाहींशी झाली—!**

" आज तुम्हाला असं झालं आहे तरी काय ? असं भ्रमिष्टा-सारखं काय करताहां सकाळपासून ? " सौभाग्यवतीनें हसत हसत विचारलेल्या प्रश्नानें मी बराच शरमिंदा झालो. नादांत सुपारी म्हणून तुरटीचा खडा मी अडकित्त्यानें फोडीत होतों. चूक लक्षांत येतांच मी खजील झालों खरा परंतु उसनें हास्य तोंडावर आणून बेफिकीरीच्या सुरांत म्हणालों, " नाहीं तरी सुपारीच्या डब्यांत तूं मुद्दाम टाकलेली तुरटी मला नासायची होतीच—अरे काय, याला घरांतली टापटीप म्हणतात ! उद्यां सुटे पैसे ठेवण्याच्या वाटींत तूं हिंगाचा खडा ठेवून देशील—"

· सौभाग्यवती जास्तच जोरानें हसून म्हणाली,—" अहो मग मी म्हणतें काय ! तेंच तर तुम्ही मगाशीं करून ठेवलं आहेत. दुकानांतून हिंगाची डबी विकत आणलीत—ती ठेवली आहेत कपाटांत अन् सुटे पैसे तिखटमिठाच्या पाळ्यांत टाकून दिले आहेत. इश्श ! मी आपली गंमत पहात होतें. म्हटलं, आज स्वारी कांहीं झोकून तर नाहीं आली ? निघालांत वाटतं बाहेर ! लवकर या बरं का. नाहीं तर नादांत घरीं यायचंही विसरून जाल. अन् आज मला सोमवार आहे हें विसरूं नका बरं का...."

डोक्यावर टोपी अडकावून मी लगबगीनें आधीं रस्ता गाठला. एक सुटकेचा दीर्घ श्वास सोडून मी समोर लांबच लांब पसरलेल्या रस्त्याकडे दूरवर पाहिलें. दुपारीं तीन चारच्या सुमारास जो देखावा दृष्टीस पडावा अशी आपली अपेक्षा असतें तसलाच तो देखावा होता. सकाळपासून आकाशांत ढगांची दाटी चालूच होती. परंतु त्यांतला एकसुद्धां खालीं उतरायला राजी दिसत नव्हता. आमच्या पुण्यांत पावसाच भविष्य वर्तवणारे कुडमुडे जोशी प्रत्येक गल्लींत निदान दहा-पांच तरी सहज सापडतील. त्यांचीं तोंडें पाहण्यासाठीं ढगांचीं गर्दी जमत असते—आणि घटकाभर करमणुक करून घेतल्यावर ते मेघराज हसत हसत दूरवर पळून जातात. हा नेहमींचा अनुभव असल्यामुळें मला पावसाची धास्ती बाळगण्याचें कांहींच कारण नव्हतें. पर्वतीला जाऊन शंकरांचें दर्शन घेण्याच्या धार्मिक सबबीवर घरांतून सुटका करून घेणारे शाळकरी वीर रस्त्यांतून चाललेले दिसत होते. कालव्याच्या बाजूला जाऊन शिताफळे तोडण्याच्या त्यांच्या गप्पा चाललेल्या होत्या. धार्मिकपणाची खूण म्हणून नव्हे तर हौशीचा एक सनातन प्रकार म्हणून गंधाच्या नांवाखालीं कपाळभर रंगाचा मलिदा फासलेले तेली तांबोळी वर्गाचें प्रतिनिधि हातांतले लाकडाचें किरकिरें वाजवीत चाललेले दिसत होतें. सायकली, मोटारी, टांगे यांची रहदारी नित्याप्रमाणें चालूं होती. विशेष लक्ष वेधावें असें कांहींही नव्हतें. आणि जरी असतें तरी माझें लक्ष तिकडे लागलें असतें कीं नाहीं हीच जबरदस्त शंका आहे. माझ्या डोक्यांत निराळेच विचार यावेळीं थैमान घालीत होते.

काल गोदीला पाहिल्यापासून माझें चित्त एकाएकी बिथरल्यासारखें झालें होतें. वास्तवीक यावेळीं मी रोजच्याप्रमाणें आकडेमोड करीत खडकीच्या उपटसुंभ हपिसांत त्या मोडक्या खुर्चीवर बसलेला दिसायचा. परंतु कालचा तो प्रकार मला इतका विलक्षण वाटला, इतका उद्वेगजनक वाटला कीं तो इतक्या सहजासहजीं विसरणें शक्य नव्हतें. आजच्या दिवशीं मावापसरकारचें कोणत्याहि प्रकारचें काम इमानें इतबारें करण्याच्या मनस्थितींत मी नव्हतों. ऑफिसांत रजेची चिठ्ठी पाठवून मी घरीं बसलों होतों तरीसुद्धां मला स्वस्थता मिळण्याचें चिन्ह बिलकूल दिसेना. मूर्ख बायकोच्या निष्कारण वाजणाऱ्या तोंडाला उत्तरें देण्याच्या खटाटोपांत न पडतां दूर कोठेंतरी जाऊन बसावें या विचारानें मी घराबाहेर पडलों. एकवेळ



# माती

**LIFE IS DUST**

—वि. वि. बोकील

मनांत आलें कीं गोदानें आपल्याला आग्रहपूर्वक बोलावणें केलें आहे तर तिच्याकडे जावें—पण दुसऱ्याक्षणीं तो विचार मी झटकन् डोक्यांतून काढून टाकला. जें दृश्य विसरण्या करतां मी धडपडत होतों तेंच दृश्य पुनश्च पाहण्यांत काय शहाणपणा आहे ? तोच गलिच्छपणा, तेंच नागडें उघडें दारिद्र्य, तोच जिवंत नरकवास पुन्हां अनुभविण्यास माझें मन मुळीच राजी नव्हतें. त्यापेक्षां दूर कोठेंतरी जावें—पण दूर जाऊन तरी मला विसर पडणें शक्य होतें काय ?

वाट फुटेल तिकडे मी चाललों. सुमारें अर्ध्या तासाच्या पायपिटीनंतर मी गांवापासून बराच दूरवर आलों असल्याचें मला दिसून आलें. पर्वतीची टेकडी मागें टाकून मी बराच दूर आलों होतों. माणसांची रहदारी या बाजूस विशेष नव्हती. सडकेपासून दहापांच कदमांवर पडलेल्या एक वठेलल्या झाडाच्या बुंध्याला टेकून मी बसलों. आणि जी तापदायक आठवण विसरण्याची मी मनापासून धडपड चालवली होती तीच आठवण नेमकी माझ्या डोळ्यांपुढें येऊन नाचूं लागली. आणि नकळत मीहि पण तिच्याशीं समरस होऊं लागलों—

पंधरावर्षापूर्वींची ती कथा. सोलापूरच्या रेल्वेरस्त्यावर डिकसळ म्हणून एक लहानसें स्टेशन आहे. त्या स्टेशनवर स्टेशनमास्तर म्हणून माझे थोरले बंधु होते. स्टेशन लहान असलें, आणि आजच्या परिस्थितींत त्याचें गतवैभव पार पुसून टाकण्यांत आलेलें असलें तरी एके काळीं व्यापाराचा गांव म्हणून त्या स्टेशनाला बरेंच महत्त्व होतें. ज्या काळची ही गोष्ट आहे त्या काळीं डिकसळ स्टेशनावर अत्यंत प्रामाणिकपणानें काम करूनसुद्धां दिवसाकाठीं दहापांच रुपयांचा खुर्दा कनवटीला न लावणारा स्टेशनमास्तर प्रदर्शनांत ठेवण्याच्या योग्यतेचा ठरला असता. आणि माझे बंधु धर्मराज नव्हते हें सांगितलें म्हणजे मी काय म्हणतों तें सहज लक्षांत येईल. अत्यंत व्यवहारचतुर समजल्या जाणाऱ्या मास्तराचा मी धाकटा भाऊ होतो. माझ्या दहा वर्षें उमरीच्या मेंदूला सुद्धां बंधुराजांच्या कर्तबगारीचें अपरंपार कौतुक वाटे. स्टेशनावर कामासाठीं येणारी जाणारी व्यापारी मंडळी मला कडेखांद्यावर घेत, पावशेर अर्धाशेर खडिसाखरेचा नैवेद्य अर्पण करीत यांत पुढें पुढें मला कांहींच कौतुक वाटेनासें झालें. मी त्या लोकांच्या खनपटीस बसून जादा करभार पदरांत पाडून घेऊं लागलों. मी मागेन त्या वस्तु मिळाल्याच पाहिजेत हें माझें साधें गणित होतें. आणि तें गणित विनासायास सुटत असें हें पाहून मला अत्यंत अभिमान वाटत असे. स्टेशनावर इतर लोकांची वस्ती बेताचीच होती. स्टेशनापासून गांव दोन मैल दूर होतें. त्या गांवच्या मराठी शाळेंत मी गड्याच्या डोक्यावर बसून माझ्या लहरीप्रमाणें जात असे. स्टेशनमास्तराचा भाऊ म्हणून गांवांत माझा चांगलाच वचक होता. गांवच्या रामोशाच्या हातांतील काठी हिसकावून घेऊन गणू पाटलाच्या मळ्यांतील पेरूच्या झाडांवर चार तडाखे लगावले तरी उघड उघड माझा प्रतिकार करण्याचें कुणाचेंच सामर्थ्य नव्हतें. शाळेंतील पन्नास पाऊणशें मुलें मला भीत असत हें सांगण्यांत कांहींच अर्थ नाहीं. परंतु शाळेचे ब्रह्मा, विष्णु, महेश असलेले तिघे म्हातारे मास्तरसुद्धां मला 'अहो, जाहो' करीत असत यांत काय तें ओळखा !

थोरल्या बंधूच्या कानांवर गोष्टी गेल्या नाहींत इतक्या बेतानें दांडगाई केली म्हणजे मी राजा होतों. मी म्हणेन ती पूर्व दिशा होती. शाळेंत मी जात असें. कांहींही शिकत नसे—तरी दरवर्षी नेमानें पास होत असे. त्यामुळें बंधूचा रोष उग्र स्वरुपाला फारसा गेला नाहीं. ज्या गड्याच्या डोक्यावर मी बसून जात असे त्याला मी अनेक प्रकारें छळीत असें. त्याच्या फाटक्या पागोट्याला माझें कर्तृत्व जबाबदार होतें. खांद्यावर बसल्या बसल्या त्याच्या मिशा उपटणें, त्याला चिमटे काढणें व त्याच्या पाठींत गुद्दे लगावणें हा माझा रोजचा खेळ होता. आणि मौज ही कीं रेल्वेकडून मिळणाऱ्या महिन्याकाठीं पंधरा रुपये व

अनुक्रमणिका

आणे या तनल्याकडे पाहून तो माझा छळवाद मुकाट्यानें सहन करून घेत असे. आजारीपणाचें ढोंग करून मी एकादे दिवशीं शाळेंत जाण्याचें नाकारलें तर आकाशीचा चंद्र खिशांत पडल्यासारखा त्याला आनंद वाटत असे. स्टेनमास्तरचा मी भाऊ होतो. आणि म्हणून माझा शब्द म्हणजे कायदा हें माझें साधें सुधें तत्त्वज्ञान होतें. गांवांतील मुलें मला कधींच विरोध करीत नसत. गणू पोलाच्या मुलानें एकें दिवशीं माझ्या विरुद्ध चहाडी केल्याचें माझ्या लक्षांत येतांच मी त्याला दुसऱ्या दिवशीं शाळेंतल्या चौकांत बेदम पिटलें. मी दांडगा होतों. धटिंगण होतों मारामारी करण्याची मला अनिवार हौस असे. सुदैवानें माझी प्रकृति अतिशय दणगट होती. एकादेवेळीं चिडून जाऊन बंधूनीं वेताच्या छडीनें मोजून पंधरा वळ पाठीवर ओढले तरी मी डोळ्यांतून पाण्याचा एक थेंबही न काढतां सहन करीत असे. खूप खावें, मनाला येईल तें खावें; मनाच्या लहरीप्रमाणें वागावें; आपल्या लहरीपुढें इतरांच्या लहरींचा बडेजाव कधींही चालूं देऊं नये; शाळेच्या दिवशीं गांवांत उनाडक्या कराव्यात, व सुटीच्या दिवशीं स्टेशनावर धुमाकूळ घालावा हा माझा नित्यक्रम निर्वेधपणें चालू होता.)

स्टेशनावर जी पंधरा वीस मुलें माझ्या वयाचीं होतीं त्यांचा मी उमाजी नाईक होतों. स्टेशनावरच्या गुदमांत येऊन पडलेली साखरेची पोतीं, खारकांची पोतीं, किंवा नारळांचीं पोतीं माझ्या तडाक्यांतून सहसा सुटलीं नाहींत. या साहसामधें जीं मुलें सहभागी होत त्यांना मी मनमुराद लूट मिळूं देत असे. परंतु भीतीनें जीं मुलें दूर होत त्यांना मी अन्य मार्गानें वठणीवर आणीत असे. मी करतों ती गोष्ट चूक कशी असेल ? मला तीं मुलें भिऊन असत. भीतीच्या पोटीं तिरस्कार जन्म घेत असतो. माझा तिरस्कार करणारीं मुलें मी ओळखून होतों. त्यांना जरब बसविण्याचे माझे अनेक मार्ग होते. त्यामुळें उघड विरोध असा मला कुणीच केला नाहीं. —आणि याच वेळीं गोदानें माझ्या आयुष्यांत अचानक प्रवेश केला. एकदोन दिवसांपूर्वी नवीनच बदलून आलेल्या असिस्टंट स्टेशनमास्तर देशपांडे यांची मुलगी मी एकदोनदां दुरून पाहिली होती. जवळजवळ माझ्याच वयाची असावी. गोबरेगोबरे गाल, टपोरे डोळे, बरेच दिवस केसास फणी न लागल्यामुळें झालेलें डोक्याचें शिप्तर, फाटकें पोलकें आणि धारवाडी खणाचा विटका परकर ही गोदाची पहिल्या प्रथम पाहिलेली मूर्ति अजून माझ्या डोळ्यापुढें जशीच्या तशी उभी आहे. पूर्वीच्या असिस्टिंट मास्तरांचें लग्न झालेलें नव्हतें, त्यामुळें शेजारींच असलेल्या त्यांच्या बंगल्याच्या आवारांत मोकाटपणें हिंडण्याची मला पूर्ण मुभा होती. बदलून गेलेल्या मास्तरांच्या जागीं नवीन कोण आलें आहे, त्यांच्यांत आपल्या बरोबरीचें कोणी आहे कीं नाहीं हें पाहण्याच्या इरादानें व त्यांच्या बागेंतील पोपईच्या झाडावरील फळें निरखून पाहण्याचा आपला हक्क शाबीत करण्याच्या विचारानें मी त्यांच्या आवारांत गेलों. पोपईच्या फळांची संख्या कालच्या इतकीच आहे हें पाहून मला बरें वाटलें. पेरूच्या झाडाला अजून कां पेरु येऊं नयेत या विचारानें मान वाकडी करून मी झाडाकडे पहात आहे इतक्यांत मागच्या बाजूनें कोणीतरी ओरडलें—

" ए मुला, कोणरे तूं ? कशाला आमच्या बागेंत आलास ? चालता हो पाहूं—"

आश्चर्यानें मी मागें वळून पाहिलें. वडिलांची हातींत धरायची काठी परजून माझ्याकडे बारीक डोळ्यानें गोदा पाहात असलेली मला दिसली. पहिल्याच भेटीला इतक्या उद्धटपणानें बोलणारी ती मुलगी मला आवडली नाहीं. उत्तरादाखल मी अक्षरही तोंडावाटे न काढता हटेलपणानें तेथेंच उभा राहिलों.

" बहिरा आहेस कीं काय ? ऐकूं येत नाहीं का तुला ? चालता हो म्हणून तुला सांगितलं नं—! जातोस कां लगावूं एक पायावर छिपटी—?" आणि हे शब्द तोंडावाटे काढून ती मुलगी स्वस्थ उभी राहिली नाहीं. तर खरोखरीच माझ्या अंगावर धावून आली. परंतु तिची धमकी कृतींत येऊं शकली नाहीं; गोदूच्या मागच्या बाजूनें तिची आजारी आई नुकतीच बाहेर आली होती. तिच्या लक्षांत हा प्रकार आला असावा कारण ती लगेच ओरडली— " गोदे, मागें फीर पाहूं' तूं लागलीस का पुन्हां दांडगाई करायला ? थांब, तुला आतां कोंडूनच ठेवतें खोलींत—"

गोदी चमकून मागे फिरली. आईला दिसूं नये म्हणून लगबगीनें तिनें हातांतली काठी मागच्या बाजूस दडवली.

गोदी खालच्या मानेनें हळूहळूं घरांत निघून गेली. खटका उडण्याचा प्रसंग टळला परंतु त्या मुलीचें हें चढेल वर्तन मला बिलकूल आवडलें नाहीं. या पोरीला केव्हां तरी इंगा दाखवून तिचा नक्षा उतरविण्याचा मी निश्चय केला. काल आली नाहीं तों मला ही दटावणी ? मला ? अन् एका झिपऱ्या पोरीनं दम द्यावा ? अरे, चारचौघांत हें कळलं तर तोंड काढायला मला जागा राहील होय ? छट् ! या पोरीला चांगलीच वठणीवर आणली पाहिजे.

परंतु अनेक कारणांमुळें पुढें दोन तीन महिने मला गोदाशीं बोलण्याची संधीच मिळूं शकली नाहीं. गोदा फार करून घराबाहेर तोंड करीत नसे. तिची आई अतिशय आजारी होती, गेले पांच सहा महिने ती अंथरुणाला खिळून बसली होती, इत्यादि माहिती मला आमच्या वहिनीकडून उडत उडत समजली होती. अर्थात् त्यावेळीं मला खरा प्रकार समजणें शक्य

नव्हतें. गोदा घराबाहेर पडत नाहीं याचें कारण मनांतून ती आपल्याला घाबरत असावी असें मी माझ्या सगळ्या दोस्तांत पसरवून दिलें होतें. आणि इतरांचा गोदाशीं परिचय नसल्या-कारणानें माझें हें विधान बिनाहरकत मान्य करण्यांत आलें. आणि कदाचित् गोदाविषयीं विचार करण्याचें मी सोडूनही दिलें असतें—परंतु पहिल्या भेटीला माझ्या मनांत निर्माण झालेली अढी मला स्वस्थ बसूं देईना.

एके दिवशीं मी मुद्दामच वहिनीच्या मागें लागून त्यांच्या घरांत प्रवेश केला. गोदाची आई भिंतीशी एका मळक्या गादीवर पडलेली होती. वहिनीला पाहतांच गोदाचे वडील तेथून उठून गेले. मला वाटतें आम्ही येण्याच्यापूर्वी ते कसली तरी पालेभाजी निरत असावेत. वडिलांच्या जागेवर गोदा येऊन बसली व भाजी निरण्याचें काम सुरू झालें. बायकांच्या स्वभावास अनुसरून वहिनीनें गोदाच्या पुढची विळी स्वतः पुढें ओढून घेतली—

"निरूं द्या तिला. तुम्ही बसा नं." गोदूची आई म्हणाली. परंतु वहिनीनें हंसल्यासारखें करून आपलें हौसेनें पत्करलेलें काम चालूं ठेवलें. नाइलाज होऊन गोदा घरांत जाऊन एका पाटावर तांदूळ निवडीत बसली. "एवढीशी चिमुरडी, पण बरीच हुशार दिसते कीं—" वहिनी गोदाकडे पाहून म्हणाली. मला हें ऐकून वहिनीचा फार संताप आला. शत्रूची स्तुति! अन् माझ्या तोंडावर? मी गोदाकडे न पाहण्याचें ठरवून पाठ-मोरा बसून राहिलों. गोदूची आई बोलत होती—

"काय करणार? मी ही अशी अंथरूण धरून बसलें. मेली अजून उलथूनही जात नाहीं. दहा वर्षांची सुद्धां पोरटी नाहीं. तिला कामाला लावायाला मन घेत नाहीं. पण करायचं कसं? वेळेला चार घास कसेबसे पोटांत ढकलायला पाहिजेत नं? माझा काय असून नसून सारखाच उपयोग—"

"पण मग पुण्यामुंबईच्या एखाद्या चांगल्या डॉक्टरला दाखवावं कीं नाहीं?" वहिनी अगत्याच्या सुरांत म्हणाली.

"अहो, तेही सोपस्कार झाले बरं. कुणी म्हणतो ॲनिमिया आहे, कुणी म्हणतो क्षय आहे. मी म्हणतें आपलं नशिब आहे अन् तें कांहीं मला सोडणार नाहीं हें निश्चित. एकंदरींत काय तर तिकीट काढून ठेवलं आहे मी. गाडी येण्याची वाट पहातें आहे." निराशायुक्त आवाजांत गोदाची आई म्हणाली.

"उगीच कांहीं तरी बोलूं नका, गोदाची आई. आयुष्याची दोरी बळकट असली म्हणजे ब्रह्मदेव अडमडला तरी दिसेल, कांहीं होत नाहीं. चांगल्या व्हाल बरं. दोनचार महिन्यांत खडखडीत बऱ्या व्हाल. डिकसळची हवा हेंच औषध आहे. बाळ गोदा, ही भाजी घेऊन जा बरं—" वहिनी पुढ्यांतला ढीग बाजूस सारून म्हणाली. गोदा भाजी गोळा करून गेल्यावर कशावरून बोलणें निघालें कुणास ठाऊक परंतु गोदाची आई पुढीलप्रमाणें बोलूं लागली—. "पोरगी भारी वांड आहे. शेजारच्या कागाळ्या आल्या नाहींत असा एक दिवस अजून गेला नाहीं. माझ्या आजारामुळं तिला घरचं सारं पहावं लागतं म्हणून आताशां त्या कटकटी आपोआप बंद पडल्या आहेत. नाहींतर मागच्या वर्षी या कार्टीनं हिच्यापेक्षां दोन वर्षांनी मोठ्या असलेल्या एका पोराला झाडावरून खुशाल ढकलून दिलान् काय! बरं तर बरं. हातपाय मोडण्यावर भागलं नाहींतर चांगली कंबक्ती भरणार होती आमची सगळ्यांचीच. तिला भीति म्हणून कशाची वाटतच नाहीं."

आपल्या हातांतसुद्धां इस्पिकचा एक्का आहे याची आठवण होऊन कीं काय वहिनीनेंही पण सुरवात केली—"अन् आमचे हे भावोजी तरी काय! तोच फर्मा! सगळ्या गांवची गटार उपसतील तर घरीं येतील लहान. थोर कश्शाकश्शाची क्षिती असेल तर देवाचं नांव! बरं झालं बाई! शेजारला चांगली जोडीदारीण मिळाली आहे. पाठवीत जा कीं गोदाला दुपारची आमच्याकडे म्हणजे तुम्हालाही अंमळ निवांतपणानं पडायला मिळेल अन् तिलाहि जरा हुशारी वाटेल—"

—दिग्दर्शक तो होता एका सिने-कंपनीचा,
" करूं नये पण विचार केला " त्यानें लग्नाचा.
चिरंजीव सौभाग्यकांक्षिणी सांगुन नटि आली,
वधूपरिक्षा राक्षसवेळीं " वार " मधें झाली.

× × ×

"बाळ, तुझें ग नांव काय ?" तो प्रश्न पुसे पहिला.
पाळण्यांतलें "इठी,"—परंतु पडद्यावर "लयला"!
अंदाजानें किती असावें वय सध्यां तुमचें ?
पडद्यावर मी बालनटी, पण वय चौतीसाचें.
"सकच्छ किंवा विकच्छ," यांतिल कुठलें आवडतें ?
" शुटिंगां " तिल प्रवेशावरी अवलंबुन असतें.
कोण कोण आहेत आपणां नात्यागोत्यांचीं ?
कोणी नाहीं, एकच मुलगी चवथ्या लग्नाची.
माझे सगळे प्रश्न तुम्हाला विचारून झाले,
तुम्ही तुमचे प्रश्न विचारा, कांहीं जर असले.

* * *

नटी म्हणाली, " पितां सकाळीं दूध किती शेर "?
सकाळसंध्याकाळ ढोसतों विलायती बीर.
अंदाजानीं किती असावी तुमची इस्टेट !
तुझ्या पगारावरीच माझें अवलंबुन पोट.
मित्रमैत्रिणी आहेत किती एकुण तुम्हाला ?
सर्व नायका मैत्रिणि माझ्या, मित्र न कुणि मजला.
शपथ वहा तर, एक-पत्निच्या व्रतास पाळीन.
दुसरी ऑफर येईतों, मी तुला न टाकीन.
वधु म्हणुन मी किती आपणां मोजावा हुंडा ?
" फायनान्सर " द्या गांठुन, कोणा घालुनिया गंडा.

* * *

त्या दोघांना स्थळें तयांचीं पूर्णपणें पटलीं.
एका क्षेत्रीं परस्परांशीं लग्न-बद्ध झालीं.
जीवन—युद्धामधें उघडिला दोघांनीं " फ्रंट. "
दो महिन्यांनीं झाला मुलगा, " हाच खरा स्टंट "

# नटीची वधु-परीक्षा

कविः—बाबुराव गोखले



अनुक्रमणिका










गोदा आमच्या बंगल्यांत मधून मधून येऊं लागली हें माझ्या पथ्यावर पडलें. शक्यतोंवर तुटकपणानें वागून संधि मिळेल तेव्हां तिचा अपमान करायचा हें माझें धोरण मी कधींच बदलूं दिलें नाहीं. आम्ही गुण्यागोविंदानें खेळावें ही वडीलमाणसांची महत्त्वाकांक्षा आम्हीं दोघांनीही कधींच सफळ होऊं दिली नाहीं. मोठ्या माणसांना बोलायला काय होतं आहे ? अहो, आमचेही कांहीं मानापमानाचे भाग आहेतच कीं नाहीं !

गोदाचें अन् माझें कधींच सूत जमलें नाहीं. प्रत्यक्ष मारामारीवर प्रसंग ठेपूं नये याची आम्ही काळजी बाळगीत होतों. परंतु दोघांमधून विस्तव जाऊं न देण्याची आम्ही खबरदारी बाळगीत असूं. वास्तविक आम्ही दोघेही समानशील होतो. तसं म्हटलं तर आमचं सख्य व्हायला कांहींच अडचण नव्हती. गोदाला पुरुषी आडदांडपणें वागण्याची अत्यंत हौस होती. झाडावर चढणें, दगड मारून रस्त्यांतल्या कुत्र्याला दमदाटी करणें, धुळींत मनसोक्तपणें खेळणें इत्यादि गोष्टी तिला मनापासून आवडत असत. आणि याबद्दल मनांतून मला तिच्याविषयीं कमालीचा आदर वाटत असे. परंतु तिचा हा भलेपणा तोंडानें कबूल करणें मला श्रेयस्कर वाटलें नाहीं. शाब्दिक झटापटी उडाल्याशिवाय एक दिवस कांहीं आम्ही जाऊं दिला नाहीं. एक यःकश्चीत पोरगी मला दटावूं पहाते हा काय शहाणपणा झाला ? अन् तो मी काय म्हणून सहन करीन ?

हळू हळू गोदी बंगल्याचें आवार सोडून आजूबाजूच्या मुलांत हिंडूं फिरूं लागली. इतरांना तिची निंदा ऐकवण्याचा मी विडाच उचलला होता. आणि इतरांनींही पण माझ्या होस हो ठेवून द्यावें ही माझी रास्त अपेक्षा होती. प्रथम सुमारें एक महिनाभर माझ्या अपेक्षांना धक्का बसण्याजोगें कांहींच विपरीत घडून आलें नाहीं. गोदा शेजारीं रहाण्यास येऊन सुमारें चार महिने झाले तरी डिकसळचा वाघ हें गौरवाचें स्थान माझ्याच हातांत होतें—परंतु ह्या मानाच्या सिंहासनाला सुरुंग लागल्याचा संशय मला एका प्रसंगानें आणून दिला.

स्टेशनाच्या यार्डांत गुळाच्या ढेपी येऊन पडल्या होत्या. ऐन तिन्ही सांजेच्या वेळीं कांहीं दोस्तांना बरोबर घेऊन त्यांवर ताव मारण्याचा आमचा बेत ठरला होता. त्याप्रमाणें मी दहा पांच दोस्तांजवळ बोलूनही ठेवलें होतें. गोदालाही बरोबर न्यावें. आणि तिला आपल्या पराक्रमानें लाजवून सोडावें या विचारानें मी तिच्याजवळ ही गोष्ट काढली. मला वाटलें होतें कीं गोदा कृतज्ञतेच्या भारानें लवून जाईल आणि बरोबर नेण्याचें आपण मान्य केलें या सन्मानाबद्दल स्वतःला धन्य समजेल. परंतु तिनें नाक फुगवून म्हटलें—"तूं चोर आहेस. जीव गेला तरी मी चोरी करणार नाहीं. गूळ कधीं खायला मिळाला नाहीं इतकें आपण भिकारी आहोंत वाटतं. ऐहेरे ! अन् म्हणे मी स्टेशनमास्तरचा भाऊ आहे. चोरीच्या गुळांत बरबटलेलं स्टेशनमास्तरच्या भावाचं घाणेरडं तोंड बघण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं—"

"तूं भित्री भागूबाई आहेस—" मी आवेशखोरपणानें म्हणालों.

"आणि आपण काय मोठे पराक्रमी राजपुत्र आहांत तें माहीत आहे कीं. लंगड्या कुत्र्याला दगड मार, मांजराच्या मिशा उपट, एखाद्या पोर्टरच्या पोराला धमकी दे याला काय हिमालयाचं बळ लागत असतं होय ? नको टवकारून पाहूंस. तुला मी भीक घालीन होय ? चोर तो चोर अन् वर शिरजोर. आमच्या बागेंतल्या पोपया पाहून तुझ्या तोंडाला पाणी सुटलं

(पान १६१ वर चालू)




विषयापेक्षां विषयप्रतिपादनशैलीकडे अधिक लक्ष देऊन येत्या निवडणुकींत यांनाच मत द्या.



# आमचा खंड्या

—श्री. म. माटे

आमचा खंड्या आम्हां मुलांपैकींच एक होता इतकेंच कीं तो चार पायांवर चालत असे आणि त्याला बोलतां येत नसे. सगळ्या जन्मांत बापड्यानें एक अक्षर तोंडावाटे काढलें नाहीं. आम्हीं तो म्हसवडच्या बाजूनें आणला होता. म्हसवड म्हणजें माणदेश; आणि माणदेशाचें मुख्य वैभव म्हणजे कडक उन्हाची रणरण आणि कुसळांनीं भरलेले फोंडे माळ हें होय. पांच पांच कोस जमीन तुडवित गेलांत तरी सावलीचें झाड भेटायचें नाहीं कीं पाण्याचा टिपूस दिसायचा नाहीं. असल्या बोडक्या आणि वैराण मुलखांत शिकार करणारीं कुत्रीं कसलीं असतील याची कल्पनाच करायला हवी. तीं उन्हानें धोपलेलीं असायचीं; जबडे उघडे पडलेले असायचे; तांबूस लांब जिभा ळळळळत असायच्या; गोमाशा झाडण्यासाठीं तीं पाय झाडीत असायचीं; आणि पोरें भकाटीला गेलेली असून काय खावें म्हणून दीन मुद्रेनें आजूबाजूला बघत असायचीं. यांच्यांत निरनिराळीं बेणीं असतात. आमच्या खंड्याची जात कोणती होती तें मला आतां आठवत नाहीं: सामान्यतः शिकारीं कुत्रीं लांब, चोपेलली रोडकीं अशीं असतात तसा खंड्या नव्हता. आमच्या घरीं तो आला तेव्हां तो पिलासारखा दिसत होता तरी हाडापेरानें थोराड वाटे. वयाच्या मानानें दांड दिसत असे. अंगावरचे केस इतर कुत्र्यांच्या मानानें थोडे लांब असत. छाती, मांड्यांची मागची कड आणि मान यांवरचे केस विशेषच लांब होते. पण खंड्याची खरी शोभा म्हणजे त्याचे कान होते. आंतले कानाचे कोके फार मोठे होते असें नाहीं पण त्यांवर वाढलेले केस एकाद्या गोसाव्याच्या दाढीसारखे लांबलचक असत. खालीं वाकून तो कांहीं हुंगीत असला तर त्याच्या त्या केसांचीं टोकें भुईला लागत! या लांब केसांमुळें खंड्याचा चेहरा मोठा गंभीर दिसे. गुलामाचे डोळे सुद्धां एकाद्या गांजेकस गोसाव्याच्या डोळ्यांसारखेच लालभडक असत. आपल्या इकडल्या कुत्र्यांपेक्षां त्याचें नाकोटें लांब असून त्यावर काळेपांढरे केस असत. पण मीं कितीहीं तपशिलानें या आमच्या लहानपणच्या सोबत्याचें वर्णन केलें तरी त्याचा मोहरा वाचकाच्या डोळ्यांपुढें जसाचा तसा उभा रहाणें कठीण आहे. अशी कांहीं शोभा असतेच कीं जिच्यापर्यंत शब्द पोचत नाहींत. या चतुष्पाद प्राण्याचें स्मरण मला आतां झालें म्हणजे लहानपणची माझ्या मनाची हुरहूर मला पुन्हां वाटूं लागते. एकादा अल्लड धाकटा भाऊ असावा तसा हा खंड्या होता. त्याला देवानें वाचा दिली नव्हती याचें मला फार वाईट वाटतें.

प्लेगाच्या दिवसांत आम्ही दरसाल रानांत रहायला जायचे. असला एक खंड्या राखणीला असला म्हणजे कोणीही बिनघोर घोरत पडावें! चोरांनीं जर आमच्या 'वाडीं'—वाड्यांत—येण्याचें धाडस केलें असतें तर खंड्यानें या चोरांना फाडून खाल्लें असतें. नुसत्या उग्र मुद्रेच्या बळावरच तो माणसांना पंचवीस हात दूर उभें करी. सकाळीं साडेसाताच्या सुमारास

वाडग्याच्या फाटकांतून बाहेर पडून तों सडकेवर जाई व पूर्वेकडे तोंड करून संथपणें उभा राही. कोणाला वाटलें असतें कीं हा सूर्याला नमन करीत आहे ! पण त्यांतलें कांहीं नव्हतें. तिकडून आमचा दूधवाला येत असे ! खंड्या त्याची मार्गप्रतीक्षा करीत उभा रहावयाचा. पहिल्या पहिल्यानें दूधवाला पुढें येण्यालाच धजत नसे. अशी उग्र चर्या त्या कुत्र्याची होती. पुढें त्याला कळलें कीं एरवीं हा कुत्रा कोंकरासारखा गरीब आहे. अंगणांत वाळत घातलेल्या सतरंजीवर वगैरे पोरें गमतीनें पसरलेलीं असलीं म्हणजे त्यांच्यांत हा जावयाचा तींही त्याला धरून लोळवीत, त्याला 'आ' करायला लावीत आणि त्याच्या त्या आक्राळविक्राळ तोंडांत खुशाल हात घालित ! पण हा कुणाला कधीं चावला नाहीं कीं कुणाला त्यानें कधीं ओरखाडलें नाहीं. पण लहान मुलांशीं कोकरासारखा खेळणारा हा अजाप जीव एक विशेष प्रकारची गर्जना कानीं आली म्हणजे एकाद्या सिंहाच्या छाव्याप्रमाणें भयंकर रूप धारण करी. अजिमताऱ्याच्या पूर्वेकडील पायथ्याला जें विस्तीर्ण मैदान आहे त्यावर आमच्या झोपड्या होत्या. किल्ल्याच्या पूर्वाभिमुख डोंगराचा उजवा हात वाकण घेत घेत खूप लांबवर गेलेला आहे. या वाकणांत मोठें जंगल असून हा सारा टापू झाडीनें भरून गेला आहे. शिकारी लोक इकडे पुष्कळदा येतात. एकदां शिकाऱ्यांनीं सकाळीं दहावाजतांच रान उठवावयास सुरवात केली. तो गोंगाट सुरू होतांच खंड्या मान वर करून तिकडल्या रोखानें पहात उभा राहिला. त्याच्या गळ्याला साखळी होती. शिकारीचे आवाज त्याच्या ओळखीचे होते असें दिसतें. निरनिराळे कर्कश व भेसूर आवाज कानांत भरू लागतांच त्यानें कानाचे बुंधे चाळवावयास सुरवात केली आणि घशांतून एक चमत्कारिक गुरगुर तो काढू लागला. होतां होतां त्याचें सगळें अंग थरथरूं लागलें ! पायाच्या नख्यापासून तों नाकपुड्यापर्यंत त्याच्या अंगांतला चेव दिसूं लागला. तो साखळीला हिसके मारूं लागला. सगळें अंगच्या अंग तो उडी मारावी अशा रीतीनें पुढें झेपावूं लागला. साखळीच्या हिसक्यानें दरवेळीं तो मागें पडे; व पुन्हां तो पुढें झेप घाली. त्याला अडवून धरणें अतःपर अशक्य होतें. तो त्या हिसक्यांनीं गळफास लागून मेला असता. गळ्याची कडी सोडतांच खंड्या वाऱ्यासारखा निघाला. त्याच्याबरोबर कोण धावणार! हां हां म्हणतां, मैदान ओलांडून तो झाडींत शिरला. आम्ही सगळे काळजींतच होतों. सुमारें तीन तासांनीं खंड्या परत आला. अंगावर कुसळें चिकटलेलीं : अंगाचें ओरखाडे निघालेले : केस विसकटून गेलेलें: तान्हेनें आणि भुकेनें धोपलेला आणि चोपलेला हा गडी दाराशी येऊन उभा राहिला ! या वेळीं त्याच्या अंगांतील आवेश आणि क्षात्रवृत्ति आमच्या प्रत्ययाला आली.



या प्राण्याला माणसाचें शहाणपण होतें. खरें म्हणजे शहाण्या माणसाचें शहाणपण त्याला होतें असें म्हटलें पाहिजे. आम्हीं ज्या घरांत होतों त्याचीं सारीं दारें एकासमोर एक अशी ओटीपासून परसापर्यंत गेलेलीं होतीं. दरवाज्यांतून ओटीवर आलें कीं डाव्या हाताला सारी ओटी; पुन्हां समोरचे दार ओलांडून गेलें कीं डाव्या हाताला सारें माजघर असें शेवटच्या परसापर्यंत होतें. स्वयंपाकघरांत आम्हीं जेवायला बसत असूं. एखाद्या दिवशीं खंड्याच्या मनांत काय येई कोणांस ठाऊक : पण परसांत परस्पर यायला जी वाट होती ती सोडून तो या अनेक दारांतून शिरत शिरत परसांत जाई. स्वयंपाकघरांत आमची पंगत बसलेली असायची. तो आमच्या समोरून जाई. पण या शहाण्या प्राण्यानें एकदाही कधीं आमच्या ताटाकडे किंवा स्वयंपाकाकडे ढुंकूनही पाहिलें नाहीं. मग थांबून भाकरीसाठीं शेपटी हलवणें लांबच राहिलें. हें त्याचें वर्तन खरोखर अगदीं शहाण्या माणसासारखेंच असें. हें त्याला कसें सुचत असे कोणास ठाऊक. पण हीं निर्लोभ आणि विनहावरी वृत्ति पाहून आम्हांला मोठें नवल वाटे. किती तरी माणसांना हें शहाणपण नसतें. तुम्ही जेवतांना तीं तुमच्याशीं गोष्टी बोलत बसलीं तर दहादां तीं तुमच्या ताटाकडे पहातील; आणि तुम्हांला एक तऱ्हेचा संकोच उत्पन्न करतील. पण खंड्या एकाद्या सुसंस्कृत माणसाप्रमाणें स्वयंपाकाकडे किंवा आमच्या पानाकडे न बघतां सरळ निघून जावयाचा. जणूं कांहीं तो मनांत म्हणत असें "आपणाला इकडे पाहून काय करावयाचं आहे ? आपल्याला जी भाकरी घालणार आहेत ती वेळेवर आपल्या पुढें येईलच. माझ्या धन्यांनो ! तुम्हीं स्वस्थ जेवा." खरोखर अशा प्राण्यापर्यंत आपलें ममत्व पोहचणें किती अवश्य आहे. पोचलें, तरच आपण खरे रसिक. दाव्याची सुटून इकडे तिकडे मोकाट हिंडू लागलेली गाय आडवून आडवून पुन्हां वाड्यांत आणून सोडण्याच्या कामांत तर तो एखाद्या गुराख्यापेक्षाहीं जास्त चतुर होता. खंड्या एक विश्वासू नोकरच होता. आमच्या गाईला गुराख्यापेक्षां

**खरोखर, याला जर बोलतां आलें असतें तर काय मौज झाली असती. मानवी कृतीच केवळ अपुर्‍या असतात असें नाहीं. विधात्याच्या कृतीसुद्धां किती ठिकाणीं तरी अपुर्‍या दिसतात. हा सिद्धान्त सिद्ध करायला अजूनही कांहीं उदाहरणें हवींच असलीं तर आमच्या खंड्याचें उदाहरण सहज उपयोगी पडेल.**

खंड्याचीच खरी राखण होती. आणि भीतीही होती. याला जरा बोलतां आलें असतें तर यानें चांगलाच पगार मिळविला आणि आम्ही संतोषानें दिला असता.

हा कुत्रा जाती शिकारी होता आणि अगदीं लहानपणीं त्याला इतर कांहीं खाद्य त्याच्या मालकाकडून मिळत असे. पण आमच्या घरीं आल्यापासून दूध भाकरी हेंच त्याचें खाणें होतें. एकदां आम्हीं रहात होतो त्या रानांत टोळ आले. टोळधाड म्हणजे काय हें प्रत्यक्षच पाहावयास हवें. तें शब्दांनीं कळावयाचें नाहीं. या टोकापासून त्या टोकापर्यंत सर्व आभाळ टोळांनीं भरून गेलें. एक लालभडक छत आकाशाला दिलें आहे असें वाटूं लागलें. ढगामागें ढग येतात तशा टोळांच्या झुंडीच्या झुंडी एका मागून एक येत होत्या. यांतले लक्षावधी टोळ खालीं उतरत आणि उद्भीज्याचा फन्ना पाडीत. दोन दोन तासांच्या आंत, झाड-झाडोरा–पिकें-जिथे कोठें थोडाही वनस्पतीचा अंश असेल तिथें उतरून, हे टोळ सारा मुलुख बोडका करून टाकीत. दोन तासापूर्वी जेथें शोभा, मांगल्य आणि जीवनाचा फुलोरा दिसे तिथें सुतक, क्षय, आणि बोडकेपणा यांचा अमंल चालू होई. आमच्या शेजारच्या भरगच्च पिकांवर टोळ उतरुं लागलें. म्हणून आम्ही सारं लोक हातांत पोत्यांचे धडपे घेऊन तेथे गेलों आणि त्यांनीं टोळ झाडूं लागलो. वास्तवीक हें कांहीं तरी होतें! टोळांची दाटी आणि आमचे प्रयत्न यांत कांहींच प्रमाण नव्हतें. पण खंड्या आमच्या बरोबर आला. त्याला पोत्याच्या धडप्यांचा कांहींच उपयोग नव्हता. त्यानें नुसत्या उंच उंच उड्या मारून टोळ धरावयास सुरवात केली. पण एक टोळ चावताच त्याला त्याची रुचि लागली आणि मग उड्या मार मारून त्यानें किती टोळ खाल्ले असतील कोणास ठाऊक? पण हें रुचकर अन्न त्याला इतकें बाधलें कीं त्या उष्णतेनें त्याच्या अंगावरचे सगळे केस गळून पडले. त्याच्या अंगावर जिकडे तिकडे खवंदे पडलीं आणि अनेक ठिकाणीं मासुर्डी दिसूं लागलीं. आम्हांला वाटलें कीं हा कुत्रा आतां मरतो. पण एका वैदूनें कडू तेलांत एक औषध करून दिलें. तें एक दोनदां लावतांच खंड्याला बरें वाटूं लागले. कातड्याला गेलेलें तडें भरून आले; केस उगवले आणि पंधरा दिवसांत कुत्रा केसांनीं भरून जाऊन काळा कुळीकुळित दिसूं लागला. सगळ्या जन्मांत खंड्याच्या हातून चूक झाली असली तर येवढीच होय. टोळ खाऊं नयेत हें त्याला कळलें नाहीं. पण येवढ्यामुळें त्याला मूर्ख ठरविणें चूक होईल. चांगलीं शहाणीं माणसेंसुद्धां गोड लागलें म्हणून खात सुटतात आणि मागून कण्हत बसतात हे आपण पहातों. खंड्या फार झालें तर यांच्या इतकाच मूर्ख असेल.

पण खंड्याचें शहाणपण माणसांनासुद्धां लाजविणारें होतें याची एक साक्ष सांगतों. आम्ही रानांत रहात होतों तेथून तीन चार मैलांवर माझी बहिण दुसर्‍या एका रानांत, प्लेगानिमित्त, रहात असे. ती तेथें प्लेगनेंच वारली; म्हणून तिच्या घरच्या मंडळींना आम्ही आमच्याकडे घेऊन आलों. बरोबर त्यांचीं हांतरूण पांघरूणें होतीं. तीं घरांत घेणें धोक्याचें होतें. आमचें वाडगें खूप ऐसपैस म्हणजे चांगलें एक एकरभर होतें; म्हणून आमच्या झोपडीपासून बर्‍याच अंतरावर एका बाजल्यावर हीं सारीं चिरगुटें आम्हीं उन्हांत म्हणून ठेवून दिलीं. तीं तीनचार दिवस तेथेंच ठेवावयाचीं होतीं. वाडग्यांत येण्याची कोणाची प्राज्ञा नव्हती. म्हणून रात्रीच्या वेळीं तीं कोणी घेऊन जाईल असें आम्हांला कधीं वाटलेंच नाहीं. रात्र पडली; आम्ही झोपीं गेलों; खंड्या झोपडीच्या बाहेर दाराशींच नेहमीप्रमाणें होता. सकाळीं उठून माणसें पहातात तों खंड्या अंगणांत नाहीं! आम्ही इकडे तिकडे पाहूं लागलों. जातां जातां त्या दूर टाकलेल्या कपड्याकडे गेलों: तों त्या बाजल्याच्या शेजारीं नख्यांनीं काढलेल्या एका डबर्‍यांत खंड्या पाय पुढें पसरून बसलेला! धन्याचीं चिरगुटें झोपडीपासून लांब पडलेलीं: तीं जातील ही खंड्याला भीती! म्हणून नेहमीचें अंगणांतील ठिकाण सोडून हा इमानी प्राणी त्या बाजल्यापाशीं रात्रभर बसून राहिला! थंडी लागत होती म्हणून त्यानें नख्यांनीं एक पसरट डबरा काढला आणि त्याच्या उबेंत कपड्यांवर खडा पहारा करीत हा आमचा मित्र सकाळपर्यंत ताटकळत राहिला होता. खरोखर माणसाच्या जातींतल्या चाकरानेंसुद्धां अशी धन्याच्या हिताची काळजी दाखविली नसती. त्याला सांगावें लागलें असतें कीं तूं तेथें बसून रहा: आणि बसला असता तरी चडफडत बसला असता. खंड्याला कोणीं सांगितलें होतें? त्याला हें शहाणपण उपजतच होतें आणि हा विश्वासूपणा आणि मालकाच्या हिताची काळजीही त्याच्या अंगीं उपजतच होती. खंड्या माणसांपेक्षां कितीतरी शहाणा, इमानी, आणि सच्चा होता. त्याला जर बोलतां आलें असतें तर त्याची खरी योग्यता कळून आली असती.



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

खंड्याला जर बोलतां आलें असतें तर त्याची गणना चांगल्या चांगल्या माणसांत सहज करतां आली. असती. तो कोठल्याही म्युनिसिपॅलिटीचा मेंबरच काय पण अध्यक्षही झाला असता. आणि मेंबर किंवा अध्यक्ष होऊनही त्यानें संस्थेचा दर्जा किती तरी वाढविला असता. त्यानें आपल्याच घरा पुढें कंदिलाचा खांब बसवून घेण्याचा आग्रह धरला नसता; रघचा गडगडा कमिठीच्या नोकरांकडून लावून घेतला नसता; त्यानें म्युनि०च्या मालकीचीं लिंबाचीं झाडें तोडून आणून घरच्या चुलीला सरपण केलें नसेंत. आणि बैलांना घालावयाचा कडबा आपणच 'खाल्ला' नसता. त्यानें म्युनि०च्या बैलांना द्यावयाच्या मुगांत माती मिसळली नसती आणि म्यु०च्या मालकीचा केर स्वतःच्या शेतांत खतासाठीं फुकट ओतविला नसता. तो रजिष्टर असता तर त्यानें मृत्युपत्र करतांना त्या मरणाराकडून पैसे मागितले नसते आणि फौजदार असता तर त्यानें लाच घेऊन पुरावा जाळून टाकल नसता. तो बातमीदार असता तर त्यानें खोटीबातमी दिली नसती आणि संपादक असता तर त्यानें असत्याचा हट्ट धरला नसता. मास्तर असता तर त्यानें आपल्या वह्या इमानानें तपासल्या असत्या आणि मुन्सब असता तर त्यानें न्यायाचा विक्रा मांडला नसता. तो भाजीवाला असता तर वजन करतांना तागडीला झोका दिला नसता आणि दूधवाला असता तर त्यानें दुधांत पाणी घातलें नसतें. त्यानें आपलें इमान कधींही गमावलें नसतें. तो नेकीनें राहिला असता आणि आपल्या वाटयास आलेलें काम केवळ वेठ म्हणून नव्हे तर कर्तव्य म्हणून त्यानें केलें असते. हें सारें घडले असतें पण त्याला वाचा नव्हती आणि यामुळें त्याचे थोर मनोगत जागच्या जागींच जीरून जात असें त्याच्या मनाच्या ऊर्मि आणि आवेग इमानांतून निघालेल्या असत. त्याला फार झालें तर शेपटी हलवितां येई आणि उत्साहानें इकडे तिकडे उड्या मारतां येत. पण येवढ्यानें काय होणार ? त्याच्या थोर भावना खरोखर अव्यक्तच रहात.

एकदां आम्ही आमची गाय आमच्या वाडग्याच्या बाहेर चरणीला लावली होती. हिरवेंगार मैदान लांबवर पसरलेलें होतें. गाय चरणीस लावून मी तिथेंच हिरवळीवर पसरलों होतों. खंड्या शेजारीं होता. चरतांचरतां गाय बरीच दूरवर गेली. तिच्या शिंगाला लांबलचक दोरखंड बांधलेलें होतें. माझ्या अंगाला राहिलेलें त्याचें टोक धरून मी गाईला परत ओढूं लागलों. गाय जवळ येईना. मी जोर करतांच गाय बेफाम बनली. गाय मोठी हलकी चपळ होती. तिचा मोहराही मोठा देखणा आणि मानीपणाचा दिसे. मी परत ओढीत आहे हें तिला खपलें नाहीं. पाठीवर शेपटी घेवून ती चारहीं पाय उचलून उड्या मारूं लागली. मी दोर ओढीतच होतों. या झटापटींत त्या लांबलचक दोराचे तीन चार विळखे माझ्या

पायाच्या भोवतीं पडलें. गाय तर उड्या मारीत पळूं लागली. माझी फटफटच झाली. इमानी खंड्या शेजारीं होता. त्यानें माझी स्थिति ओळखली आणि तो गाईच्या समोर जाऊन तिला आडवूं लागला. गाय वळेल तिकडे तिकडे खंड्या पुढें होई. त्यानें भुंकून भुंकून त्या गाईला मार्ग बंद करण्याची वेळ आणली. गाईला कुत्र्याइतकी अक्कल नसते. दोन्ही प्राणी माझ्या चांगल्या संवयीचे होते. पण एकानें माझी स्थिति अगदीं भयंकर करून सोडली व दुसऱ्यानें ती ओळखून मला बाचविण्याची शिकस्त केली. खंड्याच्या या पराक्रमाचें स्मरण मला चांगलेंच राहील. माणसाला जशी स्वकीयाबद्दल काळजी वाटावी तशी या कुत्र्याला वाटली आणि त्यानें त्या गाईला असें रोखून धरलें कीं तिला थांबणें भागच पडलें. त्या प्रसंगाच्या खुणा अजूनही माझ्या दंडावर आहेत आणि खंड्याच्या उपकाराचें स्मरणही माझ्या मनांत तितकेंच कायम आहे. चालू गोष्टींचें बरोबर आकलन होणें ही कांहीं सामान्य गोष्ट नाहीं. मी दोर ओढीत होतों तोंपर्यंत खंड्या स्वस्थच होता, पण गाय बेफाम बनून माझ्या पायाला विळखे बसतांच मात्र 'आतां आपण कामाला लागलें पाहिजे' असा बुद्धिनिश्चय खंड्यानें केला व आपल्या पराक्रमानें त्यानें गाईला वठणीवर आणलें. ही समजशक्ति विशेष होय.

आम्हीं प्लेगाचे दिवस रानांत काढले आणि प्लेग संपला म्हणून घरीं परत आलों. एक आठवडा गेला असेल. खंड्या गोठ्यांतील आपल्या जागेवरून एके दिवशीं सकाळीं बाहेर पडला नाहीं. थोडेसें ढोसल्यावर तो बाहेर आला; पण मागलें-पुढलें पाय ताणताणून आळस देऊं लागला; डोळे आणि मान लांबवून नाकानें कांहीं चमत्कारिक फूत्कार करूं लागला. अम्हांला वाटलें खंड्याला थंडी झाली असावी आणि म्हणून तो आळसावला असावा. दुपारीं नेहमीं प्रमाणें दूधभाकरीचा काला त्याच्या पुढें आणून ठेवला. पण खंड्यानें पडल्या पडल्याच मान वर करून त्या भांड्याकडे पाहिलें आणि तो पुन्हां मुरकटून पडला. त्याला मीं पुष्कळ आंजारलें-गोंजारलें; खंड्या, खंड्या म्हटलें; पाठीवर थोपटून 'ऊठ ना' म्हणून दोन तीनदां जोरानें ओरडलों; पण घशांतून गुरगुर काढून तो अधिकच सताड पसरला. वाचकाला खोटें वाटेल पण खंड्याचें अंग तापलें होतें. माझ्या हाताला तें कळलें. तेव्हां मात्र आम्हांला निराळीं शंका आली. काय करावें हें कळेना. खंड्याला बहुतेक प्लेग झाला असावा असें सर्वांना वाटूं लागलें. पण त्यावर कांहींही औषध नव्हतें. केवढीहि किंमत पडली असती तरी आम्ही ती दिली असती. पण काय होतें पाहण्यापलीकडे कांहीं करतां येईना यामुळें तर फारच दुःख वाटूं लागलें. संध्याकाळीं खंड्या अगदीं गळाठला. त्याची मान ठणकत होती. त्याला सांगता येत नव्हतें पण त्याच्या चलनवलनावरून ध्यानांत आलें. मी हातानें त्याची मान चाचपून पाहिली तों आंब्याच्या कोयीसारखी गाठ हाताला लागली! अरेरे! खंड्या प्लेगनें मरणार हें आतां ठाम ठरलें. त्यानें अन्नपाणी सोडलेंच होतें. आतां डोळेहि उघडीना-खंड्या केवळ घरांतलें माणूस; पण मुकें माणूस इतकेंच [illegible]. आणि म्हणून वाईट वाटूं लागलें. आम्ही सारीं कष्टीं होऊन बसलों. प्लेगाच्या दिवसांत, चोराचिलटाच्या भयांतून खंड्यानें आम्हांला संभाळून घरीं आणलें आणि आतां आम्ही सारें सुखरूप झाल्यावर तो आपण स्वतः प्लेगनेंच मरत आहे हें पाहून तर आम्हांला पराकाष्ठेची हळहळ उत्पन्न झाली. माझा मधला भाऊ फारच मायाळू होता. तो अगदीं ओक्साबोक्शीं रडूं लागला. दुःखानें दुःख पसरत जातें. आम्हीं घरांतलीं सारीं माणसें चांगलीं धष्टपुष्ट आणि दिसायला थोडीशीं उग्र. पण खंड्याच्या या दुखण्यानें आमच्या तोंडचें अगदीं पाणी पळालें: तें पाहून शेजाऱ्यापाजाऱ्यांना नवल वाटलें. दुसऱ्या दिवशीं खंड्याचे पाय थडथडूं लागले: ते ताठही झाल्यासारखे वाटूं लागले: आतां त्याला शुद्ध नव्हती. दोन तासांनीं म्हसवडकडच्या माळावरच्या गोठ्यांत जलमलेला हा जीव, आमच्या घरीं साताऱ्यास वाढून, मौजेंत दिवस घालवून, प्लेगानें नाहींसा झाला. ज्यांच्या घरीं मायेचीं जनावरें आहेत त्यांना मी काय म्हणतों तें कळेल. घरांतलें माणूस गेल्यानें मनाला जें दुःख होतें तेंच आम्हांला झालें आणि पुढें कित्येक दिवसपर्यंत या शूर, सुंदर, इमानी प्राण्याच्या आठवणी आम्हीं एकमेकांना घोळघोळून सांगत होतों. आज एकूणचाळीस चाळीस वर्षें झालीं; पण या श्वानयोनींत जन्माला आलेल्या आमच्या मित्राची माझी आठवण पहिल्या इतकीच ताजी आहे: आणि तो गेल्याचें माझें दुःख पहिल्या इतकेंच तीव्र आहे. माझ्या घरांतील जीं माणसें आजवर दिवंगत झालीं आहेत त्यांच्या स्मृतींची उजळणी जेव्हां एकाद्या वेळीं माझ्या मनांत चालू असते तेव्हां या अबोल प्राण्याचें स्मरणही मला होतेंच होते. खरोखर, याला जर बोलतां आलें असतें तर काय मौज झाली असती. मानवी कृतीच केवळ अपुऱ्या असतात असें नाहीं. विधात्याच्या कृतीसुद्धां किती ठिकाणीं तरी अपुऱ्या दिसतात. हा सिद्धान्त सिद्ध करायला अजूनही कांहीं उदाहरणें हवींच असलीं तर आमच्या खंड्याचें उदाहरण सहज उपयोगी पडेल.

अहा मीं आहे निर्वासित
आपुल्याच घरापासोनी.
पारखाहि झालोंसें जणुं
स्वतांच्या सर्वस्वातें
या भूगोलयुद्धाकारणें.

नाहीं उडविला कहर
अग्निवर्षावें मद्देशावरी,
न आलें परचक्र, नच लोटला पूर
आक्रमणाचा या बाजूसी;
या पंचक्रोशीमाजी तरी
नाहीं चरली इतुकी
उपासमारी आसुरी;
न जाहला संहारही
पाहतां रोगसांथींपासुनी;
आणि व्यापारधंदा तर
नाहींच मेला-उलटा परी
फोंफावलाच सूज आलीसा!

पाहूं जातां वरी वरी
वाटेल तुम्हां राहिला कीं
ठिकाणा नेहमींचा अमुचा
सहीसलामत नेटका—
बचावलीच जणुं 'आद्यपुरी
अवघ्या हिंदभूमीची'
त्या लढाईच्या झळीतुनीः

परी दादाहो ! पहा मजकडे
ऐका कहाणी माझी आधीं
नी म्हणा मग वाटलें तर
सुटली कीं काय मुंबई
त्या महायुद्धा पासुनी.
एकट्याची हकीकत ही
समजा परी उपसली एक
काडी गवतभाऱ्यातली.
अहो मीं अंतरलो
घरादारानिवाऱ्याला
आप्त स्वकीयांसी माझ्या,

वस्त्रप्रावरणाहीं •
अन्नपाण्यास देखील-मग
गोष्ट कशाला बिडी काडीची ?
जंगम झालो या लढाईपायीं
भटक्या, फिरस्ता, वणवणकऱ्या;
कोठें खातो बसतो कोठें
झोपतोंही कुठें तरी, पडतो—
जगतों झालें कसाबसा
अहा मीं आहे एक •
निर्वासित स्वगृहांतुनी

आठवते कां तुम्हां ती
युद्धाची यूरोपच्या
सुरुवात मुहुर्तापुरती ?
त्या पहिल्या पहिल्या वार्ता ?
अहो कसची ती लढाई—
मॅच होती झालें एक !
आणि तत्यारखान तिचे
होतें आपलें दयाळु सरकार!
चालला होता खेळ केवळ
बातम्यांचा मात्र सुकाळ
त्या पहिल्या दोन संवत्सरी.
परी शतकाची विसाव्या
उलटां ती चाळिशी
कडाडली बघतां बघतां
सारीच की परिस्थिती.

सुखाच्या आरामाच्या
चैनीच्या, मजेच्या,सोईच्या
आणि दिलबहेलाईच्या
गेल्या चिजा झाडून साऱ्या
दुनियेंतुनी आम्हांसारख्यांच्या :
गेल्या त्या बिस्कुटें-केका
राइस् प्लेटी सवंगशा
कपडा चार आणेवारी
आणि चार आणे मैलाच्या
त्या टॅक्सी नामें मोटारी
—हो, खरें मजा न माना !

त्या भव्य प्रशस्त नव्या ‘ बसा ’
अन् त्याही माफक ऐशा दरीं
पेंग्विन-पोथ्या सहा आणकीं
कॅमेरे पावणेतिनीं
तीस रुपयांमाजी कारकून
आणि मास्तरही चाळिसांत
दीड दोनांतल्या साड्या तलम
आणि झोन तिकिटें पांचांत
व्हवी तर सर्विस मोटर
नेई चार रुपयांमाजी
थेट पांचशें मैल. फलाणीही सवंग,
प्रावरणेंही सारीच तैशीं
रेशीमही हवें तेवढें
कुठें ती स्वस्तांतली स्वस्ताई !
तें तर गुंडाळलेंच सारें
जाहला बाजार रिता
उरल्या गरजेच्या चिजा
घेतवात, जेमतेम, आणि
त्याही लागती संपावया;
राहिलें होतें अन्नवस्त्र —
निवाराही तो केवळ
आणि येई वेळ म्हणण्याची
धास्तीनें कीं लवकरीं
हें तरी टिके कां भगवन् !
पण कोठचें ! तें ही नव्हतें राहायाचें
आली लढाई ग्रासावया जवळीं
अन् वैरीण झाली महागाई.

*

जधीं येई बेचाळिस
—तेव्हांच जाहला सुरूं
निर्वास खरा हा आमुचा !
एके दिनीं वार्ता येत
कीं आले ते पूर्वेकडोन !
अरिष्ट ! हल्ला ! छापा ! धोका !
मुंबईत ही ‘ घबराट ’
मोठमोठे शेठ राउत
जीव घेऊन धाविन्नती !
मग आमुची ती गोष्ट काय
सारेच जेथे गर्भगळित
धावले फुटे वाट तिकडे
त्यांच्यांतच आम्हीं एक !
त्या थोर पळापळीमाजीं
होती किती गफलती
चुकामुकी ताटातुटी गोंधळ
गमावे त्यांतच आमुची
चीजवस्त अर्धी अधिक-
आणि उरलेली खाई
ती पर गांवींची खर्च-खाई
गेलों ज्या दुज्या गांवीं
आलो माघारी कसेबसे
या मायापोटीं मुंबईच्या.

*           *

परी हाय ! आसरा कोठें ?
गेलीच ती जागा जुनी
आणि नवी मिळणें होई दुष्कर
अखेर जी मिळे-ती जागा कसची-
तबेलाच होता एक !
ज्यांत भरलें कुटुम्ब कसेंतरी
आणि राहिलो नशिबाला
देत शिव्या मनांतल्या मनीं,
तशांतून आगस्टमाही
सरकार पुकारी लढाई
देशभक्तांवरी साऱ्या
त्या लाठ्या गोळ्या अश्रुधूर
मारा जनतेवरी जबर
त्यांतूनही वांचलों
—कशाला तें हरी जाणे !
मग येई अन्नटंचाई
दाणा गोटा गुप्त होई
तेल तूप सारें कांहीं
लुप्त जाहलें गांवातुनी.
सुरू झाल्या धान्य-रांगा
बायाबापुड्यांचे हाल
वाटलें आली उपासमार
परी छे ! मरण कां सोपें इतुकें ?
रासन आलें उपयोगा
प्रश्न पोट खळगीचा
निभावला अन् कसातरी.

*           *

त्या त्रेचाळी सालांतरी
कपड्यासाठीं हो हांकाटी
जाहले बाजार काळे
आणि चेहरे ते गोरेमोरे
लज्जा संरक्षणालागीं
गुंडाळुनी काय घ्यावें
( कां द्यावें सारेंच सोडोनी
आणि गुंडाळावें डोईतें ? )
मुर्दाड आम्हीं मध्यमवर्गी
न द्रव्यबळ तें गांठी
ना खंबीरपणा गरिबीचा
निवारा अन्न वस्त्र
यांची ऐशी लागता वाट
उरला होता एक मार्ग
राजमार्ग हम रस्ता !
जो खिजवीत भ्रमणानें
फुटेल त्या वाटेनें जाणें
ही एकच होती पळवाट
तीही रोखून टाकली
वाहनांतील गर्दीनें !
ट्राम बशी आगगाड्या
चेपून, खचून, ठासून,
जाती भरून ओसंडून
चंद पडेतोंवरी त्या
कितीक गेले चेंगरून
धडपडून लोंबकळून
आपटून फुटूनही
कायमच्या विश्रांतीला.
ऐशा या यातनामाजी
घुसले तबेल्यांत आणि
आमच्या त्या दीनवाण्या
भलतेच कोणी उंट
तोंडओळखीनें आले
ठाण मांडून बैसले
घरासही पारखे केले
त्या उपटसुंभे आम्हासी !
दुःखाचा पेलाही भरला
निर्वासाचा झाला कळस
होते नव्हतें गेलें सारें
नको तेंच मात्र राहिलें
—हें लाजिरवाणें दीन जिणें !

*

धन्य ते हिरोशिमावासी
नी रहिवासी नागासाकीचे
कीं जे परमाणुस्फोटकें
मुक्त झाले क्षणांत पां !
सांगोत खुशाल कोणी
कीं संपलें तें महायुद्ध
थापाच साऱ्या त्या अहो
कोण विश्वास ठेवी तयांवरी
त्या युद्धाच्या निमित्तें कीं
नागवलो आम्हीं निरपराधी
आंचवलोही घरादारा
अर्धपोटीही जाहलो
खुद्द आपुल्याच शहरीं या.
काय तें युद्ध थांबलें ?






नाहीं निश्चयें नाहीं !
अन्यथा ही ऐशी अवस्था
टिकती कशाला आमची ?
कधींच न सरे युद्ध आमुचें
आम्हीं जन्मावे निराश्रित
दैवानेंच पुकारली कीं
लढाई गा आमच्यावरी
म्हणून बाबांनो, सांगतो—
आमचें युद्ध कायमचें
कधींच न जें संपणारें
म्हणूनच हा असा प्राणी
अहा मीं एक निर्वासित
आपुल्याच निवासांतुनी.





खरा गोसेवक.




•• मानसशास्त्राचा मी कांहीं अभ्यासक नाहीं. पण केवळ एक जुनी डायरी पाहून माझ्या मनांत जी उदास विचारांची मालिका सुरू झाली तिच्यावरून मी एवढें सांगूं शकतो कीं—

'भात वाढलाय् हं !' घरांतून वर्दी आली. मी ती ऐकली. पण वाचन सोडून मी कांहीं जागेवरून उठलों नाहीं.

'भात निवून चाललाय् हं !' थोड्या वेळानें घरांतून ताकीद आली. मी जागच्या जागीं बसून वाचीतच राहिलों.

मी कुठल्या पुस्तकाच्या वाचनांत इतका रंगून गेलोय् हें पाहण्याकरितां माझी पत्नी वर आली. माझ्या हातांतलें छोटें पुस्तक घेऊन त्याच्यावरून नजर फिरवीत ती हंसत म्हणाली, 'हनुमान डायरी १९३८ ! घरांतलीं सगळीं पुस्तकं वाचून संपलीं म्हणून आतां जुन्या डायऱ्यांचीं पारायणं सुरू झालीं वाटतं ?'

एरवीं मी तिच्या प्रश्नाला कांहीं तरी मजेदार उत्तर दिलें असतें ! पण—

थट्टा ही आनंदाची बहीण आहे, दुःखाची नाहीं.

१९३८ ची जुनी हनुमान डायरी पाहून मला एवढें मोठें कसलें दुःख झालें असावें याचें तुम्हांला कोडें पडेल. त्यासाठीं डायऱ्या ठेवणाऱ्यांचे जे तीन वर्ग असतात त्यांपैकीं तिसऱ्या वर्गांत ज्याची गणना होईल असा मी प्राणी आहे हें आधींच सांगून टाकलेलें बरें !

दैनंदिनी ही कांहीं लोकांची प्रियसखी असते. म्हणजे दुष्यंतावर आपलें मन जडलें आहे हें शकुंतला जशी फक्त अनुसूया आणि प्रियंवदा यांच्यापाशींच सांगूं शकली, त्याप्रमाणें ही मंडळी दिवसाकांठींचीं आपलीं सारीं नाजुक सुखदुःखें फक्त डायरींतच व्यक्त करूं शकतात. रस्त्यानें जातां जातां सहज दृष्टीला पडलेली एखादी सुंदर तरुणी पाहून मनांत आलेले कोमल विचार, तिसऱ्या वर्गाचें तिकीट काढून इंटरनें प्रवास करीत असतांना तिकीट कलेक्टरनें दिलेल्या तंबीमुळें द्रौपदी-वस्त्रहरणाच्या वेळीं प्रक्षुब्ध भीमसेनाच्या मनाची जी स्थिति झाली असेल तिचा स्वतःला आलेला अनुभव, एखादें पुस्तक मागायला कुणीतरी यावें, आपण तें 'क्ष' नें किंवा 'ज्ञ' नें वाचायला नेलें आहे अशी थाप मारावी आणि अगदीं त्याच क्षणीं आपल्या चिरंजीविनीनें तें पुस्तक हातांत घेऊन त्या खोलींत प्रवेश करावा, म्हणजे अशा वेळीं आपली होणारी तिरपीट, असल्या अनेक गोष्टी या पहिल्या वर्गांतल्या डायऱ्यांत नमूद केलेल्या असतात. भावी काळांतल्या कवींच्या आणि कथा-लेखकांच्या कारखान्यांत पाठ्य पुस्तकें म्हणून असल्या डायऱ्या अत्यंत उपयुक्त ठरतील याबद्दल मला तिळमात्र सुद्धां शंका वाटत नाहीं.

दुसऱ्या वर्गांतल्या डायऱ्या लिहिणाऱ्या लोकांची दृष्टि भविष्य काळावर खिळलेली असते. आपण पुढें कुणीतरी वडे गृहस्थ होणार आहों, आणि कुणीतरी अंधभक्तानें लिहिलेलें आपलें अद्भुतरम्य चरित्र लोक मिटक्या मारीत वाचणार आहेत, या दृष्टीनें ही मंडळी आपल्या डायऱ्यांतलें अक्षर नि अक्षर लिहित असतात. आपली प्रत्येक वर्षाची डायरी ही मोठेपणाच्या मंदिराची एक पायरी आहे अशी या पंडितांची भावना असते. 'काल सर्कस पहायला गेलों होतों' असा साधा उल्लेख त्यांच्या दैनंदिनींत तुम्हाला सहसा आढळणार नाहीं. त्या प्रसंगाचें वर्णन ते असें करतील—'काल रात्रीं सर्कस पहायला गेलों होतों. खुर्चीचं दोन रुपयांचं तिकीट मीं काढणार इतक्यांत सर्कशीचे मालक तिथें धांवतच आले आणि म्हणाले 'छेः छेः ! छेः ! हें काय × × साहेब ? आपण नि तिकीट काढायचं ? मग आमच्या जनावरांत नि आमच्यांत अंतर तें काय उरलं ?' नाइलाजानें तंबूंत फुकट जाऊन बसलों. थोड्याच वेळानें तंबूंत हाहाःकार उडाला. एका पिंजऱ्यांतला सिंह त्वेषानें बाहेर पडला होता. त्याचें काम करून घेणाऱ्या माणसाच्या हातांतून पिस्तुल खालीं गळून पडलें होतें. मी धांवतच रंगणांत गेलों, पिस्तुल झटकन् उचललें आणि तें रोखून हां हां म्हणतां त्याला परत पिंजऱ्यांत जायला लावलें.' पुढें पंचवीस वर्षांनीं आपल्या चरित्रांत हा प्रसंग छापला जाईल त्यावेळीं तो खरोखरच घडला होता किंवा नाहीं याची कुणीही चौकशी करणार नाहीं, आणि तशी कुणी चांभारचौकशी केलीच तर त्याला या गोष्टीच्या खरेखोटेपणाचा बिलकुल पत्ता लागणार नाहीं अशी हा मजकूर लिहितांना मशारनिल्हे विद्वानांची पूर्ण खात्री असते !

पहिल्या वर्गांतली डायरी भावी कवी लिहितात आणि दुसऱ्या वर्गांतली डायरी पाळण्यांतच ज्यांचे मोठे पाय दिसूं लागतात असे लोक लिहितात असें सामान्यपणें

अनुक्रमणिका






म्हणतां येईल. तिसऱ्या वर्गांतली डायरी लिहिणाऱ्या लोकांत इतर सर्व प्रकारच्या माणसांचा समावेश होतो. ‘परटाला दिलेले कपडे’, ‘आदितवारीं विकत घेतलेलें लोणी’, ‘दुधाच्या रतीबाचा हिशेब’ हींच काय तीं त्यांच्या या ग्रंथांतलीं मुख्य प्रकरणें असतात. जी १९३८ ची डायरी वाचतां वाचतां पानें वाढलीं आहेत हें सुद्धां मी विसरून गेलों होतों तिच्यांतली तीनशें पासष्ट पानें कुणी संशोधकानें धुंडाळली असती तरी ‘केस कापणें–आठ आणे’ यापेक्षां अधिक सुंदर यमक असलेलें काव्य कांहीं त्याला तिच्यांत आढळलें नसतें! मी तिचीं पानें चाळण्यांत जो गुंग होऊन गेलों होतों तो तिच्यांतल्या मजकुराच्या रसवैचित्र्यामुळें नव्हे तर त्या डायरींतलें अक्षर पाहून!

तें अक्षर माझ्या एका माजी मित्राचें होतें. त्या वेळीं तो आमच्या घरांत राहत असे. माझे सर्व हिशेब ठिशेब तोच टिपीत असे. आतां तो गृहस्थ याच गांवांत राहतो. पण तो आमच्या घराकडे फिरकत सुद्धां नाहीं. रस्त्यानें जातां येतांना अथवा एखाद्या दुकानांत चुकून त्याची नि माझी गांठ पडली तर तो दुसरीकडेच पाहूं लागतो. तो आमच्या घरांत राहात होता तेव्हां भांड्याला चुकून भांडें लागून आवाज व्हावा त्याप्रमाणें मी केव्हां तरी त्याच्यावर रागावलों असेन. पण असल्या क्षणिक रागापेक्षां कितीतरी पटींनीं अधिक निरपेक्ष असें प्रेमही मी त्याच्यावर केलें होतें. असें असून—

कांहीं तरी निमित्त होऊन एखादी जुनी जखम वाहूं लागावी त्याप्रमाणें ती डायरी पाहून माझ्या मनाची स्थिति झाली. मी ती डायरी परत अडगळींत टाकून मुकाट्यानें उठलों, पानावर जाऊन बसलों, आणि थोडा-जेवलोंही. पण सारा वेळ माझें मन आंतल्या आंत अस्वस्थ होतें! राहून राहून इंग्रजी पांचवींत पाठ केलेला ‘यथा काष्ठंच काष्ठंच’ हा श्लोक मला आठवत होता. एखाद्या महासागरांत दोन लाकडाचे ओंडे वाहत वाहत एकमेक यावेत आणि कांहीं दिवस बरोबर वाहत जाऊन पुन्हां दोघांच्या वाहण्याच्या दिशा भिन्न व्हाव्यात तशी आमच्या मैत्रीची स्थिति झाली होती! लाकडाच्या ओंडक्यांना भावना नसल्यामुळें मैत्रीचें सुख ज्याप्रमाणें त्यांना जाणवत नसेल त्याप्रमाणें ताटातुटीच्या दुःखाचीही त्यांना कधीं कल्पना येणें शक्य नाहीं! पण मनुष्य हा कांहीं लाकडाचा ओंडका नाहीं. आपल्या आयुष्यांत आपुलकीनें आलेल्या आणि हृदयाच्या ओलाव्याची देवाण घेवाण करून राहिलेल्या माणसाचा अकारण वियोग त्याला असह्य झाल्यावांचून कसा राहील?

मी माझ्या आयुष्याचें सिंहावलोकन करूं लागलों. आतां माझ्या मनाची तगमग अधिकच वाढली. एक ना दोन असे अनेक मित्र माझ्या डोळ्यांपुढें उभे राहिले. माझ्या आयुष्यांतून ते केव्हां निघून गेले हें माझें मला सुद्धां नक्की सांगतां आलें नसतें! माझ्या बरोबर गप्पागोष्टी करतांना यांच्यापैकीं कित्येकांची रात्र संपली पण गोष्टी संपल्या नाहींत अशी स्थिती झाली होती. निरोप देतांना मी जो खांद्यावर प्रेमानें हात ठेवीत असे त्या हाताच्या ओझरत्या स्पर्शांत कित्येकांना वात्सल्य सांठल्याचा भास झाला होता. कुणाच्या अश्रूंत अश्रु मिळवून मी माझें दुःख हलकें केलें होतें, कुणाच्या स्वरांत स्वर मिळवून साहित्यसेवेचे आणि समाजसेवेचे मोठमोठे संकल्प मी उच्चारले होते, कुणाच्या गळ्यांत गळा घालून मृत्युच काय तो आपली ही मिठी सोडवूं शकेल असें अभिमानाचे उद्गार मी काढले होते. पण आज त्यांच्यापैकीं अनेक या जगांत असूनही माझ्यापासून दूर गेले आहेत. माझ्या मनांत आलें—मृत्यु हा माणसाचा खरा शत्रु नाहीं. मृत्यूपेक्षां जीवनच त्याचें अधिक वैर साधतें!

केशवसुतांची ‘सिंहावलोकन’ ही कविता आजपर्यंत मी सामान्य समजत आलों होतों. तिचें मर्म आज आपल्याला पुरेपूर कळलें असें मला वाटूं लागलें. या कवितेच्या प्रारंभीच केशवसुतांनीं एक करुण प्रश्न केला आहे—

“मुखा फिरवुनी, जरा वळुनि पाहतां मागुती
कितीक हृदयें वदा चरकल्याविणें राहती?”

जीवनाच्या उत्तरार्धांत पूर्वार्धांतल्या मधुर स्मृतींशिवाय जगण्यासारखें माणसाजवळ दुसरें कांहींच उरत नाहीं अशी खात्री झाल्यामुळें ते पुढें म्हणतात—

“प्रदेश किति मागुते रुचिर तें बरें टाकिलें,
कितीक तटिनीतटें श्रम जिथें अम्हीं वारिले;
किती स्मृतिस धन्यतास्पद वनस्थली राहिल्या,
जिथें धवलिता निशा प्रियजनासवें भोगिल्या!”

या ओळी मनांत घोळवीतच मी जुन्या कागदपत्रांच्या गळाठ्यांत फेंकून दिलेली १९३८ ची ती डायरी पुन्हां प्रेमानें उचलली आणि व्याकुळ दृष्टीनें रुक्ष आंकड्यांनीं भरलेल्या तिच्या पानांवरून पुन्हां नजर फिरवली. मित्राच्या मृत्यूपेक्षांही मैत्रीचा मृत्यु अधिक दुःखकारक आहे असें माधवराव पटवर्धनांनीं कां म्हटलें असावें याची मला आतां कल्पना आली. आयुष्य हा जुगाराचा खेळ आहे हें सुभाषित लिहिणारा आणखी एक गोष्ट सांगायला विसरला असावा असें मला वाटूं लागलें. ज्या जुगारांत खेळणारा आरंभीं खूप जिंकतो आणि पुढेंपुढें एकसारखा हरूं लागतो असा जुगार म्हणजे मनुष्याचें जीवन! धर्मराज दुर्योधनाबरोबर द्यूत खेळायला लागला तेव्हां त्यांचें असेंच झालें. पहिल्या पहिल्यांदा तो एकसारखा जिंकत गेला. त्या उन्मादांत आपण केव्हां हरूं लागलों हें त्याचें त्यालासुद्धां कळलें नाहीं. शेवटीं दासी केलेल्या द्रौपदीला दुःशासनानें पदर धरून भर दरबारांत ओढीत आणली तेव्हां कुठें धर्माचे डोळे उघडले! आयुष्यांत मनुष्यालाही हाच अनुभव येतो! नाहीं? निदान मी तरी या क्षणीं तो कटु अनुभव चाखीत होतों.

सुख हा जीवनाचा अलंकार आहे. तो प्रत्येकाला लाभतोंच असें नाहीं. पण दुःख हा मात्र जीवनाचा आत्मा आहे, त्याच्यावांचून या जगांत कुणीच जगूं शकत नाहीं, या विचारानें आतां माझें मन अगदीं भारावून

अनुक्रमणिका






गेलें. जगांतलीं अत्यंत सरस काव्यें दुःसह दुःखांतूनच निर्माण झालेलीं असतात. ही शेलेचीं उक्ति पुनः पुन्हां माझ्या कानांत घुमूं लागली.

याच वेळीं टपालवाला आला नसता तर त्या डायरीकडे पाहात आणि या मुक्या दुःखाचा विचार करीत मी किती वेळ बसलों असतो कुणाला ठाऊक !

आज टपालांत एकच पत्र होतें. गतवर्षी ज्याला विद्यार्जनासाठीं मी अल्पस्वल्प मदत केली होती अशा एका हरिजन विद्यार्थ्याचें होतें तें. तो माझी आठवणसुद्धां विसरून गेला असावा अशी माझी कल्पना होती. तसें पाहिलें तर त्याच्यासाठीं मी विशेष असें कांहींच केलें नव्हतें. पण पत्राच्या आरंभींचा त्याचा 'प्रिय भाऊसाहेब' हा मायना वाचूनच मला कितीतरी बरें वाटलें ! पत्रांत त्यानें लिहिलें होतें—'मला वरचेवर तुमची आठवण होते. तुमच्याकडे यावें, तुमच्या गप्पागोष्टी ऐकाव्यात, तुम्ही आजारी असलांत तर तुमचीं लहानसहान कामें करून तुमचे श्रम हलके करावेत असें मला फार फार वाटतें. पण पायांत ही नोकरीची बेडी आहे ना ? एकेकदां वाटतें—देवानें माणसाला पंख दिले असते तर किती बरें झालें असतें ! म्हणजे भुर्रकन् उडत येऊन मी तुम्हांला भेटून तरी गेलों असतों !'

थंडीच्या दिवसांत उजाडतांना दिसणारें धुकें सूर्य उगवतांच जसें नाहींसें होतें, तसें ती जुनी डायरी दृष्टीला पडल्यापासून जें विषादाचें पटल माझ्या मनावर पसरलें होतें तें या पत्रानें क्षणार्धांत नाहींसें केलें. आयुष्य हा चंचल जुगार नाहीं, ती एक अटळ नियमावर अवलंबून असलेली क्रीडा आहे, असें मला वाटूं लागलें.

आपल्या जीवनवृक्षाला वसंतऋतूंत खूप मोहर येतो, पण पुढें निसर्गनियमाला अनुसरून त्यांतला बराच मोहोर गळून जातो. त्या गळून जाणाऱ्या मोहोराकडे पाहून आपण दुःखी होतों आणि जग दुःखानें भरलें आहे म्हणून आक्रोश करूं लागतों. झाडावर राहिलेला जो मोहर असतो त्याचीं यथाकाल फळें होत असतात इकडे आपलें लक्षच जात नाहीं. आयुष्याचें सिंहावलोकन करतांना आपल्या हातून इतक्या चुका झाल्या, इतक्या लोकांना आपण दुःख दिलें, इतके मित्र कांहीं कारण नसतांना आपणाला सोडून गेले, असा हिशेब करून आपण मनांत झुरत राहतों. 'सुख पाहतां जवापाडें ' दुःख पर्वताएवढें ' असें लिहिणारा तुकारामसुद्धां कांहीं या नियमाला अपवाद नाहीं. पण तुकारामाला उभ्या आयुष्यांत कुठला हिशेब बरोबर करतां आला म्हणून आपण त्याच्यावर या बाबतींत विश्वास टाकावा ? घाटावर नारळ विकत घेऊन ते कोंकणांत विकण्याची कल्पना ज्याला सुचूं शकते—तो कवीच काय महाकवीसुद्धां होऊं शकेल ! पण कुठलाही जमाखर्च तो बरोबर मांडूं शकेल ? अं हं ! आणि त्यांतल्या त्यांत आयुष्याचा तर मुळींच नाहीं.

मानसशास्त्राचा मी कांहीं अभ्यासक नाहीं. पण केवळ एक जुनी डायरी पाहून माझ्या मनांत जी उदास विचारांची मालिका सुरू झाली तिच्यावरून मी एवढें सांगूं शकतो कीं आपल्या वांट्याला आलेलीं सुखें विसरणें आणि दुःखें उगाळीत बसणें हा

मनुष्याचा स्वभावधर्मच होऊन बसला आहे. उन्हांतून फार वेळ चालून 'हुश्श हुश्श' करीत घरीं आल्यावर आपण जें वर्णन करीत सुटतों तें त्या चटके देणाऱ्या उन्हाचें मधून मधून सावली देऊन ज्यांनीं आपला शीण हलका केला असेल त्या वाटेवरल्या वृक्षा-बद्दल आपण या चर्पटपंजरींत एक अवाक्षर-सुद्धां काढीत नाहीं. उन्हाळा आला कीं माणसें अंगाची लाही होते म्हणून तक्रार करूं लागतात! हपूस पायरी खायचे दिवस आले म्हणून मात्र त्यांच्यापैकीं एकसुद्धां हर्षनिर्भर वृत्तीनें ग्रीष्माचें स्वागत करीत नाहीं. मृगाची नौबत वाजली कीं पावसाची चिर-चिर सुरू झाली म्हणून आपण कुरकुर करूं लागतों. पण पर्जन्याची ही अखंड प्रार्थना ऐकूनच धरणीमातेच्या कुशींत लपलेलें अन्न-ब्रह्म प्रगट होतें हें आपण कधींच लक्षांत घेत नाहीं. श्रावणांत आकाशाच्या या टोंका-पासून त्या टोंकापर्यंत पसरलेलें इंद्रधनुष्याचें दृश्य इतकें रम्य आणि भव्य असतें कीं त्याच्या क्षणिक दर्शनासाठीं सुद्धां माणसानें दोन तीन महिने चिखल तुडवायला नाराज होऊं नये. पण—मनुष्याचें विकृत मन सुख-दुःखांच्या असंख्य कणांतून दुःखच तेवढें अचुक वेंचून घेतें नि त्याच्याकडे पाहत झुरकुढतत बसतें!

या दृष्टीनें मी माझ्या आयुष्याकडे पाहूं लागलों तेंव्हां केशवसुतांच्या 'सिंहावलोकन' या कवितेंतही मनुष्यमात्राचा हाच विकृत दृष्टिकोन प्रतिबिंबित झाला आहे असें मला वाटूं लागलें. माझ्या हातून आयुष्यांत इतरांना दुखविणाऱ्या अनेक गोष्टी झाल्या असतील. पण मी आठ वर्षांचा असतांना माझे वडील अर्धांगवायूनें आजारी पडले, तेंव्हां त्यांच्या चार साडेचार वर्षांच्या आजारी-पणांत त्यांची मी जी सेवा केली तिचें समा-धान अजूनही मला उल्हसित करूं शकतें ही गोष्ट मी कां विसरावी? दैवाची प्रतिकूलता मला अनेकदां तीव्रतेनें प्रत्ययाला आली आहे. पण फारसा अभ्यास न करतां प्रवेशपरीक्षेंत मी आठवा आलों तेंव्हां किंवा शिरोड्यासारख्या एखाद्या आडबाजूच्या खेडेगावांत राहात असूनही चित्रपट लिहिण्याचा मला प्रथम आग्रह झाला तेंव्हां दैव माझ्याच बाजूचें नव्हतें का? या गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे माणसानें आपल्या आयुष्यांतल्या दुःखांचें चिंतन करण्याऐवजीं सुखांचाच विचार करावा हें अधिक बरें असें मला वाटतें.

माणसानें आयुष्यांतल्या दुःखापेक्षां सुखाचाच अधिक विचार करावा—

मी धांवतच वर गेलों. ज्या कागदपत्रांत ती १९३८ ची डायरी मी टाकली होती ते मी चाळूं लागलों. लवकरच मला एक पत्र सांपडलें. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांचें १९२८ सालांतलें पत्र होतें तें. त्या पत्रांत त्यांनीं लिहिलें होतें 'तुम्ही खरोखरच भाग्यवान् आहां. तुमच्या मित्रासारखे मित्र मला लाभले असते तर मी स्वतःला अत्यंत सुदैवी मानलें असतें'! कोल्हटकरांनीं हें पत्र लिहिलें तेंव्हांची माझी परिस्थिति माझ्या डोळ्यांसमोर उभी राहिली. शाळा देईल त्या वीस पंचवीस रुपयांवर मी शिरोड्यांत काम करीत होतों. माझें लग्न ठरलें होतें. पत्नीच्या दागिन्यांना आणि लग्नाच्या इतर खर्चाला मिळून हजार रुपयांची तरी जरूर होती. माझ्यापाशीं फुटकी कवडीसुद्धां नव्हती. माझ्यापासून हजारों मैल दूर असलेल्या माझ्या एका मित्राला भीत भीत मी माझी ही अडचण कळविली. एके दिवशीं एक हजारांचा एक चेक माझ्या हातीं आला. चेक कसा असतो हें आयुष्यांत पहिल्यांदाच पाहात होतों मी! त्याच्या बरोबर दोन ओळींचें एक साधें पत्र होतें! श्रीपाद कृष्णांना मी हें सारें कळविलें तेंव्हां त्यांनीं वर दिलेलें पत्र मला पाठविलें होतें.

माझ्या ह्या मित्राची सविस्तर माहिती व्हावी अशी तुम्हांला इच्छा होणें स्वाभाविक आहे. पण—मी तिसऱ्या वर्गाची डायरी लिहि-णारा आहे हें तुम्हांला ठाऊकच आहे. तिसऱ्या वर्गाच्या डायऱ्यांत न्हावी, परीट, भाजीवाली यांच्याशिवाय दुसरी मंडळी चुकूनसुद्धां भेटायची नाहींत! आतां मात्र मला वाटतें कीं मी पहिल्या वर्गाची डायरी लिहिणारा असतों तर फार बरें झालें असतें. तसली १९३८ ची डायरी माझ्यापाशीं असती तर ही १९३८ ची डायरी क्षणमात्र सुद्धां मला विषण्ण करूं शकली नसती! उलट मी मुनाला म्हटलें असतें—लिंबाचें लोणचें आणि गाईचें तूप जितकें अधिक जुनें तितकें अधिक औषधी असें म्हणतात ना? डायऱ्याही तशाच असतात!



काय बुवा, कुणाला बरं मत द्यायचं?



ही दिवाळी आणि
नूतन वर्ष आमच्या
चाहत्यांना सुखाचें
आणि समृद्धीचें जावो !



# आयडिअल पिक्चर्स

२४१ बी खेतवाडी मेनरोड मुंबई

उच्च अभिरुचीच्या चित्रपटांचे

— प्रकाशक —

ट्रे. नं. ४३७०४



# कावळ्यांचें गाणें

[ शेताच्या कुंपणावर बसून बुजगबाहुल्याच्या भीतीनें उगाच उपासपोटीं कोलाहल करणाऱ्या कावळ्यांना उद्देशून त्यांचा म्होरक्या म्हणतो—]

काक्का काक्का अशा रिकाम्या फुकाच कां हो हांका ?
पिकास आला भातजोंधळा तरी उपाशी कां कां ?
देवाजीचें धन सगळ्यांचें साधुनि घ्या हा मोका
शिकवूं देवाघरची नीती कुंपणवाल्या लोकां.
धीट बोलती जात आपुली उडा, लौकिका राखा
इथेंच नातरि पंख आणखी प्राण पांखडुनि टाका.
काळा डगलेवाला का हा तुम्हां घालितो धाका ?
फुंकर मारुनि असें कशाला पिऊं पाहतां ताका ?
मृत्यु यायच्या आधिंच तुम्हीं मरतां भीतीनें कां ?
मारून भीती तारूं आपण सारे एकामेकां !
प्रश्न एक मी विचारितों तो कान देउनी ऐका
शंख आमुचा ऐकुनिही हा वळुनी न बघे कां कां ?
हा बहिरा, हा मुका, न याच्यां झोंबे मिरची नाका
पहा फोडिला एक आंख मी, दुसरा तुम्ही कोंका
चला, उडा, या, उरली सुरली मनिंची शंका हाका
हंसतिल त्यांवर दाणे खाउनि फोलकटें हो टाका !

कवि:—बा. भ. बोरकर.
















* * * *

आसावरी

: चित्रकार :

दीनानाथ दलाल.

* * * *

दीपावली १९४५

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

# बोलण्याची कला आणि ऐकण्याची कला

— श्री. के. क्षीरसागर

जेव्हां एखाद्या प्रसिद्ध पुरुषाचें स्वभाव-चित्र पाश्चात्य लेखक रंगवितात तेव्हां त्याच्या संभाषणचातुर्याचाहि उल्लेख—अर्थात् त्याचें अंगीं संभाषणचातुर्य असल्यास!—करतात. कारण कोणाहि माणसाचे जे अगदीं पहिले गुण आपल्या लक्षांत येतात त्यांत रूप आणि बोलणें हे होत. किंबहुना बोलण्यापुढें रूपहि विसरून जातें आणि अशा प्रकारें डोळ्यां-हूनहि आपण कानांना महत्त्व देतों म्हटलें तरी चालेल!

बोलण्यापुढें रूपहि विसरून जातें हें मी दोन अर्थांनीं म्हणतों. कित्येक माणसांची भाषणशैली इतकी आकर्षक असते, कीं तिच्यामुळें त्यांच्या रूपाभावाचा विसर पडतो; तर कित्येक माणसें तोंड उघडतांच इतकीं उघडीं पडतात कीं त्यावेळीं त्यांना रूप चांगलें लाभलें असूनहि त्यांचें तोंड चुकवा-वेंसें वाटतें. शिवाय बोलण्याची कला ही अशी विचित्र कला आहे कीं, 'कला' म्हणतांच ज्यांच्या कपाळाला आठ्या पडतात त्यांनाहि तिच्या शिवाय चालत नाहीं. आणि मोठमोठ्या लोकांच्याहि अंगीं ती असतेच असें नाहीं.

आपल्याकडेहि हल्लीं समकालीनांचीं स्वभावचित्रें रेखाटण्याची, आठवणी लिहि-ण्याची पद्धत वाढत आहे. आणि त्या निमित्तानें कित्येक प्रसिद्ध व्यक्तींच्या संभाषणचातुर्याकडे अथवा त्याच्या अभावाकडे लक्ष वळत आहे. साहित्यिक म्हणून, पुढारी म्हणून वा कला-वन्त म्हणून ज्यांना प्रसिद्धि आहे, अशांच्या लक्षांतहि ही गोष्ट येऊन चुकल्यामुळें त्यांचें लक्ष स्वतःमधील या भागाकडे वळत आहे. आणि कित्येक तर प्रसिद्धीचें एक साधन या दृष्टीनें संभाषणाचें एक तंत्रच बनवितात असें आढळून येतें. अर्थात् त्यामुळें त्यांना हवी त्या प्रकारचीच प्रसिद्धि मिळेल असें नाहीं! कारण संभाषणासंबंधीं आपल्याकडे कित्येक चमत्कारिक कल्पना आढळून येतात! कित्ये-कांचा कल जास्त बोलण्याकडे असतो. युद्धांत केवळ संख्याबळावर शत्रूचा पाडाव करण्याची म्हणून एक तऱ्हा असते. त्या-वरून या मंडळींनीं आपली पद्धत बसविली असावी. कित्येकांचा पुस्तकी बोलण्यावर भर असतो. कित्येक भयंकर जपून बोलत आहेत, याची श्रोत्याला सारखी जाणीव होते. तर कित्येक औपरोधिक बोलण्यांत हुशारी मान-तातसें दिसतें. कित्येक न बोलतां बसून राहण्यांत मोठेपणा मानतात. बरीच मंडळी असतील तर ही युक्तीहि करण्यास हरकत नाहीं. पण दोघांत एकजण घुमेपणानें बस-ल्यास मला थोडें कसेंसेंच वाटतें!

पण ज्यांच्या संभाषणानें आल्हाद होतो असेहि लोक भेटत नाहींत असें नाहीं. यांत लहान मोठे, प्रसिद्ध–अप्रसिद्ध सर्व तऱ्हेचे लोक असूं शकतील. पण माझ्या वाचकां-नाहि सहज ओळख पटावी म्हणून मी प्रथम प्रसिद्ध व्यक्तीच घेतो. अर्थात् यांत अमुकच कां निवडल्या आणि अमूक कां वगळल्या अशी तक्रार मात्र चालणार नाहीं. ज्या प्रसिद्ध व्यक्तींचा आणि माझा परिचयच आला नाहीं त्यांना मी वगळणारच. आणि ज्यांचा संबंध आला अशाहि कित्येक व्यक्तींचा उल्लेख मला टाळावा लागेल.

प्रसिद्ध व्यक्तीपैकीं ज्या व्यक्तीच्या संभा-षणांत मला अनुपमेय आल्हाद होई अशा व्यक्तींत कै. माधवराव पटवर्धन यांचें नांव मी अग्रभागीं घालीन. बुद्धिमत्ता, विद्वत्ता उत्कटता, विषयवैचित्र्य, वगैरे अनेक दुर्भिळ गुण माधवराव यांच्या संभाषणांत जितके आढळत, तितके मला दुसऱ्या कोणाहि प्रसिद्ध महाराष्ट्रीयाच्या संभाषणांत आढळले नाहींत. त्यांच्या माझ्या वृत्तींत आणि मतांत सर्वथैव ऐक्य नसतां त्यांच्याशीं बोलण्यांत वादविवादाचें सौख्य मिळे. मी अनेक बुद्धि-मन्तांशीं आणि विद्वानांशीं बोललों आहे. तथापि माधवरावांशीं बोलण्यांत जें एक मोकळ्या मैदानाचें आणि सोसाट्याचें वाता-वरण असें, तें मला कुठेंहि आढळलें नाहीं. एखाद्या विषयावरील माधवरावांचीं मतें पटत नसली, नव्हे साफ चूक वाटली, तरीहि त्यांच्या प्रतिपादनशैलीचें आणि प्रामाणिक-पणाचें तेज इतकें प्रबल असें कीं, सत्य आपल्या बाजूला असलें तरी सत्यप्रीति त्यांच्या बाजूला अधिक आहेसें वाटे.

माधवरावांना विनोद आवडे; आणि ते भावडे व खिलाडू असल्यानें क्वचित् त्यांच्या मतांचा उपहास करून विनोद केला तरी ते मनमुराद हसत; व फिरून आपलें म्हणणें सरळ रेषेंत मांडून दाखवीत. बोलतां बोलतां उसळून ते इंग्रजींत शिरले म्हणजे त्यांच्या अस्खलित आणि ऐटदार इंग्रजीचा आनंद कांहीं वेगळाच असे! खाजगी बोलण्यांत ते भाषाशुद्धीचा आग्रह धरीत नसत हा मी एक

अनुक्रमणिका

**कारण ऐकण्याची कला ही बोलण्याच्या कलेइतकीच महत्त्वाची आहे. आणि या दोन कला परस्परावलंबी तर आहेतच ! ऐकण्याची कला नाहींशी झाल्यास बोलण्याची कला टिकणें शक्य नाहीं.**

---

महालाभच समजत असे. माधवरावांच्या बोलण्यांत क्वचित् एकाच कारणानें दोष उत्पन्न होई. ते सर्व माणसांना जवळ जवळ सारखींच सरळ समजत. स्वभाव लक्षांत घेऊन बोलण्या इतकी विनोदबुद्धि त्यांच्या जवळ नव्हती ! व त्यामुळें क्वचित्कदां अस्थानीं मोकळेपणा आणि औदार्य दाखविण्याचा दोष त्यांच्या हातून घडे.

तांब्यांचें बोलणें म्हणजे मूर्तिमंत काव्यप्रेम असें. ते प्रारंभीं अबोल व गंभीर वाटत पण बैठक रंगल्यावर इंग्रजी मराठी कवितांच्या पंक्ति, तत्त्वप्रतिपादन, प्रतिस्पर्धी विचारसरणीवर हल्ला वगैरे सर्व प्रकार पहावयास सांपडत. बोलतांना त्यांच्या डोळ्यांत जें विलक्षण तेज दिसे तें साधारणतः गूढवाद्यांखेरीज कोणाच्या डोळ्यांत दिसत नाहीं, अशी माझी समजूत आहे. तांबेहि मधेंच उसळून इंग्रजी बोलत. तांब्यांच्या बोलण्यांत उत्कटता व आवेश असे पण ते भोवतालच्या लोकांपासून अलिप्त आहेतसें वाटे. अर्थात् मनमोकळेपणाचा आनंद माधवरावांच्या बोलण्यांत अधिक मिळे.

माधवराव किंवा तांबे यांचे इतर गुण कोणतेहि असोत, बुद्धिमत्तेंत त्यांची बरोबरी करूं शकतील अशीं माणसें नसतात असें नाहीं. पण केवळ बुद्धिमत्तेनें संभाषण रंगत नाहीं. माधवरावनंतरच्या पिढींतील माणसांच्या बाबतींत तर मी असें पाहिलें आहे, कीं बुद्धिमान माणसेंच संभाषणाचा आनंद देण्यास नालायक ठरतात ! या मंडळींपैकीं कांहींचा ठराविक विषय म्हणजे 'लेटेस्ट' इंग्रजी पुस्तकांचे उल्लेख. व त्यांतहि रमून जाऊन एखादा विषय सहजगत्या विचार-विनिमयाकरतां काढतील असें नाहीं. अखिल जग म्हणजे latest पुस्तकें वाचण्याचें एक शर्यतीचें मैदान आहे, अशी त्यांची कल्पना दिसते ! अर्थात् अशा संभाषणाचें पर्यवसान पुस्तकाच्या कॅटेलॉगची तोंडी आवृत्ति काढण्यांत होतें ! कारण 'लेटेस्ट' म्हटलों तरी प्रत्येक जण तींच पुस्तकें वाचील असें नव्हे. शिवाय ऐकणाराही बहुधा या लेटेस्टच्या रोगापासून मुक्त नसल्यानें तो आपली यादी बाहेर काढतो. आणि मग खऱ्या संभाषणाचा भुकेला बहुधा तेथून काढता पाय घेतो !

अशा बुद्धिमन्तांची आणखी एक कल्पना म्हणजे औपरोधिक भाषण म्हणजेच काय तो हुशार व विनोदी ठरण्याचा मार्ग ! कित्येकजण बुद्धिपुरःसर स्वीकारलेल्या अबोलपणाची साथ या उपरोधोर्मीस करावयास लावतात. कदाचित् मंद बुद्धीच्या श्रोत्यावर या अस्त्राचा झालेला इष्ट परिणाम पाहून त्यांनीं त्याचा सार्वत्रिक प्रयोग चालविलेला असतो कीं काय कोण जाणे ! माधवराव पटवर्धनांच्या नेमकी विरुद्ध अशी ही तऱ्हा झाली ! माधवराव आपल्या समोर कुत्सित अगर निर्बुद्ध मनुष्य असला तरी तितक्याच मोकळपणानें आणि तितक्याच उत्कटतेनें बोलत. तर हे उपरोक्त वर्गांतील लोक मंदमति आणि कुत्सित लोकांकरितां तयार केलेले उपरोधास्त्र सर्रास सर्वांवर सोडतात. त्यांच्या या संवयीचें मूळ कदाचित् त्यांना त्यापूर्वी भेटलेल्या श्रोतृवर्गांत असेल. पण श्रोत्याच्या वृत्तीप्रमाणें आणि कुवतीप्रमाणें ज्याच्या संभाषणपद्धतींत बदल होत नाहीं, त्याची पद्धति मी जीवन्त पद्धति समजत नाहीं.

आणखी एक पद्धति म्हणजे 'अनिस.वध' संभाषण पद्धति ! या पद्धतीचे भोक्ते मत देतांना घाबरतील, स्तुति करतांना घाबरतील-साधें विधान करतांना सुद्धां घाबरतील. समजा त्यांना असें म्हणायचें आहे कीं, "गटेचें आत्मचरित्र किंवा रोमाँ रोलाँ चे 'आय विल् नॉट रेस्ट्' किंवा मॉरिस् हिंडसचें एखादें पुस्तक....मी परवां वाचलें व तें मला फारच आवडलें...." तर एकदम ते तसें म्हणून मोकळे होणार नाहींत; ते खालीं मान घालून चोरट्या नजरेनें तुमची चर्या न्याहाळीत म्हणतील "आपण रोमाँ रोलाँ चें 'ऑय विल् नॉट रेस्ट्' वाचलें असेलच." आणि समजा तुम्ही ते वाचलें असलें, तर त्यांचा रोमाँ रोलाँ विषयींचा उत्साह आणखी पन्नास टक्के कमी होईल ! आणि तुम्हीं वाचलें आहे कीं नाहीं याची आधीं चौकशी करून ठेवण्यांत तरी जिला मी घाबरटपणाची मनोवृत्ति म्हणतो तीच असते. आपण एखाद्याचें मोठें कौतुक करायला जावें आणि लोकांना ती नवीन नसावी मग त्यांत आपलें काय राहिलें?

आपण दुसऱ्याच्या हास्याचा अगर अनुकंपेचा विषय होऊं नये ही एकमेव काळजी वाहतां वाहतां या मंडळींच्या जवळ जी काय अल्पस्वल्प उत्कटता आणि सहजता असेल तीहि कोळपून जाते. त्यांचें बोलणें म्हणजे भांडून अबोला धरलेल्या नवराबायकोंनीं अथवा नुकतेंच सुतक आलेल्या भावांनीं वेळ घालविण्याकरितां मांडलेल्या बुद्धिबळाच्या डावासारखें असतें ! डोक्यास शीण होऊन पुनः खेळाचा आनंद नाहीं तो नाहींच !

अशा प्रकारचा सावधपणा अधिकारारूढ लोक, सार्वजनिक पुढारी वगैरेंना भिन्न हितसंबंधाच्या लोकांशीं बोलतांना दाखविणें जरूर असते; पण साध्या खेळीमेळीच्या बैठकींतहि जे लोक इतके जपून बोलतात त्यांच्यापासून कोणाला कधीं आनंद मिळत असेलसें मला नाहीं वाटत. शेक्सपियरच्या शब्दांत थोडा फरक करून सांगायाचें झाल्यास मी "They would weep on their wedding day" असें म्हणेन !

संभाषणांत मोकळेपणा व उत्कटपणा यांना मी पहिलें स्थान देतो. पण याचा अर्थ जे भडाभडा एकसारखे बोलत राहतात त्यांची संभाषण-पद्धति मला मान्य आहे असा नव्हे. कारण एक गोष्ट मला सांगितली पाहिजे एकसारखे बोलून श्रोत्याला गुंगवून टाकणाऱ्या मंडळींच्या जवळ मोकळेपणा आणि

उत्कटपणा असतोच असें नाहीं. वर वर्णिलेल्या 'सावध-पद्धतीं'त प्रतिपक्षाची मात न होऊं देण्याबद्दल जी 'परेशानी' असते तीच या 'धवधवा-पद्धतीं'त असते.

कधीं कधीं केवळ तारतम्याच्या अभावामुळेंहि हा अतिरेक होतो. अर्थात् उत्कटतेच्या खालोखाल तारतम्य, व चातुर्य यांना महत्त्व आहे. तारतम्याच्या अभावामुळें अथवा अनजानपणामुळें भाषणातिक्रमण करणारांत, तरुण मंडळींची संख्या अधिक असते. एखादे-वेळीं ही मंडळी एखाद्या माणसाबद्दल आदर दाखविण्याकरितां म्हणून भेटीला जातात आणि त्याचें मन आपल्यासंबंधीं चांगलें व्हावें, त्याला आपली बुद्धिमत्ता दिसावी म्हणून त्याच्यावर भाषणाची सरबत्ती सुरू करतात. यांत तारतम्याभावामुळें एकच चूक झालेली असते. ती ही कीं, बोलण्यापेक्षांहि ऐकण्यांत कित्येकदां अधिक बुद्धिमत्ता दिसून येते, हें ही मंडळी लक्षांत घेत नाहींत! विशेषतः आपल्याहून अधिक बुद्धिमान् आणि ज्ञानवान् मनुष्याकडे गेल्यानंतर आपल्या भाषणानें त्यास आपली बुद्धिमत्ता दाखविण्यापेक्षां आपल्या श्रवण-पद्धतीनें ती दाखविणेंच अधिक सोपें व श्रेयस्कर असतें.

कारण ऐकण्याची कला ही बोलण्याच्या कलेइतकीच महत्त्वाची आहे. आणि या दोन कला परस्परावलंबी तर आहेतच! ऐकण्याची कला नाहींशी झाल्यास बोलण्याची कला टिकणें शक्य नाहीं. माझ्याकडे माझे चाहते म्हणून आलेल्या कांहीं लेखकलेखिकांना ऐकण्याच्या कलेचें महत्त्व मला ऐकवावें लागलें. बिचारे बुद्धिमान् आणि सज्जन होते. त्यांना माझा परिचय आणि माझें भाषण हवें होतें म्हणून तर ते मुद्दाम ओळख करून घेऊन आले होते! पण उत्साहाच्या भरांत ते आपल्या आगमनाचा हेतूच विसरून गेल्यासारखे दिसले!

पण मला त्या मंडळींनीं दिलेला मोठेपणा कदाचित् काल्पनिकहि असेल; आणि ऐकण्याची कला अंगीं नसल्यानें माझ्या बैठकींत त्यांचें कदाचित् तितकेसें नुकसान झालेंहि नसेल. पण ऐकण्याची कला अलीकडे लुप्त होत चालली आहे हें मला पुण्यांतील एका प्रख्यात पंडिताच्या बैठकींतील अनुभवावरूनहि अनुभवास आलें. मी माझ्या एका विनोदी मित्राला एकदा गमतीनें म्हटलेंहि होतें, कीं "दोन लुप्तप्राय कला" या विषयावर मी एकदा लिहिणार आहे. तो म्हणाला, "त्या कोणत्या?" मी म्हणालों, "The art of listening and the art of blushing: ऐकण्याची कला नाहीं म्हणून तरूण पुरुष ज्ञानाला मुकत आहेत आणि लाजण्याची कला नसल्यानें तरूण स्त्रिया सहजलभ्य अशा मोहकतेला मुकत आहेत!"

मी केवळ गम्मत म्हणून बोललों असेन पण या दोहोंतहि साधारण-धर्म विनयाचा आहे. त्याच्या अभावामुळें आजच्या कित्येक तरुणांना आपल्याहून अधिक योग्यतेच्या व आपल्याहून वेगळ्या पिढींतील व्यक्तींकडून ज्ञानलाभ करून घेतां येत नाहीं, हें मी वर निर्देशिलेल्या पंडिताच्या बैठकींतच पाहिलें आहे. ज्यांच्याशीं संभाषण केल्यास आजच्या पिढींत नाणावलेल्या विद्वानांसहि ज्ञानाचा लाभ होईल त्याच्याकडे अर्भकचे तरूण येऊन श्रवणापूर्वींच खंडनास सुरवात करतात व ज्ञानलाभास मुकतात, तेव्हां मला त्यांची कींव येते!

पण विनय आणि लज्जा यांचा केवळ अभिनय करून चालणार नाहीं. विनय म्हणजे मनाचा ताजेपणा, कोंवळेपणा होय. तो अल्पवयस्कांत स्वभावतःच असतो. व्यक्तींचा आणि सृष्टीचा मोठेपणा पाहून आपल्या कोवळ्या वयांत आपण मुग्ध आणि स्तिमित होतों. पण थोडें फार सज्ञान होतांच आपलें मन खुंटल्यासारखें व निबर बनतें. पण वस्तुतः तें तसें होण्याचें कांहींच कारण नाहीं. आपण वयानें वाढलों अगर शरीरानें निबर झालों तरी महापुरुषांपुढें आणि महान् सत्यांपुढें आपण बालकच नसतों काय? ही बालवृत्ति टिकविणें हेंच ज्ञानार्जनाचेंहि रहस्य होय; व स्नेहार्जनाचेंहि रहस्य होय. आजकाल अज्ञानवयांतच मनानें निबर झालेले तरुण आणि स्त्रीजन्माला येऊनहि पुरुषी आव आणणाऱ्या तरुणी यांचा जमाना आला आहे कीं काय असें वाटतें. या मानसिक 'निबरपणामुळें' ज्ञानाचीहि हानि होते आणि सौंदर्याचीहि हानि होते!

लज्जेचा आणि सौंदर्याचा विषय निघाल्यावर स्त्रियांमधील संभाषण कौशल्यासंबंधीं लिहिणें अपरिहार्यच आहे. सर्वसाधारण नियम म्हणून सांगायचें झाल्यास स्त्रिया बोलण्यांत चतुर असतात—नव्हे, पटाईत असतात, हें कोणालाहि कबूल करावें लागेल. मी दोन वर्षांमागच्या दिवाळींत लिहिलेल्या, 'बायका' या लेखांत स्त्रियांचा हा गुण सांगितलाहि आहे. ज्या प्रख्यात पुरुषांच्या संभाषणपटुत्वाचा उल्लेख केला त्यांच्या वर्गांत स्त्रियांना घालतां येणार नाहीं. ज्यांना इंग्रज लेखक Conversationalist म्हणून म्हणतात त्यांच्या बोलण्यांत बहुश्रुतता, चातुर्य, बुद्धिवैभव वगैरे गुणांसच महत्त्व असतें. पण स्त्रियांचें 'वाक्पाटव' व्यावहारिक आणि मर्यादित क्षेत्रांत अधिक अनुभवास ये . जेव्हां निश्चित विषय नसल्यामुळें पृथ्वीच्या पाठीवरील कोणताहि विषय निघतो, अशा बैठकींत स्त्रिया पुरुषांपुढें टिकाव धरणार नाहींत. परंतु कौटुंबिक बैठकींत एखाद्या नियोजित समारंभाची चर्चा असूं द्या; नाहीं तर एखाद्या ऋणानुबंधी कुटुंबांतील नवराबायकोच्या तंट्यासंबंधींचा न्याय निवाडा असूं द्या; नाहीं तर एखाद्या बहकलेल्या मैत्रिणीचा इतिहास निघूं द्या—स्त्रिया अस्खलितपणें वक्तृत्व करतील. त्या बोलण्यांत ओघ आढळेल, आत्मविश्वास आढळेल, आवेश आढळेल, अस्सल मराठीचा नमुना आढळेल.

शहाण्या स्त्रिया आपल्या वाक्चातुर्याचें क्षेत्र ओळखतात. व त्याहून वेगळे विषय निघतांच मुग्ध आणि चकित अशा श्रोत्यांची भूमिका वठवून बलवान् प्रतिस्पर्ध्यालाहि अंकित करतात. तर उलट कित्येक सर्वच क्षेत्रांत सारख्याच आत्मविश्वासानें आणि आवेशानें बोलण्याच्या भरीला पडतात आणि फसतात!

पण, ज्याला बौद्धिक संवाद म्हणतां येईल अशा प्रकारचा संवाद आपल्या वडील विद्वान्

गणल्या जाणाऱ्या लोकांच्याहि बैठकींत मात्रापुरताच मिळतो. अर्थात् कोण मुद्दाम 'विद्वान्' म्हणूनच त्यांची भेट घेण्याकरतां गेलें तर बौद्धिक विषय निघतील; किंबहुना ते, ते विषय मुद्दाम काढतील. परंतु एक तर त्यांचें बोलणें पुस्तकांकडे तरी वळेल नाहीं तर ते मुद्दाम बौद्धिक वातावरण टिकवीत आहेत असें तरी वाटेल. व म्हणूनच पटवर्धन, तांबे यांच्या बोलण्याची महति मला विशेष वाटते. त्यांच्या संभाषणासारख्या संभाषणाचा लाभ मिळण्यास मनुष्य केवळ बुद्धिमान् असून चालत नाहीं, तर बौद्धिक व्यापारास त्याच्या जीवनांत पहिलें स्थान असावें लागतें. इतर बुद्धिमन्ताच्या बोलण्याची गत काय होते हें मी सांगितलेंच आहे.

बौद्धिक विचार विनिमयहि नसेल आणि कांहीं व्यावहारिक वाटाघाटहि नसेल तर बैठक रंगविण्यास हमखास हजर होणारे विषय म्हणजे लोकापवाद आणि विनोद. विनोद सर्वांसच साधतो असें नाहीं. आणि तरी ज्यांना विनोद साधत नाहीं ते विनोदाचा नाद सोडतात असेंहि नाहीं. त्यामुळें तर संभाषणांत विनोदाचें स्थान फार महत्त्वाचें ठरतें. वस्तुतः ही गोष्ट जितकी दुःसाध्य आहे तितकीच सुसाध्यहि आहे. सर्वांनींच बुद्धिप्रधानं आणि पुस्तकी विनोदाची हाव कां धरावी? आनंदाच्या आणि गंमतीच्या लहरींत असल्यास साधीं माणसेंहि सुंदर विनोद करून जातात; तर उलट मनांत आनंद नसतां ओढून आणि उकरून विनोद करणाऱ्या बुद्धिमन्ताचीहि कींव येते!

विनोद करण्याची सर्वांत निकृष्ट पद्धति तुम्हांस माहीत आहे काय? नसल्यास ऐका. दैनिक आणि साप्ताहिक टाइम्स मधील वाचलेला विनोद फिरून एकदां जबरदस्तीनें भरबैठकींत श्रोत्यांना ऐकविणें!

संभाषणांत हमखास येणारा राहतां राहिला विषय म्हणजे लोकापवाद—ऊर्फ स्कँडल्स्! लोकांच्या भानगडींसंबंधीं कधींहि बोलूं नये हा नियम सांगण्याइतका मी भोंदूहि नाहीं, कीं तो पाळण्याइतका मी साधूहि नाहीं. मनुष्यस्वभाव हा सर्वत्र व सर्वकाळ सारखाच असणार! रहस्याविषयीं कुतूहल हा आपणां सर्वांचा स्वभावच असतो. आणि तरीहि त्या कुतूहलांतहि सरस—निरस नसतेंच असें नाही. लोकापवादासंबंधीं मनुष्य ज्या वृत्तीनें बोलतो त्यावरून त्याचा स्वभाव ओळखतां येतो. कित्येक माणसें लोकांच्या गौरवासंबंधीं अत्यंत चिकित्सेखोर आणि शंकित अशीं असतात; तर उलट लोकापवाद म्हटला कीं त्यांचीच आस्तिक्य बुद्धि आणि श्रद्धा जागृत होते! तसेंच दर बैठकींत एक तरी पहिल्या प्रतीचा लोकापवाद सांगतां आला नाहीं तर दिवस वाया गेला असें ते समजतात. ही विकृत वृत्ति सोडल्यास लोकापवादास संभाषणांत स्थान आहे व राहणारहि हें कबूल केलें पाहिजे. मीं असें एकदोन पट्टीचे बोलणारे पाहिले आहेत—ते प्रख्यात साहित्यिक आहेत—कीं, जे ओळीनें दोनदोन तीनतीन तास प्रख्यात व्यक्तींची कुलंगडी, विश्वास बसलाच पाहिजे इतक्या 'दस्तऐवजी' पुराव्यानिशी पुरवूं शकतात.

ऐकण्याच्या कलेचें माहात्म्य मी वर वर्णन केलेलें आहे; पण "न ऐकण्याची" म्हणूनहि एक कला आहे असें मला वाटतें. व तिचा उपयोग मी अशा प्रसंगीं करतों.

संभाषणपटु म्हणून अशा मंडळींची ख्याति झालेलीहि मी पाहिली आहे. उत्कट आणि बौद्धिक संभाषण आपल्याकडे दुर्मिळ; आणि अशा संभाषणाचे भोक्ते तर त्यांहूनहि दुर्मिळ—आणि म्हणूनच माधवराव तांबे यांच्या संभाषणकलेची आठवण मला विशेषच होते!

---

शिवरामपंत अनेक दृष्टींनी भाग्यवंतांत गणले जात. वडिलांनी घरची दारिद्री घालवून श्रीमंती आणली आणि तें वैभव शिवरामपंतांनी 'बाळ'पणीं भोगलें. वनश्रीनें नटलेल्या, खाडीकाठीं वसलेल्या आणि पर्वतांनी वेष्टिलेल्या महाड–रायगडच्या शिवाजी-महाराजांच्या स्वराज्याच्या पवित्रभूमींत ते यथेच्छ रमले. शाळेला बुद्दी देण्याची मौज भोगून पुढें जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ति मिळवून त्यांनी कीर्ति मिळविली. 'महाराष्ट्र' कॉलेजांत 'प्रोफेसर' म्हणून ते नंतर चमकले; आणि पुढील आयुष्यांत वाणी आणि लेखणी यांचे अद्वितीय प्रभु म्हणवून कीर्तिशिखरावर आरूढ झाले आणि खरोखरीचेच 'काळ' कर्ते अतएव युगप्रवर्तक ठरले. तेव्हां अशा पुरुषाच्या भाग्याची सीमा काय वर्णावी ?

पण या भाग्यांतहि आज जी भर पडली आहे ती तर विशेषच कौतुकावह आहे. आमच्या इकडे आधींच थोर पुरुषांची चरित्रें व्हावयास पाहिजेत त्याप्रमाणें विस्तृत आणि त्वरित अशीं लिहून प्रसिद्ध होत नाहीत. थोरांच्या सहवासांत आलेली मंडळीहि आपलें कर्तव्य पार पाडतांना आढळत नाहीत. नामदार गोखल्यांचेच पाहा ना ? अद्यापिहि साधार आणि विस्तृत असें चरित्र प्रसिद्ध झालेलें नाहीं. त्रोटक चरित्रांवरच भागवावें लागत आहे. घराण्यांतील वारसदार मंडळी हि उदासीनच असलेली आढळून येतात अशा परिस्थितींत शिवरामपंतांच्या वाट्याला त्यांचेच नातू वामनराव हे चरित्रकार म्हणून यावें ही कौतुकाची गोष्ट होय. आणि भाग्यवंत शिवरामपंतांच्या भाग्यशालित्वाचीहि ती एका प्रकारें द्योतक समजतां येईल.

शिवरामपंतांना जाऊन आतां सोळा वर्षें पुरीं झालीं. आज त्यांचें चरित्र त्यांच्याच नातवानें लिहिलेलें वाचण्याचा सुयोग येत आहे ही खरोखरच मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. चि. वामनराव कृष्ण परांजपे यांना अक्षरशः शिवरामपंतांच्या मांडीवर लोळण्याचें भाग्य लाभलें होतें हें जरी खरें तरी शिवरामपंतांच्या कीर्तिवैभवाचा 'काळ' समंजसपणानें पाहण्याचें भाग्य त्यांना लाभलें नाहीं. जो त्यांनीं पाहिला तो 'काळ' कांहींहि आणि कसेंहि म्हटलें तरी 'काळ'कर्ते शिवरामपंतांचा खचित नव्हे ! 'काळ'कर्ते शिवरामपंत हा धगधगणारा अग्निदेव होता तर 'स्वराज्य'कर्ते शिवरामपंत म्हणजे त्या अग्नीचें पवित्र असलें तरी भस्मच होतें ! 'काळ'कर्ते शिवरामपंत एकच होते आणि एकदाच होऊन गेले ! त्यांची आवृत्ति प्रत्यक्ष शिवरामपंतांनाहि काढणें शक्य नव्हतें ! आधींच शिवरामपंतांचे मुखमंडल सतेज आणि तें 'काळा'च्या अपूर्व आणि दिव्य शब्दप्रभेनें जसें एकेकाळीं लखलखलें तो लखलखाट आणि तो चमचमाट म्हणजे प्रत्यक्ष स्वातंत्र्यदेवीचा साक्षात्कारच होता ! 'काळ' हा एक चमत्कार होता आणि चमत्कार कांहीं वारंवार होत नसतात ! लेखणीला वाणीची अजोड साथ त्यावेळीं मिळाली होती आणि स्वातंत्र्याच्या अमर संगीताचे शिवरामपंतांनी काढलेले जे दिव्य सूर त्यावेळीं ऐकूं आले ते अद्यापिहि आमच्या कानांत घुमत राहिले आहेत !

शिवरामपंतांनी जी स्वातंत्र्याची तेजस्वी ज्योति महाराष्ट्रांत प्रदीप्त केली ती आपल्या त्या 'काळ' मधील अनुपमेय लेखांच्या द्वारेंच होय. 'काळां'तील लेखांत त्यांनी आपल्या हृदयांतील सर्व महनीय प्रेरणा ओतल्या होत्या. त्यांच्या अंतःकरणाचे कल्लोळ 'काळ' मधील लेखांतच उसळत होते.

खरें सांगावयाचें तर 'काळां'तील शिवरामपंतांच्या स्वातंत्र्य-प्रवर्तक लेखांच्या तोडीचें वाङ्मय पृथ्वीतलावरील अन्य भाषांतहि कोठें सांपडेल कीं काय याची आम्हांस तरी वानवाच वाटते. आमचा देश परतंत्र, शिक्षणाचा प्रसार तेथें किती थोडा, सर्वसमर्थ इंग्रज सरकारची करडी नजर भोंवताली जागती, अशा प्रतिकूल परिस्थितींत शुद्ध स्वातंत्र्याची प्रेरणा उघड उघड वर्तमानपत्राचे द्वारां यशस्वी रीतीनें करणें आणि ती अशी कीं सरकारच्या कायद्याच्या कचाटींत न सांपडता करणें हें केवढें कठिण आणि नि असाध्यकर्म होतें. परंतु शिवरामपंतांनी तें साध्य केलें ! आपल्या देशबांधवांच्या मनांत ते ठाम जाऊन बसले, त्यांच्या मनांतील शुद्ध स्वातंत्र्यप्रवृत्ति त्यांनी एका दंऊन जागृत केल्या. हळुवार चिमटे काढकाढून लोंचे तनलेलीं मनें त्यांनी प्रदीप्त केलीं. भ्रमर ज्याप्रमाणे कठिण

अनुक्रमणिका

असें काष्ठ आपल्या तीक्ष्ण पायांनी कुरतडतो व त्याला भोक पाडतो तेंच अद्भुत कौशल्य शिवरामपंतांच्या लेखणीनें प्रगट केलें. या कामीं उपहासाचा त्यांनी विलक्षण लालित्यानें उपयोग केला! जें जें परकीयांचें त्याचा त्यांनी सूक्ष्म पण वर दिसावयाला सोज्वळ अशा शब्दांनी उच्छेद केला. आणि त्या प्रवृत्तींच्या जागीं शुद्ध स्वातंत्र्याची पवित्र आणि स्फूर्तिदायक बीजें हलुवारपणें पेरलीं. ही त्यांची कामगिरी केवळ अद्वितीय होय. त्याला इतिहासांत तोड मिळणार नाहीं.

व्हाल्टेअर, रूसो इत्यादि स्वातंत्र्यतत्त्वज्ञांचे ग्रंथ त्यांनी आत्मसात् केले होते आणि ग्रीस, आयर्लंड, रोम, नेदर्लंड, अमेरिका, फ्रान्स् इत्यादि देशांचे नवेजुने इतिहास त्यांनी काळजीपूर्वक अभ्यासले होते. युरोपीय ग्रंथकारांप्रमाणेंच इकडील संस्कृत ग्रंथांचें, वेदांचें, उपनिषदांचें, पुराणांचें, षड्दर्शनाचें, आणि काव्यनाटकांचें त्यांनीं मार्मिकपणें अध्ययन केलें होतें. त्यामुळें आर्यसंस्कृतीचें त्यांस सूक्ष्म ज्ञान होतें आणि भरीला पाश्चात्यांच्या प्रेरक वाङ्मयाचा लाभ त्यांनीं घेतला होता. यामुळें त्यांच्या लेखांत दोहींतील सारभूत भाव त्यांनी आपल्या दृष्टीनें आत्मसात् करून आपल्या अभिनव लेखनतंत्राचे साह्यानें लोकांचे समोर ठेवला. त्यांचे ते लेख अनेकांनी मुखोद्गत केले. सरकारनें ते पुढें जप्त केले, प्रत्यक्ष काँग्रेसच्या लोकशाही सरकारनें त्यांवरील जप्ती पूर्णपणें खुली केली नाहीं, शिवरामपंतांना प्राणांपलीकडे दुःख झालें, महाराष्ट्र हळहळला, पण त्यांचे लेख अजरामर झालेले आहेत आणि जेव्हां ते पुनः लोकांसमोर येतील त्यावेळीं त्यांचे अमोघत्व लोकांच्या प्रत्ययास आल्याशिवाय राहणार नाहीं.

स्वातंत्र्याचे द्रष्टे हीच शिवरामपंतांची खरी ओळख आणि भव्य कामगिरी. त्यांच्या अंगीं इतर गुणहि कांही कमी नव्हते. परंतु ते सर्व या त्यांच्या थोर पदवीमुळें अगदीं फिके पडतात. शिवरामपंत उत्कृष्ट शिक्षक होते, नामांकित विद्वान् होते, मार्मिक टीकाकार होते, प्रभावी कादंबरीकार होते, सहृदय नाटककार होते आणि एक सरदारी सद्गृहस्थ होते. या सर्व दृष्टींनी त्यांनी चांगला लौकिक संपादन केला होता. त्यांनी अनेक लहान मोठे ग्रंथ लिहिले. तर्कशास्त्र, मीमांसा, इत्यादि शास्त्रांवरील त्यांचे ग्रंथ, मराठ्यांच्या लढायांचा त्यांनी लिहिलेला रसाळ इतिहास–शेक्सपिअरच्या नाटकांची त्यांनी केलेलीं रूपांतरें किंवा विन्ध्याचल आणि गोविंदाची गोष्ट यासारख्या त्यांच्या कादंबऱ्या हें सर्व वाचणारास त्यांच्या विद्वत्तेची, सहृदयतेची, मार्मिकतेची, आणि प्रतिभेची साक्ष पटण्यास वेळ लागत नाहीं. 'काळ' बंद केल्यावरहि त्यांची मूळची स्वातंत्र्याभिलाषा गुप्तशी झाल्यासारखी दिसली तरी लुप्त कधींच झाली नव्हती. 'स्वर आणि व्यंजनें' या सारखे त्यांचे कित्येक पुढले लेख मूळच्या शिवरामपंतांची प्रतिभा जिवंत असल्याची उत्तम साक्ष देतात.

'काव्यशास्त्रविनोद' हा त्यांचा एक आवडता व्यवसाय होता म्हणूनच ते 'मयूरमंडळांत' नियमानें हजर राहून मोरोपंती काव्याची मार्मिकचर्चा मोठ्या आवडीनें करीत. व्युत्पत्तीकडे त्यांचे लक्ष्य अधूनमधून जाई. कोंकणांतील शिर्के देशमुखांचे व बिरवाडच्या अंबेकर इनामदारांची सदनपत्रेंहि त्यांनी भा. इ. सं. मंडळासमोर आणलीं होतीं. अशा प्रकारचा व्यासंग त्यांचा नेहमी चालू असे आणि तसले लेखनग्रंथही ते मधून मधून लिहीत. परंतु ज्यांच्या कामगिरीच्या मानानें हें सर्व दुय्यम समजावें लागतें.

शुद्ध स्वातंत्र्यवादी शिवरामपंत आणि त्यांचा 'काळ' एकेकाळीं इतका लोकप्रिय झाला कीं टिळकांना आणि त्यांच्या 'केसरी'लाही तो मागें टाकतो कीं काय अशी शंका वाटूं लागली होती. सावरकरांसारखे पंतांचे परमभक्त टिळकांना जहाल तर पंतांना 'ज्वलज्जहाल असा श्लेषहि प्रकट करूं लागले होते. पण शिवरामपंतांची खरी कामगिरी त्यांच्या लेखणीनें आणि वाणीनेंच त्यांनी केली. एखादी संघटना करावी, संस्था काढावी, असले उद्योग त्यांच्या प्रकृतीस कधीच मानवत नसत. वाणीलेखणीचें प्रोत्साहन एवढीच त्यांची सीमा होती. ते उपहासाचा अवलंब करीत म्हणून त्यांच्या त्या उपहासानें उकडून निघालेले आक्षेपकहि त्यांच्या चहात्यांस आणि भक्तांस अडविण्याचा प्रयत्न करीत. इतिहासांत प्रसिद्धीस आलेल्या ज्या अनेक स्वातंत्र्यवीरांचें सकौतुक वर्णन पंत करीत तशी उडी ते कां घेत नाहीत असें या आक्षेपांचे सार असे. वादाच्या दृष्टीनें या आक्षेपांत कांही तथ्य आहे हें कबूल केलें पाहिजे. पण ज्याची जी प्रकृति नाही तशी कृति अपेक्षिणेंच चुकीचें आहे. पंतांनीहि कधीं स्वातंत्र्यसंस्थापकाचा अहंकार मिरविला नव्हता. त्यांनी देशभक्तीचीं पिसें लावून हिंडणाऱ्यांची ती खोटीं पिसें आपल्या तीक्ष्ण शब्दचंचुनें उपटून काढली होती हें खरें. पण असल्या ग्रामसिंहांचीं आयाळें कोणी तरी उपटून काढावयास पाहिजेच होतीं. तें काम पंतांनी असें बेमालूमपणें केलें आणि आपल्या विदारक परंतु शिष्ट उपहासानें त्यांची खोटी प्रतिष्ठा साफ धुळीस मिळविली. वास्तविक आवश्यक अशा या विध्वंसनात्मक कार्याबद्दल शिवरामपंतांचा इतिहास गौरवच करील. तात्कालिक आक्षेप आणि त्याला दिलेलें तसलीं प्रत्युत्तरें हवेंत विरून जातील आणि शिवरामपंतांचा किर्तिध्वज उंच आणि लखलखीतपणें महाराष्ट्रमंडळांत सदा तळपत राहील.

आम्हांस आशा वाटते कीं पंतांचे वाङ्मय यापुढें फार काळ जप्तींत राहणार नाहीं; तें सटीप होऊन, मर्मज्ञपणें त्यांतील भाव उकलून दाखवून तें पुन्हां लोकांपुढें आलें म्हणजे पंतांची उज्वल कीर्ति अधिकच उज्वल होईल–इतकेंच नव्हे तर मराठी भाषेंतील कित्येक अजरामर पदवीचे लेख पुनः जगासमोर येईल.

अनुक्रमणिका











# तेजस्वी. तपस्वी. यशस्वी.

पु. रा. लेले

यंदां कृष्णाजी प्रभाकर खाडिलकरांना ७३ वर्षें पुरीं होतील. त्यांचें त्रिदंडी संन्यास १९३६ सालीं रंगभूमीवर आलें त्याला नऊ वर्षें झालीं. यंदांच्या नाट्य–महोत्सवांत त्यांच्या दोन नाटकांचे प्रयोग होणार आहेत असें समजतें. गेल्या वर्षी झालेल्या महोत्सवांत त्यांचीं दोन नाटकें करून दाखवण्यांत आलीं होतीं. हल्लीं ते रुद्र, पुरुषसूक्त, उपनिषदें वगैरे ग्रंथ लिहिण्यांत गुंतलेले आहेत. त्यांचें एक नाटक जाहीर झालेलें आहे पण लिहून झालेलें नाहीं असें मला वाटतें.

काका खाडीलकर व्यक्ति म्हणून फार थोडे ओळखले जातात. यांचा स्वभाव कांहींसा एकलकोंडा, स्वतःशीं विचार करीत बसण्याचा असा आहे. त्यांच्याबद्दल गैरसमज पसरलेले आहेत पण त्यांचें निराकरण करण्याच्या भानगडींत ते कधींहि पडलेले नाहींत. आणि विशेष सांगावयाची गोष्ट म्हणजे त्यांचे शत्रू त्यांच्याबद्दल गैरसमज पसरवतात तसे त्यांचे मित्रहि त्यांचा प्रसार करतात. त्यांच्याशीं थोडासा संबंध ज्यांचा येतो ते असले गैरसमजच घेऊन जातात आणि उराशी बाळगतात. विशेष परिचय झाल्यानंतर मात्र काकांच्या मोठेपणाचा प्रत्यय येऊं लागतो. करमरकर शिल्पकारांनीं वरेरकरांचा पुतळा बनवला आहे त्यांत त्यांच्यावर फणसासारखें खडबडीत कवच घातले आहे. करमरकरांना जर माणसाची पारख असती तर हें कवच त्यांनीं काका खाडीलकर यांनाच दिलें असतें, वरेकरांना कधींहि दिलें नसतें. आमच्या कोंकणातल्या बरक्या ( रसाळ ) फणसाची उपमा जर एकाच पुरुषाला द्यावयाची असेल तर ती कृष्णाजी प्रभाकर खाडीलकर यांना होय. माझी त्यांची ओळख सन १९१० सालच्या जुलै मध्यें झाली. त्यावेळेपासून सहावर्षेंपर्यंत माझा त्यांचा अतिशय निकटचा संबंध होता. त्यांच्याशीं भरपूर परिचय करून घेण्याची मला सुदैवानें संधि मिळाली होती म्हणूनच मी हा व्यक्तिपरिचय माझ्या वाचकांना करून देत आहें.

व्यक्ति या नात्यानें काकासाहेब खाडीलकरांचा प्रमुख गुण सांगावयाचा तर 'निष्ठा' हा होय आणि त्याच्या खालोखाल नांव घेण्याजोगा गुण म्हणजे 'नम्रता' आणि त्याच्या खालोखाल सांगावयाचा गुण म्हणजे 'प्रेमळपणा.' या शेवटल्या गुणाचा अनुभव मात्र फार थोड्या व्यक्तींना येऊं शकतो. पहिल्या गुणाचा उपयोग ज्यांना झाला आहे त्यांनीं तो गुण कबूल करण्याचा मोठेपणा मुळींच दाखवलेला नाहीं हें सांगणें भाग आहे. व्यक्ति म्हणून खाडीलकरांबद्दल सध्यां एवढेंच लिहिणें बरें.

नाटककार या भूमिकेंत खाडीलकरांबद्दल लिहावें तितकें थोडें आहे. मराठी नाट्यसृष्टींत त्यांचें स्थान अढळच नव्हे तर अद्वितीय आहे. मी आज ग्वाही देतों कीं आणखी वीस वर्षांनीं खाडीलकरांचें महत्त्व ज्यास्तच स्पष्ट होईल. माझे एक स्नेही अलीकडेच खाडीलकरांच्या नाटकांना मराठीं नाटकांतली ज्ञानेश्वरी म्हणाले. या माझ्या स्नेह्याची रंगभूमीच्या उद्धारासंबंधींची योजना मला मान्य नाहीं पण खाडीलकरांच्या नाटकांबद्दल त्यांनीं जें मत दिलें तें मला पूर्णपणें मान्य आहे. खाडीलकर नाटककार झाले त्याला आतां पन्नासवर्षें झालीं. ग्रॅजुएट झाल्यावर त्यांनीं सांगली शहरीं मास्तरकी केली. त्याचवेळीं 'सवाई माधवरावांचा मृत्यु' हें नाटक लिहिलें. हल्लीं जें पुस्तकरूपानें प्रसिद्ध आहे तें नव्हे: त्याकाळीं लिहिलेलें नाटक विविधज्ञान विस्तारांत खंडशः प्रसिद्ध झालें होतें. त्याच्यावर अत्यंत प्रखर टिका झाल्या होत्या आणि त्या टिकांचा परिणाम म्हणून खाडीलकरांनीं तें नाटक जवळजवळ पुनः लिहिलें. पुनः जें लिहिलें त्याचाच प्रयोग झाला आणि तेंच पुस्तकरूपानें आज जनतेपुढें आहे. पण जें प्रथम लिहिलें तें पन्नास वर्षांपूर्वी लिहिलें.

कांचनगडची मोहना हें नाटक खाडीलकरांचें दुसरें अपत्य होय. रंगभूमीवर आलेलें त्यांचें पहिलें नाटक हेंच. कसा विचित्र योगायोग पहा! प्रथम लिहिलेलें नाटक रंगभूमीवर आलेंच

अनुक्रमणिका

**• • करमरकर शिल्पकारांनीं वरेरकरांचा पुतळा बनवला आहे त्यांत त्यांच्यावर फणसासारखें खडबडीत कवच घातले आहे. करमरकरांना जर माणसाची पारख असती तर हें कवच त्यांनीं काका खाडीलकर यांनाच दिलें असतें, वरेरकरांना कधींहि दिलें नसतें !**

नाहीं. जें पहिल्यांदा रंगभूमीवर आलें त्या नाटकानें अग्रेसर नटाकरवीं रंगभूमीवर आणलें जाऊनसुद्धां कर्त्याला यश दिलें नाहीं. तेंच नाटक दुसऱ्या कंपनीनें करून स्वतां नांव मिळवलें आणि खाडीलकरांनाहि यश मिळवून दिलें. या लेखाच्या मथळ्यांत जीं तीन विशेषणें मीं दिलीं आहेत त्यांपैकीं पहिलीं दोन विशेषणें 'कांचनगडची मोहना' या नाटकाला ज्या प्रमाणांत लागू आहेत त्या प्रमाणांत तीं खाडीलकरांच्या दुसऱ्या कोणच्याहि नाटकाला लागू नाहींत, इतकेंच नव्हे तर मराठी नाट्यसृष्टींतील दुसऱ्या कोणच्याहि नाटकाला लागू नाहींत.

यशस्वी या विशेषणालाहि तें नाटक पात्र आहे. तसें तें जर नसतें तर महाराष्ट्र नाटक मंडळीनें तें रंगभूमीवर आणलें नसतें. गणपतराव जोशासारख्या अप्रतिम नटानें टाकलेलें नाटक उगीच कसा कोणी हातीं धरील ? त्यांत यशाचे अंकुर होते म्हणूनच तें रंगभूमीवर आलें आणि मर्यादित प्रमाणांत त्यानें यश मिळवलें. म्हणूनच खाडीलकरांना आणखी नाटकें लिहिण्याचा आग्रह महाराष्ट्र नाटक मंडळीनें केला. खाडीलकरांचे गुण ओळखण्यांत नाटक मंडळींतील लोकांच्या जोडीला प्रो. भानु आणि प्रो. भाटे यांच्या सारखे लोकसुद्धां होते हें खास नमूद करण्याजोगें आहे. खाडीलकर टिळकसंप्रदायी आणि प्रो. भानू व प्रो. भाटे हे गोखल्यांचे अनुयायी असे असून सुद्धां त्यांना खाडीलकरांची प्रतिभा दिसली यावरून तिचें तेज आणि यशोगर्भित्व सहज स्पष्ट होतात.

खाडीलकरांनीं रंगभूमीवर जें यश मिळवलें तें 'कीचकवध' नाटकानें. 'कीचकवध' नाटक लिहून खाडीलकरांनीं मराठी रंगभूमि जिंकली. एका गद्य नाटकानें त्यांनीं संगीत नाटकें जिंकलीं. त्यावेळचें 'कीचकवध' नाटक आज जसेंच्या तसें वाचावयास मिळत नाहीं, हें दुर्दैव आहे. खाडीलकरांनीं वीस वर्षांनंतर त्यांत सुधारणा (?) केली आणि पुस्तकाची आवृत्ति काढली. या ठिकाणीं मला खाडीलकरांच्या या कृत्याबद्दल नापसंती नमूद करूं द्या. नाटक रंगभूमीवर आल्यानंतर दोन तीन वर्षेंपर्यंत त्यांत फरक करण्याचा अधिकार नाटककर्त्याला आहे, त्यानंतर त्याचा अधिकार संपुष्टांत येतो असें माझें निश्चित मत आहे. तें नाटक जनतेच्या मालकीचें होतें (मी Copyright म्हणजे द्रव्य प्राप्तीच्या दृष्टीनें बोलत नाहीं.) जनतेनें ज्या स्वरूपांत त्याची ओळख करून घेतली, ज्या स्वरूपांत त्याचा स्वीकार केला त्याच स्वरूपांत तें राहिलें पाहिजे. सन १९०६ सालीं खाडीलकरांनीं तें लिहिलें. एकवीस वर्षानंतरच्या खाडील-करांना त्यांत ढवळाढवळ करण्याचा अधिकार नव्हता. चौतीस वर्षें वयाच्या पुरुषाची कलाकृति बदलण्याचा अधिकार पंचावन्न वर्षांच्या माणसाला कसा देतां येईल ? आम्ही जें कीचकवध वाचलें व पाहिलें तें आज कोणाला वाचावयास मिळत नाहीं— मग पहावयाची गोष्टच कशाला ?



सन १९०६ ते सन १९११ हीं पांच वर्षें खाडीलकरांच्या अनिरुद्ध प्रभावाचीं होतीं. मराठी रंगभूमीच्या इतिहासांत हीं पांच वर्षें म्हणजे 'तेज, तप आणि यश' या त्रयीच्या समुच्चयाच्या दृष्टीनें अद्वितीय आहेत आणि हा काल खाडीलकरांचा होय. सन १८८० ते १८८५ हा काल यशाच्या दृष्टीनें फार महत्त्वाचा ठरेल. नंतरच्या कालांतहि यशाच्या दृष्टीनें महत्त्वाचे कालखंड सांपडतील. स्वयंवरापासून एकच प्यालापर्यंतचा कालखंड 'तेज आणि यश' या जोडीच्या दृष्टीनें महत्त्वाचा आहे. पण 'तेज, तप आणि यश' या त्रयीचा जो उत्कर्ष १९०६ ते १९११ या मुदतींत दिसला तसा तो दुसऱ्या कोणाच्याहि [illegible] दिसला नाहीं.

सन १८८० ते १८८५ या पांच वर्षांत आणि त्यानंतर [illegible] वीस वर्षांच्या कालांत संगीताच्या सहाय्यानें नाटकांनीं यश

मिळवलें. गणपतराव जोशी या अद्वितीय नटानें संगीतादि... हि नाटकें यशस्वी केली. पण संगीत नाटकांना... कालें... कांनीं दुसरा दर्जा स्वीकारावयास भाग पाडलें ते १९०८ ते ...११ या मुदतींत आणि हा गद्य नाटकांचा विजय केवळ खाडील-करांनीं साध्य केला. नटाचें कौशल्य गद्य नाटकांत जितकें लागतें तितकें तें संगीतमय नाटकांत लागत नाहीं. आणि संगीताची जोड असल्याशिवाय प्रेक्षकांचें अंतःकरण आकर्षून ठेवण्याला नाटकांत मगदूर अधिक लागतोच, शिवाय नटाचीहि शक्ति पुष्कळ अधिक प्रमाणांत असावी लागते. खाडीलकरांचीं गद्य नाटकें आणि महाराष्ट्र नाटक मंडळींतील नटसंच यांची युति हा एक असामान्य योग होता. या योगामुळेंच गद्य नाटकांनीं या पांच वर्षांत संगीत नाटकांना दडपून टाकलें होतें.

खाडीलकरांनीं या पांच वर्षांत मराठी नाट्यसृष्टींत क्रांति घडवून आणली व ती 'मन्वंतर' शब्द न वापरतां घडवून आणली. योगायोग असा कीं त्यांचीं नेमकीं पांच गद्य नाटकें या कालांत रंगभूमीवर आलीं. कांचनगडची मोहना, सवाईमाधवरावांचा मृत्यु, कीचकवध, बायकांचें बंड, भाऊबंदकी—या क्रमानें तीं नाटकें रंगभूमीवर आलीं. नाटक हें करमणुकीचें साधन होतें, खाडीलकरांनीं तें लोकजागृतीचें साधन केलें. नट हे कुतूहलाचे पण अनादराचे विषय होते. खाडीलकरांनीं नटांना आदरास पात्र केलें. या पांच वर्षांत नटांचा दर्जा भलत्याच प्रमाणांत सुधारला. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांसारख्या संगीतमय वृत्तीच्या माणसाला एक तरी गद्य नाटक लिहावयास खाडील-करांच्या यशानें भाग पाडलें. टिळकांचे पट्टशिष्य ही पदवी खाडीलकरांना या कालांत मिळाली होती ती त्यांच्या गद्य नाटकांनींच मिळवून दिली असें म्हणावयास मुळींच हरकत नाहीं. नाटक कंपन्यांना संस्थांचा दर्जा प्राप्त झाला त्याला कारण या पांच वर्षांतील खाडीलकरांची तपस्वी नाट्यसेवा होय.

कीचकवध हें नाटक लोकप्रियतेच्या दृष्टीनें विक्रम करून राहिलें. या नाटकांत विषयाचें नाविन्य तर होतेंच पण नाट्यगुण असामान्य प्रमाणांत होते. शिवरामपंत परांजपे आपल्या भाषणांत ज्याप्रमाणें पौराणिक कथा रंगवीत त्याप्रमाणें नाटकांत खाडीलकर रंगवीत असत. लढाईच्या कालाला शोभणारें तें नाटक होतें. नाटकांवर टिळकांचा राग असावयाचा पण कीचकवध नाटक पाहिल्यावर त्यांचा तो राग ओसरला आणि खाडीलकरांवरचाहि राग कमी झाला. नटवर्गहि असामान्य मिळाला होता असें म्हणावयास हरकत नाहीं. नटसंच पाहून खाडीलकरांनीं हें नाटक लिहिलें होतें. नटरूपी भांडवलाचा अधिकांत अधिक उपयोग करणारा नाटककार म्हणजे खाडीलकर. गणपतराव भागवत हे महाराष्ट्र मंडळींतील प्रमुख नट होते, खलनायकाच्या भूमिका करण्यांत त्यांचा हातखंडा होता. पण

( पुढील मजकूर पान १८२ वर पहा )




छायाचित्र : भा. रा. बापट,
G. D. (Art), A. M.

गो–रज




छायाचित्र : डब्ल्यू. एन्. भट,
A. R. P. S.




# क्रमांक ५......सचित्र पुस्तकें

पी. ओ. बॉक्स १३८
मुंबई.
कृपा करून तुमच्या ५० सचित्र इंग्रजी पुस्तकांची संपूर्ण यादी पाठवा.
नांव ..............................
धंदा ..............................
पत्ता ..............................
मेहेरबानी करून ठळक अक्षरांत लिहा.

तुमच्या बांधकामाच्या योजनेंत अत्यंत उपयुक्त ठरणाऱ्या आमच्या ५० सचित्र पुस्तकांपैकीं पांच येथें दिलीं आहेत.

संपूर्ण यादीसाठीं सोबतच्या कुपनचा उपयोग करा.




{दि कॉंक्रीट असोसिएशन ऑफ् इंडिया.} दि सीमेंट मार्केटिंग कं. ऑफ इन्डिया लि. चा
शास्त्रीय विभाग

CM 83

लेखकः—होरारत्न ज्यो० वसंत लाडोबा म्हापणकर.




•• देणगीचें राहिलें बाजूलाच पण प्रसंगी म्हैराते ... पडतका आवेश त्याच्यांत मला दि...ला. आतां त्या दिवशींच्या माझ्या कुंडलींत मला मार मिळण्याजोगें ग्रहमान नव्हतें म्हणून पुटलों म्हणा; पण, केव्हां केव्हां ज्योतिषावर असले प्रसंग येणें अशक्य नाहीं.

'**भविष्यवादी**' म्हणतांच माणसाच्या मनांत जी एक प्रकारची कुतुहलपूर्ण तीव्र जिज्ञासा झेप घेते ती कुणालाहि नाकबूल करतां येण्यासारखी नाहीं. भविष्यकालासंबंधीं बरीं-वाईट अनुमानें, अंदाज सांगणारा तो '**भविष्यवादी**' असा भविष्यवादी या शब्दाचा सरळ अर्थ आहे. मग तीं अनुमानें ग्रहगणितानुसार कुंडली मांडून वर्तवो, हात पाहून सांगो अगर चेहरा पाहून प्रगट करो किंवा अन्य कोणत्याहि शास्त्राच्या अभ्यासाचा आश्रय घेऊन मांडो, भविष्यांतच सामील व्हावयाचीं !–

'**भविष्य**' हा शब्दच मुळीं माणसाच्या मनाला सहजीं मोहिनी घालणारा आहे. भूतकाल हा मृत काळ, तो आपल्या पायांपाशीं मरून पडलेला, अर्थात् मेलेल्याला मारण्यांत अगर काबीज करण्यांत पुरुषार्थ कसला ? भविष्यकाळ हें श्वापद मात्र भयंकर असून तें अंधाऱ्या दरींत बसून राहिलेलें असते. त्याला जर आपल्याला हुसकून काढून जिंकतां आलें तर तो मात्र पुरुषार्थ खरा, असें प्रत्येक मनुष्याला वाटतें. भविष्यवाद्याकडे जाण्याच्या इच्छेच्या मुळाशीं पराक्रमाची आकांक्षा हेंहि एक कारण असूं शकतें. मनुष्य ज्ञानाच्या बाबतींत नेहमी अतृप्त असतो. 'भविष्यकथन' या शब्दानें कांहीं अद्भुत भावना मनुष्याच्या अंतर्मनांत निर्माण होतात. 'पुढें काय ?' हा प्रश्न बहुधा प्रत्येक मनुष्याच्या पुढ्यांत उभा असतोच असतो. उन्हांत चालणाऱ्या मनुष्यास ज्याप्रमाणें आपल्या सावलीचें टोंक केव्हांहि गांठतां येत नाहीं, त्याप्रमाणें 'पुढें काय ?' या शब्दाच्या समाप्तीलाही तो केव्हांच गांठूं शकत नाहीं. मनुष्याला केवळ वर्तमानकाळापुरतीच नजर पुरवून चालत नाहीं. भविष्यकालावरहि थोडी तरी नजर पुरवावी लागतेच. उचललें तें पाऊल भूतकाळांतून व टाकावयाचें तें पाऊल भविष्यकालांत; आणि दरम्यानची जी संधी ती मात्र वर्तमान काळ अशी स्थिति असल्यामुळें मनुष्यानें भविष्याची थोडी बहुत उठाठेव केली तर ती अगदींच वावगी नव्हे !— केवळ संसारीच मनुष्य घेतला तर त्याला 'पुढें काय ?' हा प्रश्न बऱ्याच महत्वाचा असतो. कारण, संसारांत आजची तयारी, काल व उद्यांची तयारी आज करावी लागते. उद्यांची तरतूद आज करून ठेवणाराला '**पुढें काय**' हा प्रश्न तेवढासा अडचणीचा वाटत नाहीं; तितकासा भेडसावीतहि नाहीं. कारण, तो त्याच्या पुढें भयप्रद रीतीनें उपस्थित होत नाहीं; आणि झालाच तर त्याला उत्तर देण्याची तयारी त्याची आगाऊच झालेली असते. पण जे दूरदर्शी नसतात त्यांना हा प्रश्न फार भयप्रद होतो, आणि म्हणून ते तो प्रश्न सुचला तरी टाळूं लागतात ! आपल्या मनांत असतें एक आणि होत असतें भलतेंच असा सगळ्या जगाचा सर्वकाळचा अनुभव आहे. आतां असें आहे म्हणून मनुष्यमात्रानें इच्छा करण्याचें किंवा मनोरथ बांधण्याचें सोडून दिलें आहे असें नाहीं. शक्याशक्यतेच्या विचारासाठींच मनुष्य भविष्यवाद्याची पायरी चढतो. सर्व सामान्य दृष्टीहून भविष्यवाद्याची दृष्टी शास्त्रीय अनुमानानें सिद्ध असल्यामुळें विशेष दूरगामी असते. जें कोडें अगर जो पेंचप्रसंग स्वतःच्या बुद्धीला कितीहि ताण दिला, कितीहि डोकें खाजविलें तरी सुटत नाहीं, तोच प्रश्न भविष्यवाद्याकडून उकलून घेण्याचा प्रयत्न मी मी म्हणणारे मुत्सद्दीहि करींत असतात.

भविष्यवाद्याला सर्व विषयांचेंच थोडथोडें ज्ञान असावें लागतें. त्याशिवाय त्याला आपल्याकडे येणाऱ्या पृच्छकाचें समर्पक उत्तरें देऊन समाधान करतां येणार नाहीं. भविष्यवाद्याची भूमिका वाटते तितकी सोपी नाहीं. ती फारच [illegible] आहे. अर्थात् जावें त्याच्या वंशा तेव्हां [illegible] ! भविष्यकथनाची टिंगल टवाळी [illegible]

[अनुक्रमणिका](#)

माणसें समाजांत कांहीं थोडी थोडकीं नाहींत. मागें होतीं, आज आहेत व पुढेंहि निघतील. पण त्या टिंगली-टवाळीच्या मुळाशीं प्रामाणि-कपणाचा अंश मात्र, किती तरी कमी प्रमाणावर, जवळ जवळ नाहींच म्हटल्यास चालेल! भविष्यवाद्याला शिव्या घालणारीं माणसेंच भविष्यावर—जास्त विश्वास ठेवणारीं माणसें असतात असें माझें मत आतां ठरून गेल्यासारखें झालें आहे. आणि म्हणून अशा लोकांबद्दल मला राग न येतां त्यांची कींव करावीशी वाटते. —विचारे!—आपल्या मनाचा कमकुवतपणा इतरांच्या नजरेस येऊं नये म्हणूनच हा त्यांचा सारा खटाटोप असतो. सारांश, भविष्य-वाद्याची भेट घेऊन भविष्य जाणून घेण्याची इच्छा पुष्कळांनाच असते. पण राजरोस नव्हे! —अगदीं चोर पावलांनीं आणि चोर वाटांनीं! —'**सुखी सोनाराकडे व दुःखी भविष्य-वाद्याकडे**' अशी एक म्हणच आहे मुळीं!— एखादा मनुष्य भविष्यवाद्याचें घर शोधूं लागला म्हणजे नक्की समजावें तो कसल्या-तरी मुष्किलींत, पेंचांत, आणि संकटांत आहे म्हणून! हें भविष्य शास्त्राचा अभ्यास न करतां कोणालाहि वर्तवितां येईल. परिस्थितीचा इंगा फिरल्याशिवाय भविष्यवादी सुचत नाहीं. सुखाचे वेळींच भविष्याची चेष्टा करण्याची बुद्धि कोणालाहि होते. डॉक्टराकडे शारीरिक विकृतीचीं माणसें जातात, वकीलाकडे कज्जा-खटल्यांत अडकलेलीं माणसें जातात, पण— ज्योतिषी अथवा भविष्यवादी हा असा एकच प्राणी आहे कीं, त्याच्याकडे सर्वच प्रकारच्या अडचणींत सांपडलेलीं माणसें आपलें सुख-दुःख समजून घेण्याच्या इच्छेनें, श्रद्धेनें जातात. भविष्यवाद्याकडे व्यापारी येईल, रोगी येईल, विद्यार्थी येईल, नोकरीवाला येईल, कज्जेखटले-वाला येईल, स्त्री येईल, पुरुष येईल, मुलगा येईल—हज्जार तऱ्हेचीं माणसें येतील. अर्थात् त्या सर्वांना त्यांच्या त्यांच्या परी सांगून वाटेला लावणें ही कांहीं सोपी गोष्ट नव्हे!

एकदां असें झालें कीं, एक मनुष्य लॉटरीचें भविष्य मला विचारण्याकरितां कुंडली घेऊन आला. त्यानें अगोदर लॉटरीचा नंबर काढला होता व त्याचा निकाल चार दिवसांत होता. पैशांच्या अतिशय अडचणींत असल्यामुळें त्याला आपल्याला पैसे मिळालेच पाहिजेत अशी इच्छा होती. त्यानें माझ्यापुढें कुंडली टाकली. मीहि ती नीट पडताळून पाहिली. कुंडली वरून एवढ्यांत कांहीं त्याला मोठासा लाभयोग मला दिसत नव्हता. त्यामुळें मी त्याला म्हटलें, 'बुवा, या तुझ्या नंबराला बक्षीस मिळेल असें मुळींच वाटत नाहीं मला. तुझे पैसे फुकट गेले....' त्याबरोबर तो माझेवर इतका रागावला कीं कांहीं विचा-रूंच नका....देणगीचें राहिलें बाजूलाच पण प्रसंगीं मारहि मिळण्याइतका आवेश त्याच्यांत मला दिसला. आतां त्या दिवशींच्या माझ्या कुंडलींत मला मार मिळण्याजोगें ग्रहमान नव्हतें म्हणून सुटलों म्हणा; पण, केव्हां केव्हां ज्योतिषावर असले प्रसंग येणें अशक्य नाहीं. भविष्यवाद्याकडे लोक पेंचप्रसंग विचारायाला येतात खरें; पण केव्हां केव्हां कांहीं त्याचेच पुढें पेंचप्रसंग निर्माण करून जातात! एकदां अशी गम्मत झाली कीं, माझी वर्तमानपत्री 'प्रसिद्धि' ऐकून एक देहाचें दुकान मांडून बसणारी पण वयोमानानें सौंदर्याचें दिवाळें निघालेली स्त्री भेटावयास घरीं आली. माझ्या गबाळ चेहऱ्याकडे व पोरसवदा वयाकडे पाहून मी कुणि तरी म्हापणकरचा कारकून, प्यून, या पैकीं कोणी तरी असेन अशा समजुतीनें विचारती झाली कीं, 'ज्योतिष पहातात ते म्हापणकर कुठें आहेत?....मी हंसून विचा-रलं, काय काम आहे तुमचं त्यांच्याकडे?... ती म्हणाली, तुम्हांला काय करायचं आहे? —आम्हांला म्हापणकर कुठें तो दाखवा. आम्ही त्यालाच कायतें सांगू?—आतां या बाईशीं जास्त बातचीत करीत बसलें तर वेळापरी वेळ जाऊन घरांत आणखी वादळी हवा निर्माण होणार त्यापेक्षां आपणच प्रगट होणें बरें!...मी म्हटलें म्हापणकर ज्योतिषी वर्तमानपत्रांत भविष्य लिहिणारा तो मीच. त्यावर ती बाई कांहींशा चमत्कारिक मुद्रेनें मजकडे 'आ' वासून पहात राहिली. असें कां?

म्हणतांच ती म्हणाली, माझी समजूत अशी होती कीं, म्हापणकर म्हणजे कुणी. तरी तुंदिल तनु, आडवें गंधधारी, रेशमी शाल घेतलेला, रुद्राक्षाची माळ घातलेला वयस्क पुरुष असावा. तुम्हीं तर अगदींच 'हे' दिसतां ! पण चेहऱ्यावर तशा प्रकारें कांहीं एक भाव न दाखवितां जराशा गंभीपणानें मी म्हटलें, 'बाई तें जाऊं द्या....पण तुमचें म्हणणें काय ? तुम्हीं माझ्याकडे कशाकरितां आला होतां ? " धंदेवाईक लाघवीपणा दाखवून बाई उद्गारल्या, 'काय सांगू म्हापणकर, गेले सहा महिने आमच्याकडे कोणी फिरकत नाहीं हो ! काय आडअडचण आहे ती कळत नाहीं. कोणी कांहीं करणी विरणी केली नसेल ना ?.... तुम्हीं तंत्रमंत्र कांहीं करतां काय ?....एवढं आमचं जमवून द्या....मी तुमचे उपकार विसरणार नाहीं....खर्च कितीहि येवो....पण, माझ्याकडे कोणी तरी पाहील असं करा कीं ....अगदीं उपासानें मरण्याची पाळी आली....एकदां आलेला परत मुळींच कसा येत नाहीं ?....कांहीं तरी उपाय सांगा हो ऽऽऽ ! " मी तिचें तें सर्व पुराण ऐकून सर्दच झालों, भांबावून गेलों आणि काय सांगावें या विचारांत पडलों. एकदां वाटे, हिला सांगावें झालें 'चालती हो' म्हणून.... आम्हीं असले प्रश्न पहात नाहीं. दुसऱ्यांदा वाटे, एवढ्या लांबून ही बाई आली, हिला कांहीं तरी सांगावें व वाटेला लावावें. म्हणून शेवटीं मनाचा हिय्या करून बाईला विचारलें, 'तुमची कुंडली जन्मवेळ कांहीं आहे का ?....बाई उत्तरली 'नाहीं.' मग मी कशा आधारें भविष्य पाहूं ?....बाई म्हणाली, हातावरनं पहा !—शेवटीं हो.... ना करतां करतां....तात्पुरता प्रश्न आहे म्हणून प्रश्न कुंडलीवरून प्रश्न पाहिला आणि म्हटलें, बाई, या वेळेवरून मला असें वाटतें कीं, आपले हेतु साध्य होण्यास यापुढें ग्रहांची आडकाठी फार आहे. तेव्हां आपण चांगल्या मार्गानें जा व अन्य कांहीं व्यवसाय करा.... मी तंत्रमंत्रवाला माणूस नाहीं. मी कुणाला कधीं कसलेच तोडगे करून देत नाहीं. माझी वर्तमानपत्रांत जाहिरात [illegible]. [illegible] लोकांना भेटण्याकरितां [illegible] थाट-लेलें नाहीं. तुम्हीं एवढ्या [illegible]बून आलां म्हणूनच तुमचा प्रश्न पाहिला. हवं तर मला कांहीं देऊं नका पण—आतां तुम्हीं जा, कांहीं देवसेवा करा....! इतकें निर्वाणीचें सांगूनहि बाई जागची हालेना....तेव्हां थोडेसें रागानेंच पण—कंटाळ्यानें मी म्हणालों, 'आतां आणखी काय ?'....बाई, कळवळ्यानें उद्गारल्या,—" नाहीं म्हणूं नका ....आम्हीं आतां खावें काय ?—कांहीं तरी किमया करा आणि आमची 'यवस्था' (व्यवस्था) सांगा ! "....आतां मी अशा पेंच-प्रसंगांत सांपडलों कीं, या बाईची 'यवस्था' मी लावावयाची कीं काय ?....लोकांचें भविष्य पहाणारा मी; पण मलाच त्यावेळीं माझें भविष्य कोणी तरी पाहील तर बरें असें वाटूं लागलें !—तात्पर्य भविष्यवाद्याकडे नानाप्रकारचें चमत्कारिक लोक येतात व त्यांचें समाधान करणें तितकेंच त्याला कठीण काम असतें. त्यांच्या अज्ञानाबद्दल त्यांचा उपहास करावा तर तेंहि ठीक नसतें. कारण तसें करण्यानें श्रद्धेच्या मुळा-वर त्यांच्या घाव घातल्यासारखा होतो. पुष्कळांना ज्योतिष्यांना काय प्रश्न विचारावें हेंच कळत नाहीं. ज्योतिषी म्हणजे कित्येक लोक ब्रह्मदेवाचा बापच समजून प्रश्न विचारतात. अश्रद्धा वाईटच पण अंध श्रद्धाहि तितकीच वाईट हे कोणी विसरूं नये. वारंवार ज्योति-ष्याकडे जाणें अगर किरकोळ शिरकोळ प्रश्न विचारणें बरें नाहीं. वरील कांहीं उदाहरणें दिलीं त्यावरून अशी कोणी समजूत करून घेऊं नये कीं, मी कुणाचीं टर–थट्टा करावी या उद्देशानें सारे लिहिलें आहे. प्रत्येकाच्या व्यवसायांत कांहींना कांहीं गमती-दार, विचित्र अनुभव येतच असतात. ते येण्यानें थोडीशी करमणूक होते व ते ज्यांच्या बाबत असतात त्यांनां आपलें कुठें चुकलें हें कळून सुधारण्यास वाव मिळतो. कोणी कितीहि नाकानें कांदे सोलले तरी भविष्यवादी ही व्यक्ती कांहींशी वरवर तिरस्कारदर्शित वाटत असली तरी अंतःकरण आकर्षूनच घेणारी असते. अगदीं लहान मुलें सुद्धा भविष्यवादी ज्योतिषी म्हणतांच त्याच्या आस-पास जमा होतात. आणि आपला हात पुढें करून भविष्य विचारतात. तर थोरांना हा मोह झाल्यास आश्चर्य कसलें ? भविष्यकथन-श्रवणाचा खेळ सर्व देशांत सारख्याच योग्य-तेनें फार प्राचिन काळापासून लोक खेळत आले आहेत. भोळ्याभावना या आपल्या हिंदुस्थानांत आहेत आणि परक्या देशांत नाहींत असें नाहीं. सुधारलेले देश, सुधार-लेल्या व्यक्ती भविष्यकथनापासून दूर राहूं शकत नाहींत. दुधखुळे लोक हिंदुस्थानांतच तेवढे जन्माला येतात व इतर देशांत जन्माला येऊंच शकत नाहींत असें समजणें हा सुद्धां दुधखुळेपणाचाच एक प्रकार नाही काय ?....भवितव्य चरा-चराला आहे, मनुष्यप्राण्याला आहे आणि जड वस्तूला नाहीं असें नाहीं. पशू, पक्षी, जागा जमीन, देश, राष्ट्र सर्व भवितव्याच्या फेऱ्यांत सांपडूं शकतात. भविष्य शब्द जन्मापासून सुरू होतो तो मरणापर्यंत चालू असतो इतकेंच नव्हे तर मेल्यानंतरहि त्याचें भवितव्य त्याच्या मागें शिल्लक असतेंच. ज्या अर्थी माणसाच्या पाठीमागें त्याचें **भवितव्य** परमेश्वरानें दिलेलें आहे त्या अर्थी आपल्या मनाचें समाधान करून घेण्यासाठीं तसाच कांहीं विशिष्ट प्रसंगीं मनुष्य भविष्यवाद्याकडेसच जाणार यांत संदेह नाहीं. ॥ **शुभम्–भवतु** ॥

———


प्रिये, आपण दिवसेंदिवस एकमेकां... चाललों आहोत !

अनुक्रमणिका







# वाहती गंगा

लेखक :

**यशवंत गोपाळ जोशी**



[ आधुनिक पद्धतीनें सजविलेला दिवाणखाना. रेडिओ, टेलिफोन वगैरेनीं सुसज्ज. टेबलावर वासंतीचा एक फ्रेम केलेला फोटो आहे. त्याच फोटोची मोठी रंगीत तजवीर भिंतीवर टांगलली आहे–विश्राम एक पत्र वाचीत उभा आहे.

" विश्राम यांसी––

ठरल्याप्रमाणें मी आज जाणार. आजच आपल्या लग्नाला दहा वर्षे पुरी होतात. मी आपणांला आतापर्यंत नानाप्रकारें सांगून पाहिलें. आपण पटल्यासारखें ऐकून घेतां—पण त्यामुळें आपल्या वृत्तींत मात्र कांहींच फरक पडलेला दिसत नाहीं. आपण मलाही कांहीं स्वतंत्र हालचाल करूं देत नाहीं. गेले सहा महिनें मी आपणांशीं अबोला धरला—घरांतली सर्व नोकर माणसें काढून टाकली. त्यामुळें आपण जास्तच गोंधळल्यासारखे करतां—तेव्हां मी आपल्या समोरून दृष्टीआड झाल्याशिवाय आपण आपल्या जीवितांत जागे होणें अशक्य आहे, असे माझ्या मनानें घेतले आहे—मी आज हें घर सोडणार—

—केंव्हाही आपलीच—

वासंती "

[ पत्र वाचून विश्राम एक मोठा थोरला सुस्कारा टाकतो व त्या पत्राची अगदीं हलक्या हातानें घडी करून खिशांत ठेवतो व टेबलावरील वासंतीचा फोटो हातीं घेऊन त्याकडे करुणार्द्र दृष्टीनें पहात स्वत:शींच– ]

विश्राम:—अजूनहीं तूं आपला निश्चय बदलणार नाहींस कां ? तुझा हा विरह मी सहन तरी कसा करणार ? ( हातांतील फोटो पुन्हां टेबलावर ठेवतो—आणि भिंतीवर लावलेल्या–वासंतीच्या रंगीत तजवीरीकडे पहात ) पण, तुझं म्हणणंही खरं आहे ! एक सारख्या सुखाचा, आणि त्याच त्याच सुखाचा—माणसाला कधीं तरी वीट येणारच ! पण अशा सुखाचा कंटाळा आला तरी कोणीही असं भरल्या सुखाचं ताट आपल्या

**• • मला वाटतं असे कित्येक दरिद्री पण प्रामाणिक देशभक्त असतील कीं त्यांच्या व्याख्यानानंतर त्यांच्या गळ्यांत हार घालण्यापेक्षां जर त्यांच्या हातावर सबंध भाकरी –एक मूद भात आणि कोरड्यास ठेवलं तर आनंद वाटेल !**

हातानं कधींच दूर लोटीत नाहीं—पण वासंती—ते धैर्य आज तूं दाखवीत आहेस ! आपल्या लग्नाला आज दहा वर्षं झाली —अजून तूं आणि मी दोघंच आहोत– आणि आज तूंही मला सोडून जाणार ! ( तजवीरीकडे न्याहाळून पहात ) या तुझ्या निर्जीव प्रतिबिंबाकडे पाहून—अरेरे, त्या निर्जीव चित्रावरही कोळिष्टकें बसली वाटतं ! वासंती, बाकी तुझ्या जिवाची हौसच कांहीं निराळी–बायकांची जात नोकरा चाकरा करितां हपापलेली असते–आणि तूं त्यांनाही कंटाळलीस–आणि येवढा श्रीमंत मी असून–सुद्धां–तुझ्या हट्टासाठीं–घरांतली जुन्यांत जुनी नोकर माणसं काढून टाकली–त्यामुळें या तुझ्या निर्जीव पण सतेज प्रतिबिंबावर–सुद्धां कोळिष्टकें–( एक स्टूल घेऊन येतो व वासंतीची तजवीर खालीं काढतो–तों त्या तजवीरीच्या पाठीमागें स्वातंत्र्यवीर वासुदेव बळवंत फडक्यांची तजवीर लावलेली असते–विश्रामचे दोन्ही तजवीरीकडे लक्ष जाते–तो कांपऱ्या हातानेंच वासंतीची तजवीर खालीं ठेवतो–कांहीं वेळ दोन्ही तजवीरीकडे आळीपाळीनें पहातो—त्याला हुंदका येतो–आणि कांहींतरी आवेगानें विश्राम खुर्चीला टेकून खालीं बैठकीवरच बसतो. ]

विश्राम:—( आवेगानें ) दहा वर्षांपूर्वी कॉलेजच्या आणि जाहिर सभांच्या [illegible]वर








ज्यांनी या विश्रामाची देशभक्तीची भाषणें ऐकली असतील—**वासुदेव बळवंत**, मला क्षमा करा–माझी आणि वासंतीचा प्रीतिविवाह झाल्यानंतर माझ्या वृत्ति एकदम बदलल्या—मी मोहवश झालो, जग विसरलो, देश विसरलो आणि **वासुदेव बळवंत** मी भक्तिभावानें आणलेली आपली ही तसबीर मला धड आडगळींतही टाकवेना—आणि माझ्या बदललेल्या वृत्तिमुळें मला डोळ्यासमोरही सहन होईना—पत्निच्या या प्रेमाच्या मानचित्रानें मी आपलें मानचित्र डोळ्याआड केलें—आज माझी प्रिय वासंती मला सोडून जाते आहे—आणि आजच आपण मला पुन्हा दर्शन दिलंत—( टेलिफोनची घंटा वाजते टेलिफोन हाती घेत ) येस् मी विश्वास—मला निरोप आहे—कोण बोलता आहांत आपण ?—अवंतिका फिल्म कंपनी—बरं—मास्टर दुष्यंत आणि प्रो. कांबळे आज ठरल्याप्रमाणें चहाला येत आहेत ? ठीक—ठीक—(टेलिफोनचा रिसीव्हर खालीं ठेवतो–आणि तसाच बोलत रहातो ) पण दुष्यंतांना एक निरोप सांगता का ?—आज येण्यापेक्षां पुन्हा केव्हां तरी—( तोंच टेलिफोन आपण खालीं ठेवल्याचें विश्रामच्या लक्षांत येते. तो आपल्याशीच हंसतो आणि एकदम आवेगानें उठून इकडे तिकडे हिंडतो ) लोकांना फसवणं फार सोपं आहे—पण आपलं आपल्यालाच फसवणं फार कठीण आहे ! ( फोनोवर एक प्लेट लावतो व त्याच्या चार ओळी एकतो व तीच प्लेट पुन्हा पहिल्यापासून लावतो—असें त्याचें दोन तीन वेळ चालते. विश्राम फोनो बंद करतो आणि अस्वस्थ मनानें पुन्हा येरझारा घालू लागतो ) परिस्थिती राजा कडेकोट बंदोबस्तानें राहिला तरी सुद्धां बोरांतल्या आळीचें रूप घेऊन त्याच्या जीविताचा मोक्ष त्याला तिथेही भेटायला आला—अर्थ आणि काम या दोन पुरुषार्थांनाच मिठ्या मारून मनुष्य जरी बहिरा होऊन बसला—तरी सदसद्विवेक बुद्धीची आळी कोणत्या क्षुल्लक प्रसंगांतून आपला मोक्ष आपल्याला दाखवील—( पुन्हा कावराबावरा हिंडतो टेबलाजवळ जातो—टेबलावरचे एक हस्तलिखित वाचूं लागतो ) कस्तुरीमृगाच्या हत्येनंतरच माणसाच्या हाती कस्तुरी लागते—चंद्रशेखरानं आपली सुस्थिती आणि सौख्य धुळीला मिळवलं म्हणूनच चंद्रशेखर असं लिहूं शकतो ! ( हस्तलिखित चाळीत )

" मानवी जीवनांत खऱ्या शाश्वत सुखाची वाढ त्यागानेंच होत असते—त्याग—"

[ हस्तलिखीत टेबलावर टाकतो आणि मोठ्या आरशांत जाऊन आपला चेहेरा पहातो आणि आळस देतो ] आतां लोकांशीं बोलण्यापेक्षां वेड्यासारखं आपलं आपल्याशीच बोलण्यांत मला आनंद वाटतो आहे ! [ एक खुर्ची घेतो आणि आरशासमोर बसतो आणि समोर आरशांत आपल्याच दिसणाऱ्या प्रतिबिंबाला नमस्कार करतो ] [आरशांतील प्रतिबिंबास] काय, ठीक आहेना ? —आमचं ठीक आहे !—का तुम्हींही हंसता आहांत ?—तुमचंही ठीक दिसते आहे ! ( एकदम आवेगानं उठून ) तुमचं असेल बुवा ठीक—पण आमचं कांहीं सध्या ठीक नाहीं ! मांजरीचं पिल्लू हरवलं म्हणजे मांजरी जशीं एक आर्द्र साद देत सैरा वैरा भटकत असते त्याप्रमाणे अंतःकरणांत कुणाची आणि कसली तरी साद ऐकूं येत आहे ! वासंती आज घरं सोडून जाणार—कुठे जाणार सांगत नाहीं ! [ रेडिओ लावू लागतो तोंच घरांतील आचारी एक चिठ्ठी आणून विश्रामच्या हातीं देतो. ]

"—ठरल्याप्रमाणें आपले आते बंधू आणि त्यांची पत्नि पद्मा आजच आपल्याकडे रहाण्याकरितां येणार आहेत—मला त्यांनांही भेटायची इच्छा नाहीं—वासंती. "

आचारीः—काय सांगू बाईसाहेबांना ?

विश्रामः—चिठ्ठी वाचली म्हणून सांग.

आचारीः—उलट कांहीं निरोप ?

विश्रामः—चिठ्ठीचे अक्षर अत्यंत वळणदार आणि सुंदर आहे म्हणावं ! पण आपण आज इकडे कुठे ?

आचारीः—आज चहाला आणि फराळाला कोणी येणार आहेत म्हणून बाईसाहेबांनीं

मूलीं दुपारींच बोलावून घेतलं–बटाट्याचे पोहे–चिवडा–शिरा वगैरे तयार आहे–माणसे आल्याची वर्दी लागतांच चहा टाकतो!

विश्राम : — आभारी आहे आपला. [इतक्यांत दारावरची घंटा वाजते–विश्राम बाहेर जातो–आचारी वासंतीच्या फोटोकडे पाहून आश्चर्याचे हांतवारे करीत निघून जातो–तोंच विश्राम–चंद्रशेखर आणि पद्मा प्रवेश करतात.]

विश्राम:—चंद्रशेखर, आलास. आनंद झाला–पण इथं कायम रहाण्याच्या इरादानें आलास ना?–वहिनी सध्यां तुम्हीही इथेंच बसायला पाहिजे–संकोचाचं कांहीं कारण नाहीं–बसा–(पद्मा एका खुर्चीवर बसते. विश्राम चंद्रशेखरच्या खांद्यावर हात टाकीत) –हं काय बंधूराज, पुन्हां हेलपाटा कशाला ठेवलांत? येतांना आपले बिऱ्हाडाचे सामान सुमान का नाहीं आणलंत?

चंद्रशेखर:—मी माझ्या सर्व वैभवासह आणि इस्टेटीसुद्धां आलो आहे!

विश्राम:—ऐकतो आहे—

चंद्रशेखर:—दुसऱ्याच्या उपयोगी पडणं–दुसऱ्याला अडीअडचणीला जामीन राहणं –देशभक्ती लोकसेवा–इत्यादि मोठ्या नांवाखालीं मी माझी सर्व इस्टेट उधळली आहे असा माझा नांवलौकिक झालेला आहे–पण एका वाक्यांत खरं सांगायचं असलं तर माझी सर्व इस्टेट मी मूर्खपणानं उधळली आहे! एकवेळ प्रत्यक्ष देवदर्शन सहज घडेल पण 'खऱ्या अडचणींतला आणि खरा भूकी माणूस' मदत देण्याकरितां आपल्या वाट्याला येणं कठीण आहे! तात्पर्य काय–मी माझी सर्व इस्टेट घालविली आहे आणि जी कांहीं राहिली आहे त्याचा आतां मला कांहींच उपयोग नाहीं!

विश्राम:—म्हणजे तुझ्याजवळ आता राहिलं आहे तरी काय?

चंद्रशेखर:—जे कांहीं राहिलं आहे ते सर्व या पुडक्यांत सामावलेलं आहे! यांत कांहीं माझ्या नांवाचे–कांहीं लोकसेवामंडळ—आत्मोन्नति मंडळ–इत्यादि नावाचे नोट पेपर्स–व्हिजिटिंग कार्डस–माझ्या नांवाची 'इन आऊट' ची पाटी, लेटर बॉक्स आणि रबरी शिक्के आहेत! घरांत चार भांडी कुंडी राहिली होती–ती येतांना घरमालकाला त्याच्या राहिलेल्या भाड्याच्या पोटी स्वखुशीनें देऊन आम्ही दोघेही नवरा बायको स्वखुशीनें आणि अक्कल हुशारीनें तुझ्या आश्रयाला आलो आहोत!

विश्राम:—बरं मी तुला चारदोन नोकर माणसं पहायला सांगितली होती त्यांचं काय केलंस?

चंद्रशेखर:—पैकी दोन माणसं कामावर येऊन हजर झाली आहेत– मालकसाहेब, हुकूम व्हावा! [तिथलेंच एक फडके घेऊन फर्निचर वगैरे पुसूं लागतो व पद्मेस–आपल्या पत्निला–उद्देशून] प्रियसखे, आपण दोघेही हरिश्चंद्र तारामती सध्यां वनवासांत आहोत–मी फर्निचर पुसतो—हृदयवल्लभे—तूं केरसुणी घेऊन झाडायला लाग! [पद्मा उठून उभी रहाते. विश्राम तिला बसण्याची खूण करतो.]

विश्राम:—वहिनी, शेखरचं मन आज ताळ्यावर दिसत नाहीं!

पद्मा:—आज?—छे: त्यांचं मन कधींच ताळ्यावर नसतं! आमचं लग्न झाल्यापासून सांसारीक दृष्टीनें ते एक दिवसही शुद्धीवर होते असं मला आठवत नाहीं! आपल्या भावाबद्दलच बोलते आहे—रागावूं नका!

शेखर:—[पद्मेला उद्देशून] मी आपला सर्वस्वी अपराधी आहे! पण आपल्या आयुष्याच्या रडगाण्याचा त्रास विश्रामला का? कदाचित या कटकटीमुळें—

विश्राम:—शेखर, तूं आज आपण होऊन इथें नोकरीला राहिला आहेस ना? मग मालकाचा हुकूम आहे—[शेखर हात जोडून त्याच्यापुढें उभा रहातो]

शेखर:—काय आज्ञा आहे?

विश्राम:—[सिगारेटचे पाकीट काढून त्यांतील एक सिगारेट शेखरचे हातीं देतो]


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



मी वहिनींशीं बोलतो आहे तोंपर्यंत ही सिगरेट ओढीत त्या खुर्चीवर बसून रहा..

शेखर:—ओझा सरकार ! पण मला वाटतं सिगरेट ओढायला काड्याची पेटी लागते नाहीं ?

विश्राम:—[ काडी ओढून चंद्रशेखरच्या सिगारेटला लावतो—शेखर धूर सोडीत खुर्चीवर बसतो ] वहिनी—

पद्मा:—भाऊजी, आपले हे बंधूराज म्हणजे सद्भावनेचे आणि चांगुलपणाचे नुसते राक्षस आहेत ! लोकसेवा—लोकांच्या उपयोगी पडणं—या भ्रमांत यांनीं स्वतःच्या संसाराकडे इतकं दुर्लक्ष केलं कीं त्यामुळं आमची तीन मुलं—आणि आम्हाला होतीही तीनच—काळाच्या भक्ष्यस्थानीं पडलीं !

शेखर:—त्यांची आयुष्यरेषाही तितकीच असेल कदाचित !

पद्मा:—पण आमचीं मुलं केवळ यांच्या हलगर्जीपणामुळें मृत्युमुखीं पडली असं अजूनही मला वाटतं !

शेखर:—माझी काळप्रवाहांत गडप झालेली तीन मुलं—मी कांहीं तरी अभिनिवेशानं त्यांची नांव ठेविली होती—लाल—बाल आणि पाल—

पद्मा:—भाऊजी, आमची घरं शेतीवाडी आणि संसार आमच्या हातांतून गेल्याचं मला कांहींच वाटत नाहीं—पण माझे ते तीन जीवनाधार—

शेखर:—पण माझ्या गृहदेवते, देव करतो नेहमीं आपल्या बऱ्या करतांच करतो हें तुला अजूनही पटले नाहीं कां ? गेले कांहीं दिवस आपण दोघांनींच उपास काढले—त्या तशा स्थितींत आपले ते तीन जीव जर हयात असते तर आपल्याला जास्त वेदना नसत्या का झाल्या ?

विश्राम:—शेखर, हें तूं मनापासून बोलतो आहेस कां ?

पद्मा:—अहो हे नेहमींच असं बोलतात ! आणि यांच्या या बोलण्याला आणि त्यांच्या लिहिण्याला एकप्रकारची मादक नशा आहे म्हणूनच हा जन्म मी यांच्याबरोबर काढते आहे—आणि जन्मोजन्मीं मला हाच सहवास मिळावा अशी माझी देवाला दैनंदिन प्रार्थना आहे ! आपण यांचं हस्तलिखित वाङ्मय वाचून पाहिलात का ?

विश्राम:—शेखरचं हस्तलिखित वाङ्मय मी बहुतेक वाचून काढलं आहे आणि त्यांतल्या त्यांत 'लोकदर्शन' या आयुष्य कथांनीं तर मला वेड लावलं आहे ! आणि वहिनी, तुमच्या या बोलण्यावरून तुमचाही हात शेखरच्या वाङ्मयाला—

पद्मा:—होय, माझा हात यांच्या लेखनाला ते फेकून देण्याकरितां आणि फाडून टाकण्याकरितां अनेक वेळ लागला आहे—

विश्राम:—आणि तरीही इतकी हस्तलिखितं शिल्लक राहिली ?

पद्मा:—आमची मुलं हयात होती तोपर्यंत त्यांच्याकडे यांचं लक्ष लागावं म्हणून मी यांच्या लेखनाचे हाल करीत होते—आतां मला कशाचीच काळजी उरली नाहीं—

आतां ते लिंहीत बसतात आणि मी पहात बसते !

विश्रामः—पण परवां शेखरचं इथें व्याख्यान झालं–काय तुफान लोकसमुदाय जमला होता—प्रत्येक जण शेखरची स्तुती करीत घरीं चालला होता—

पद्मा:—होय, त्याच व्याख्यानाच्या दिवशींचीच गोष्ट सांगते–त्या दिवशीं यांच्या गळ्यांत मोठा कमालखानी हार घातला गेला. त्या हारासकट हे घरीं आले–वेळ दुपारची होती—मात्र जेवण अद्याप व्हायचं होतं–आणि त्या दिवशीं आमच्या घरांत मात्र–जेवण्याच्या ताटावर सूर्याचे रखरखणारे ऊन पडलं होतं—आणि नळाला पाणी चालू होतं !

शेखर:—पण माझ्या हृदयदेवते, तोंच दिवस आपला जास्तींत जास्त आनंदांत गेला नाहीं का ? गळ्यांतल्या कमालखानी हारांतील गुलाबाची फुलं कुरतडून त्या गुलाबांच्या फुलांच्या पाकळ्या गुलकंदासारख्या आपण सुकेपोटीं खाल्या आणि संध्याकाळीं राहिलेलीं शेवंतीची फुलं उपयोगी पडतील कीं काय या आशेनं तूं एक शेवंतीचं फूल तोंडांत टाकलंस–आणि जो कांहीं कडवट चेहरा केलास–तोच अद्याप तुझा कायम आहे ! आणि आतां ह्यातीभर तो तसाच कायम राहील अशी मी आशा करतो !

विश्राम—मला वाटतं असे कित्येक दरिद्री पण प्रामाणिक देशभक्त असतील कीं त्यांच्या व्याख्यानानंतर त्यांच्या गळ्यांत हार घालण्यापेक्षां जर त्यांच्या हातावर सबंध भाकरी, एक मूदभर भात आणि कोरड्यास ठेवलं तर त्यांना आनंद वाटेल ! लोकसेवकाच्या उदर भरणाचं असलेलं सामाजिक ऋण आपली जनता अजून ओळखीतच नाहीं !

शेखर—विश्राम, खोटं आहे तुझं म्हणणं–समाज–जीवनाची 'वहाती गंगा' अद्याप गंगे इतकीच पवित्र आहे ! पण समाजाच्या या वाहात्या गंगेकाठीं स्वतःच्या करमणुकीसाठीं—वाहत्या पाण्यावर ठिकऱ्यांचा खेळ खेळून पाणी गढूळ करणारेच फार आहेत ! खऱ्या आदरानें—जिव्हाळ्यानें आणि तळमळीनें समाजाच्या या वहात्या गंगेशीं याल—तर समाधानाची ढेकरच तुम्हाला द्यावी लागेल !

पद्मा—पण आपण मात्र सध्या कोरडीच ढेकर देत आहोत ! विश्राम भाऊजी, यांच्या या बोलण्यावरून आणि वागण्यावरून कित्येक वेळेला कडवटपणानें मला असं वाटतं कीं जगांत परमेश्वर आहे का नाहीं—?पण तशाही स्थितींत यांना शांत आणि समाधानें हंसतांना पाहून असं वाटतं—

विश्राम—काय वाटतं ?

पद्मा—यांचं हे शांत आणि समाधानी हास्य पहाण्याचे भाग्य लाभावे म्हणून आणखी काय वाटतील त्या हाल अपेष्टा सहन करायला तयार व्हावं !

शेखर—विश्राम, हिच्यावर माझं प्रेम आहे का नाहीं मला माहीत नाहीं पण ही माझ्या जीवाची सहधर्मचारिणीं आहे !

विश्रामः—पण बंधुराज आणि भावजई—हे तुमचे दुर्दिन आतां संपलें असं समजा ! प्रसिद्ध अवंतिका फिल्म कंपनीचे मा. दुष्यंत हे माझ्या जिव्हाळ्याचे स्नेही आहेत. ते आजच माझ्याकडे चहाला येणार आहेत—कांहीं कारणांमुळें माझी मनस्थिती आज ठीक नाहीं—पण शेखरची 'लोकदर्शन' ही कथा मी चित्रपटाकरितां त्यांना द्यायला लावतो–तशीच चांगली चित्रकथा मिळाली तर आपण एका चित्रकथेला दहा हजार रुपये देऊं असे मा. दुष्यंत माझ्याजवळ अनेक वेळ म्हणाले आहेत !

शेखर:—पण त्या दहा हजाराच्या नोटा ब्रिटिश सरकारच्या का खिलापत कमेटीच्या ? माझ्या माहितीप्रमाणें कथालेखकांच्या बाबतींत आपल्या मराठी फिल्म कंपन्यांचं अंकगणित फार कच्चं आहे !

विश्रामः—प्रत्यक्ष काय अनुभव येतो तो आपण आतां पाहूंच ना ! वहिनी–शेखर, तुम्ही तुमच्या आयुष्याची कर्मकथा मला सांगितलीत–पण माझ्या आयुष्याची कर्मकथा अद्याप तुम्हाला कुठे कळली आहे ?

शेखर:—कांहीं विशेष घटना ?

विश्रामः—होय, माझी पत्नि वासंती आज हें घर सोडून जाणार आहे !

पद्मा:—म्हणजे ?

विश्रामः—म्हणजे काय, घर सोडून जाणार आहे.





अनुक्रमणिका

पद्मा:—कुठे

विश्राम:—माहीत नाहीं !

पद्मा:—परत केव्हां येणार

विश्राम:—माहीत नाहीं !

पद्मा:—पण घर सोडण्याचं कारण ?

विश्राम:—अर्थात् कारण कांहींतरी असलंच पाहिजे ! आणि आश्चर्याची गोष्ट ही आहे की वासंतीचा प्रेमळ स्वभाव तुम्हा दोघांच्याही परिचयाचा आहे–आज कित्येक दिवसांनीं आणि अशा आपत्तींत तुम्ही इथे आलांत–ती तुम्हालाही आज भेटूं इच्छित नाहीं–ती आपल्या खोलींत एकटी बसली आहे–जातांना ती मलाही भेटू इच्छित नाहीं –आज केव्हांतरी ती अदृश्य होणार आहे म्हणे !

पद्मा:—काय म्हणता काय ? मग मला त्यांच्या इच्छेविरुद्धही आंत जाऊन भेटलंच पाहिजे !

विश्राम:—माझी हरकत नाहीं–पण मला वाटतं आपण विनाकारण अपमान करून घ्याल !

पद्मा:—अपमानाची मला आतां इतकी संवय झाली आहे की कुणी आदरानें बोलायला लागलं कीं मला तिथेंच कांहींतरी धोका वाटूं लागतो ! आणि स्त्रीहृदयाला–स्त्रीहृदय भेटायला चाललं आहे ! बायका संकोचानं इतरांजवळ मोकळ्या मनानें बोलणार नाहींत–पण एकमेकींजवळ त्या मनमोकळेपणानें बोलूं शकतात—

विश्राम:—ठीक आहे ! मानवी मन 'अपेक्षा भंगाचे' चमत्कार करून दाखविण्यांत पटाईत आहे ! 'असं होईल' म्हणून अपेक्षा करावी आणि नेमकं तेच होत नाहीं ! [ घंटा वाजते–शेखर दार उघडायला जातो–विश्राम त्याला अडवतो. ]

शेखर:—विश्राम माझी इच्छा नसतांना केवळ तुझ्या मनाच्या समाधानाकरितां मी इथें आश्रयाला आलो–आश्रितासारखे नव्हे—आपुलकीनें इथे पडेल ते काम मला करायलाच हवे—

पद्मा:—आज मी या घरीं आले–आणि त्याच दिवशी माझी वासंती घर सोडणार ? छे. छे. मी तसे होऊं देणार नाहीं–मी त्यांना आग्रह करून—

विश्राम:—ठीक आहे ! तुम्हा दोघांनांही आपल्या मनाप्रमाणें वागायला मोकळीक आहे ! [ पद्मा आणि शेखर दोघेही दोन बाजूनें जातात. विश्राम–वासंतीची भिंतीवरची खालीं काढलेली तसबीर परत जाग्यावर ठेवीत म्हणतो. ] देशभक्ता, पुन्हा अदृश्य व्हा ! [ इतक्यांत शेखर एक व्हिजिटिंग कार्ड आणून विश्रामच्या हाती देतो ] कोण रेवाशंकर चिमणाजी ? कोण बुवा ? येऊं देत आंत !

( पान १६३ वर चालू )



अर्धांगी अर्थात् पायाची दासी












: लेखक :
**र. गो सरदेसाई**

माझ्या परिचयाच्या एका प्रसिद्ध लेखकाच्या एका नाटका-विषयीं मी लिहिलेल्या अभिप्रायासंबंधीं बोलतांना तो लेखक मला म्हणाला—

"नाटकाचें परीक्षण करतांना त्याचें प्रयोगमूल्य तुम्हीं लक्षांत घेतलेलें नाहीं. नाटक हा वाङ्मयाचा एक भाग असला तरी त्याचें परीक्षण तुम्हाला कथाकादंबरी–काव्याप्रमाणें निव्वळ वाङ्मयमूल्यांनीं करता येणार नाहीं. नाटकाचें परीक्षण करतांना टीकाकारानें त्याचें प्रयोगमूल्यही लक्षांत घेतलें पाहिजे...."

नाटककार मित्राचें हें विधान मला तेव्हां पटलें नाहीं आणि आजहि पटत नाहीं. मी त्याच्याशीं या मुद्यावर तेव्हां बरीच चर्चा केली व नाट्यग्रंथाचें वाङ्मयमूल्य मोजतांना त्याचें प्रयोगमूल्य लक्षांत घेण्याची जरूरी नाहीं; इतकेंच नव्हे तर तसें करणें, अनेक कारणांनीं, खुद्द नाटककारालाहि अनेकदां अन्याय करण्यासारखें होईल असें अनेक उदाहरणें देऊन पटवून दिलें. या चर्चेंत मला असें आढळून आलें कीं, नाटकाचें वाङ्मयमूल्य व प्रयोगमूल्य यासंबंधीं अनेकांच्या डोक्यांत मोठा विचित्र गोंधळ उडालेला असतो. उपरोक्त नाटककाराप्रमाणेंच आणखीहि कांहीं नाट्यप्रेमीं रसिकांशीं मी या प्रश्नाबाबत चर्चा केली आहे. या चर्चेनें माझा वरील ग्रह दृढमूलच झाला आहे.

ललित वाङ्मयांतील काव्य, कथा, कादंबरी व नाटक यांचें परीक्षण करतांना मी नेहमीं निव्वळ वाङ्मयात्मक दृष्टीकोणानेंच तें करीत असतो. अर्थात त्या त्या वाङ्मय प्रकाराप्रमाणें टीकेची कसोटी थोडथोडी निराळी होणें अपरिहार्यच असतें. तरी नाटकाचे वाङ्मयगुण पारखतांना त्याचें प्रयोगमूल्य फार काय पण प्रयोगयश हें लक्षांत घेण्याचें टीकाकाराला कांहीं प्रयोजन नाहीं असें माझें ठाम मत आहे. नाटक हें निव्वळ श्राव्य वाङ्मय नसून तें मुख्यतः दृश्य वाङ्मय आहे (अर्थात नभोवाणीवर ध्वनिक्षेपित करण्यांत येणाऱ्या श्रुतिका, संगीतिका, नाटिका याला अपवाद आहेत !) यांची मला पूर्ण जाणीव असूनहि मी हें विधान करीत आहे,

नाटककार नाटक लिहितो तें मुख्यतः रंगभूमीवर त्याचा

अनुक्रमणिका

प्रयोग व्हावा म्हणून; त्याचें नुसतें पुस्तक प्रसिद्ध व्हावें म्हणून नव्हे, हें उघडच आहे. पण तेवढ्यासाठीं नाटकाचे प्रयोगमूल्य लक्षांत घेऊन त्याचे वाङ्मयगुण मोजा, असा आग्रह धरणें म्हणजे काव्याची योग्यता त्याच्या पाठांतर सुलभतेवरून ठरविण्या-सारखें खुळेपणाचें होईल. काव्यरचना ही मुख्यत: पाठांतराच्या सोयीसाठींच अस्तित्वांत आली हें ऐतिहासिक सत्य असलें तरी जुन्या किंवा नव्या कुठल्याही काव्याचें मूल्यमापन करतांना त्याची पाठांतरसुकरता कोणी हिशेबांत घेतल्याचें मला माहीत नाहीं ! नाटकाचेंहि तसेंच असले पाहिजे.

नाटक हें रंगभूमीवर यावें म्हणूनच मुख्यत: लिहिलें जातें. पुष्कळदां नाटककार आपलें नाटक रंगभूमीवर यावें एवढ्यासाठीं आपल्या मूळ कथानकांत व भूमिकांत नाटक मंडळीच्या इच्छेनु-सार फेरफारही करून देतो. या पायीं बहुधा तो आपल्या नाट-कांत वाङ्मयदृष्ट्या कांहीं दोष शिरलेले उघड्या डोळ्यांनीं पाहाण्यासहि तयार असतो. कोणीकडून तरी नाटक रंगभूमीवर यावें हीच नाटककाराची हार्दिक इच्छा असते. एखाद्या वक्त्यानें आपलें भाषण कितीहि उत्कृष्ट तयार केलें, तरी तें जोंवर श्रोतृ-वृंदासमोर प्रत्यक्ष वक्तृत्वपूर्वक झालें नाहीं तोंवर त्याला जसें समाधान मिळत नाहीं, तद्वत नाटककाराला आपलें नाटक रंग-भूमीवर आल्यावांचून नाट्यनिर्मितीचा खरा आनंद लाभत नाहीं. या आनंदलाभासाठीं कैकदां नाटकांत नाटकमंडळीच्या इच्छेनु-सार फेरफार करून नाटकाला नकटेपणाचा दोष चिकटवून घेण्यासहि नाटककार तयार होतो. नाटकाचें खरें वैभव त्याच्या रंगभूमीवरील यशापयशावर अवलंबून असतें हेंहि मला मान्य आहे. आणि इतके सगळे मान्य असूनही मी असेंच म्हणतो कीं, नाट्यकृतीचे वाङ्मयगुण ठरवतांना त्याचे प्रयोगयश लक्षांत घेण्याचे कारण नाहीं. उलट तसें करणें अनेकदां अनिष्टच ठरण्याचा संभव आहे.

मी असें आग्रहानें म्हणतो याचें मुख्य कारण नाटकाचें प्रयोगयश हें बहुतांशीं परिस्थितिवश असते. वेगवेगळ्या परिस्थि-तींत एकाच नाटकाचे प्रयोगयश हें कमीअधिक होऊं शकते— नव्हे तसें झाल्याची मी हवी तितकीं उदाहरणें देऊं शकेन. तेव्हां अशा चंचल कसोटीचा आधार घेऊन एखाद्या नाटकां-तील वाङ्मयगुणांचें मुल्यमापन करणें खचित वेडेपणाचें आहे. एखादें नाटक रंगभूमीवर खूप यशस्वी झालें असेल, पण वाङ्मयदृष्ट्या त्याचा दर्जा कनिष्ठ असूं शकेल; उलट वाङ्मय-मूल्यांच्या दृष्टीनें सरस असलेलें एखादें नाटक रंगभूमीवर तीन प्रयोगांच्या आंत ठार होऊं शकेल.

नाटक सदोष व गचाळ असूनहि त्याचा प्रयोग उत्तम बसून यशस्वी झाल्याची जशीं अनेक उदाहरणें आहेत, तद्वत नाटक रंगदार व चांगलें असूनहि त्याच्या प्रयोगाचे बारा वाजल्याचींहि अनेक उदाहरणें आहेत. फार काय पण एका नाटक मंडळीनें टाकून दिलेलें नाटक दुसऱ्या नाटक मंडळीनें आपला 'हातखंडा' यशस्वी खेळ केल्याची जशीं उदाहरणें आहेत, तशीच एका कंपनीच्या यशस्वी खेळानें दुसऱ्या नाटक मंडळीच्या रंगभूमीवर सपशेल मार खाल्ल्याचींहि उदाहरणें उनाप आहेत. एका विशिष्ट काळांत एखाद्या नाटकावर प्रेक्षकांच्या उड्या पडत असल्या-मुळें कालांतरानें त्याच नाटकाचें पुनर्जीवन करूं पाहणाऱ्या एखाद्याला रिकाम्या खुर्च्यांपुढें प्रयोग करण्याची पाळी आल्या-चींहि उदाहरणें मला माहीत आहेत.

नाटकाचे प्रयोगयश याप्रमाणें सर्वस्वी अनिश्चित, परिस्थितिवश व म्हणूनच बेभरंवशाचे आहे. अशा अनिश्चित कसोटीवर नाटकाचा वाङ्मयीन बरेंवाईटपणा ठरवणें मूर्खपणाचें आहे. नाट्यप्रयोगाच्या यशापयशानें नाटकांतील वाङ्मयगुणावर बरा-वाईट परिणाम होण्याचें काय कारण ? यशस्वी नाटक हें वाङ्मयगुणांच्या बाबतींत चांगलें नाटक असतेंच असें नाहीं, त्याप्रमाणेंच चांगलें नाटक नेहमींच रंगभूमीवर यशस्वी होतें असेंहि नाही.

नाटकाचीं वाङ्मयीन मूल्यें व प्रायोगिक मूल्यें वेगवेगळीं असतात त्यांची गल्लत करण्यांत अर्थ नाहीं. कोणतेंही नाटक घेतलें कीं, त्याचें कांहीं तरी बरेवाईट वाङ्मयमूल्य असतें व तें परिस्थितीमुळें बदलूं शकत नाहीं. पण नाटकाच्या प्रयोग-मूल्याची गोष्ट तशी नाहीं. प्रयोगमूल्य हें बहुतांशीं परिस्थितिवश आहे. त्यामुळें परिस्थितींत फरक झाला कीं, रंगभूमीवरील त्या त्या नाटकाच्या लोकप्रियतेंत चढउतार होतो.

आतां नाटक म्हटलें कीं, संवाद पाठ करणारीं चार पात्रें जमवून तें केव्हांही रंगभूमीवर करतां येईल हें खरें; पण म्हणून त्या नाटकाचे प्रयोग लोकप्रिय किंवा यशस्वी होतील असें मुळींच नाहीं. कांहीं नाटकें हीं निव्वळ वाङ्मयदृष्ट्याच लिहिलेलीं असतात. कुणा सधन माणसानें नुकसान सोसण्याची तयारी दाखवल्यास अशा नाटकांचे कांहीं प्रयोग रंगभूमीवर होऊं शकतील ! पण अशा नाटकांची योग्यता मापली जाईल ती त्यांच्या रंगभूमीवरील यशापयशाच्या फूटपट्टीनें नव्हे, तर वाङ्मयगुणांच्या दृष्टीनेंच. रंगभूमीवर ज्याचा प्रयोग मुळांत करतांच येणार नाहीं असें 'नाटक' अगदीं विरळा. पण एखाद्या नाटकाचा प्रयोग रंगभूमीवर झाला म्हणून कांहीं तें नाटक वाङ्मयांत दाखल होण्यास तेवढ्याच कारणासाठीं लायक ठरणार नाहीं. कै. अच्युतराव कोल्हटकरांनी मध्यंतरी एक नाटक मंडळी काढली होती ( मध्यंतरी कांहीं काळ मराठींत अनेक साहित्यिकांनीं स्वत:चें लिखाण मुक्ततेनें छापून यावें म्हणून स्वत:चेंच वर्तमान-पत्र काढण्याचा सपाटा लागला होता. हल्लीं प्रत्येक नाटककार स्वत:च्या मालकीची नाटक मंडळी स्थापन

करीत आहे. श्री. रांगणेकर, श्री. ह. वि. देसाई, प्रो. फडके, श्री. शामराव ओक प्रभृति साहित्यिक स्वतःच "नाटककार व प्रयोगीहि" बनले आहेत. पण आजच्या या लोकप्रिय—खरें बोलावयाचें म्हणजे लेखकप्रिय फॅशनचे आद्य प्रवर्तक कै. अच्युतराव कोल्हटकर हेच ठरतात. त्यांच्या मागून त्यांचें पट्ट-शिष्य श्री. अनंतराव गद्रे यांनीं ही फॅशन दृढमूल करण्याचा मान मिळवला आहे. जुन्या काळच्या खर्णांच्या चोळ्या आजकाल फॅशन म्हणून पुन्हा रूढ होत आहेत, तद्वत अच्युतराव–अनंतराव या गुरुशिष्याच्या त्या जुन्या फॅशनचें आजचे नाटककार प्रयोगी साहित्यिक पुनरुज्जीवन करीत आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं. या नाटक मंडळीनें "तिनें काय सांगितलें ?" या नांवाचें एक नाटक केलेलें मी लहानपणी कोल्हापुरास पाहिल्याचें आठवतें. अच्युतरावसारख्या खंद्या व लोकप्रिय लेखकानें लिहिलेलें व प्रयोगिलेलें (स्वतः अच्युतराव त्यांत एक लहानशी भूमिका करीत असत!) नाटक असूनहि त्याला काडीचेंहि वाङ्मयमूल्य नव्हतें व बहुधा त्यामुळेंच तें अजब नाटक पुस्तकरूपानें वाङ्मयांत प्रवेश करूं शकलें नाहीं असा माझा तर्क आहे. आणि जरी अच्युतरावांनीं तें नाटक पुस्तक रूपानें प्रसिद्ध केलें असतें तरीहि त्याचें नशीब त्यांच्याच 'विवेकानंद' या दुसऱ्या नाट्यग्रंथाहून वेगळें झालें नसतें अशी माझी खात्री आहे.

अच्युतरावापेक्षांहि भारताचार्य चिंतामणराव वैद्य यांचें या बाबतींतील उदाहरण नमूद करण्यासारखें आहे. चिंतामणराव वैद्य हे भारताचार्य व विद्वान प्राच्येतिहास संशोधक म्हणून अतिशय प्रसिद्ध आहेत. त्यांनीं "दुर्दैवी रंगू" म्हणून लिहिलेली कादंबरी मराठी वाङ्मयाचें एक कायमचें भूषण बनून राहिलेली आहे. पण वैद्यांनीं एक नाटक लिहिलें आहे याची खबर मात्र फार थोड्यांना असेल! पृथ्वीराज–संयोगिता या ऐतिहासिक कथानकावर त्यांनीं एक नाटक लिहिलें, एवढेंच नव्हे तर त्याचे एकदोन प्रयोगहि मुंबईंत करवले. या प्रयोगाच्या वेळची एक गोष्ट अशी सांगतात कीं, प्रथम प्रयोगाला नाटककार या नात्यानें चिंतामणराव हजर होते. एकदोन अंकानंतरच स्वतः चिंतामणराव शेजारच्या थिएटरांत दुसऱ्या एका नाटक मंडळीचें नाटक चाललें होतें तेथें जाऊन नाटक संपेपर्यंत तेथेंच बसले! खुद्द नाटककाराचीच ही अवस्था तेथें इतरेजनांविषयीं काय बोलावें?

हीं उदाहरणें मी अशासाठीं दिलीं कीं, कोणीं खनपटीस बसला तर कसल्याहि संवादात्मक प्रकरणाचा प्रयोग "नाटक" म्हणून तो रंगभूमीवर लादूं शकेल. त्यासाठीं नाटकांत कांहीं 'वाङ्मयगुण' असलेच पाहिजेत असें नाहीं. फक्त पैसा, वेळ आणि श्रम फुकट दवडण्याची तयारी असली म्हणजे झालें! ही तयारी असल्यामुळें कै. लोंढे यांनीं राजाराम संगीत मंडळीच्या रंगभूमीवर मध्यंतरी "दाराआड" नाटकाचे कांहीं प्रयोग केले. आणखी कोणाची अशी तयारी असेल तर तो वा. म. जोशी यांचे "विस्तवाशीं खेळ" किंवा श्री. वा. कृ. भावे यांचें "प्रीतिवाह" या नाटकांचेहि प्रयोग रंगभूमीवर करूं शकेल. पण त्यामुळें त्या नाटकांचें वाङ्मयमूल्य आज आहे त्याहून तें वेगळें कसें होऊं शकेल?

रंगभूमीवर येऊन कमी अधिक यशस्वी ठरलेल्या नाटकांचा विचार केला तरीहि नाटकाच्या वाङ्मयगुणाचा आणि प्रयोग-यशाचा कांहीं मेळ बसूं शकत नाहीं असेंच सिद्ध होतें आणि तेंच बरोबरहि आहे. कारण नाटकाचें वाङ्मयमूल्य ही शाश्वत बाब आहे, पण नाटकाचें प्रयोगयश हें तात्कालीक परिस्थितीवर अवलंबून असणारी गोष्ट आहे. नाटकाचें वाङ्मयमूल्य हें स्वयंसिद्ध असलें, तर त्याच्या प्रयोगाचे यशापयश परावलंबी असतें. नाटकाचें वाङ्मयमूल्य नाटककारानें केलेली नाट्यविषयाची निवड आणि मांडणी, यथार्थ व्यक्तिदर्शन, रसपरिपोष, नाट्यानुकूल संवाद, समरप्रसंग आणि तंत्र यांतील योजनाचातुर्य या सारख्या गोष्टींवर अवलंबून असतें तर नाटकाच्या प्रयोगाचे यशापयश तें नाटक बसवणारी नाटक मंडळी, तिचा दर्जा, नटांचें कौशल्य व लौकिक, रंगभूमीची सजावट, संगीताची योजना, तिकीटाचे दर व नाटकांच्या वेळा, हिंवाळा पावसाळा-उन्हाळा या सारखें ऋतुमान, ठिकठिकाणच्या प्रेक्षकांची अभिरुचि वगैरे अनेक अनुषंगिक बाबींवर अवलंबून असतें. या

त्याच्या गोष्टींचा नाटकाच्या वाङ्मयगुणाशीं काडीमात्रही संबंध नसतो.

नाटकाचे वाङमयगुण व प्रयोगयश यांच्यांत पुष्कळदा कशी तफावत पडते या दृष्टीनें श्री. कृ. कोल्हाटकरांचीं नाटकें उदाहरणादाखल घेतलीं असता माझा मुद्दा विशद होईल. कोल्हटकरांनीं मराठी रंगभूमीवर स्वतंत्र कथानकाचीं नाटकें आणून, अभिजात विनोदाचा साज रंगभूमीला अर्पण करून, व तत्कालिन मराठी रंगभूमीवरील संगीताला फारशी चालींत गायला लावून एक प्रकारची क्रांति केली होती. व या नवीनपणाचें कौतुक जोंवर कायम राहिलें तोंवरच कोल्हाटकरांच्या नाटकांनीं रंगभूमीवर जीव जगवला. हें कौतुक ओसरतांच कोल्हटकरांचीं नाटकें एकदम बासनांत गुंडाळलीं गेलीं व त्यांच्या पुनरुज्जीवनाचे जेवढे म्हणून प्रयत्न झाले त्यापैकीं फक्त एकच प्रयत्न थोडासा यशस्वी झाला. कोल्हटकरांचीं जीं नाटकें रंगभूमीवर आलीं तीं किर्लोस्कर, गंधर्व, भारत, बलवंत अशासारख्या तेव्हांच्या महाराष्ट्रांतील अग्रगण्य नाटक मंडळ्यांच्या रंगभूमीवर आलीं होतीं. भाऊराव कोल्हटकर, नानासाहेब जोगळेकर, बालगंधर्व, दीनानाथ, अप्पा टिपणीस या सारख्या अत्यंत लोकप्रिय नटांनीं कोल्हटकरांच्या नाटकांत कामें केलीं. तरीहि त्यांच्या नाटकांपैकीं वधूपरीक्षा व मूकनायक या नाटकांखेरीज इतर नाटकांना म्हणण्यासारखें यश रंगभूमीवर लाभलें नाहीं.

कोल्हटकरांच्या प्रेमशोधन आणि मतिविकार या दोन नाटकांचें प्रयोगयश लक्षांत घेऊन कोणी त्यांचें वाङ्मयमूल्य ठरवील असें मला वाटत नाहीं. निवळ वाङ्मयाच्या दृष्टीनें पाहिलें तर आजही हीं दोन्हीं नाटकें सरस वाटतील. पण त्यांचे प्रयोग मात्र रंगभूमीवर—अव्वल दर्जाची नाटक मंडळी व लोकप्रिय नटसंच यांचे सहाय्य असूनहि—कधीं यशस्वी झाले नाहींत. प्रेमशोधन नाटकाचें पुनरुज्जीवन करण्याचा अलीकडे कै. बापूराव पेंढारकरांनीं ललितकलादर्शच्या रंगभूमीवर प्रयत्न केला होता. पण तो सपशेल फसला. मतिविकार नाटकाचें पुनरुज्जीवन करण्याचें कोणी कधीं मनांत आणील असें मला वाटत नाहीं. कोल्हटकरांच्या नाटकांत आज देखील वाखाणता येतील असे वाङ्मयगुण असतां, त्यांची रंगभूमीवर अशी परवड कां झाली याची कोल्हटकरांचे अभिमानी कांहीं कारणें सांगतात. तीं खरी असोत कीं खोटी असोत, तो प्रस्तुत मुद्दा नाहीं.

मला सांगायचें आहे तें हेंच कीं नाटक वाङ्मयदृष्ट्या चांगलें असले तरी तें चांगल्या चांगल्या नाटक मंडळ्यांच्या रंगभूमीवर देखील अयशस्वी ठरूं शकतें. याच्या उलट वाङ्मयदृष्ट्या अगदी सामान्य योग्यतेचीं नाटकें दुय्यम तिय्यम दर्जाच्या नाटक मंडळ्यांनीं रंगभूमीवर आणून अतोनात यशस्वी करून दाखविल्याचींहि उदाहरणें आहेत. श्री. शुक्ल,











कै. दीक्षि[illegible] यांच्या सुदर्शन या एकाच नाटकानें एका काळीं महा[illegible]ंत [illegible]ळविलेली लोकप्रियता (कोल्हटकरांच्या सगळ्या [illegible]टकांना मिळू[illegible] देखील कधीं मिळवतां आली नाहीं!) फाटकशास्त्री यांचीं नाटकें वाङ्मयदृष्ट्या काय योग्यतेचीं आहेत हें निराळें सांगणें नकोच. पण त्यांनीं रंगभूमीवर प्रयोगदृष्ट्या मिळवलेलें यश इतकें झगझगीत आहे कीं, तें नाकारणारा इसम आंधळाच असला पाहिजे. कोल्हटकरांचें एकही नाटक आज महाराष्ट्रांत प्रयोगरूपानें जीवंत नाहीं. पण फाटकशास्त्री यांची माझी जमीन, पंतांची सून यासारखीं नाटकें अद्याप महाराष्ट्रांत अनेक ठिकाणीं प्रयोगाला पैसा पुरवीत आहेत.

नाटकाचें रंगभूमीवरील यशापयश हें त्याच्या वाङ्मयगुणापेक्षांहि परिस्थितीवर जास्त अवलंबून आहे या बाबतींत श्री. खाडीलकरांच्या 'कांचनगडची मोहना' या ऐतिहासिक नाटकाचें उदाहरण नमूद करण्यासारखें आहे. गणपतराव जोश्यासारख्या नटश्रेष्ठानें हें नाटक आपल्या शाहू नगरवासी नाटक मंडळीच्या रंगभूमीवर आणून कांहीं प्रयोग करून फेंकून दिलें होतें. तेंच नाटक महाराष्ट्र नाटक मंडळीसारख्या अगदीं नव्या मंडळीनें हातीं घेऊन आपलें "हातखंडा" नाटक म्हणून यशस्वी करून दाखवलें. अशाच तऱ्हेचा अगदीं अलीकडचा प्रयोग आपल्या 'कन्यादान' नाटकाबाबत श्री. रांगणेकरांनीं करून दाखवला आहे. कन्यादान हें नाटक त्यांनीं मूळ आदर्श नाट्यालयासाठीं लिहिलें. नामवंत कलावंताच्या ताफ्यांत तें आदर्श नाट्यालयानें रंगभूमीवरहि आणलें पण तेव्हां सपशेल अयशस्वी झालेलें तेंच नाटक नवीन नटनटींच्या सहाय्यानें रांगणेकरांनीं आपल्या नाट्यनिकेतनच्या रंगभूमीवर पुनरुज्जीवित केलें व लोकप्रिय करूनहि दाखवलें. रंगभूमीवरील या यशापयशामुळें कांचनगडची मोहना किंवा कन्यादान यांच्या वाङ्मयीन गुणाचा पारा वरखालीं झाला काय ?

प्रयोगयशाची आणखीहि एक गंमत लक्षांत घेण्यासारखी आहे. एकदा अत्यंत लोकप्रिय म्हणून गाजलेलें नाटक कालांतरानें कोणी पुनरुज्जीवित केलें तर त्याला तसेंच यश मिळत नाहीं याचे मी कांहीं मासले देतों. श्री. मामा वरेरकरांचे सोन्याचा कळस हें नाटक ललितकलेच्या रंगभूमीवर तुफान यशस्वी ठरलें होतें, पण सुलोचना संगीत मंडळी व राजाराम संगीत मंडळी या दोन्ही कंपन्यांनीं त्याच्या पुनरुज्जीवनाचे केलेले प्रयत्न फसले. गद्य बायकांचे बंड जितकें यशस्वी झालें तेवढी देखील लोकप्रियता संगीत बायकांच्या बंडाला लाभली नाहीं. चंद्रग्रहण या अत्यंत लोकप्रिय नाटकाचें "नेकजात मराठा" हे संगीत पुनरुज्जीवन् मुळींच यशस्वी झालें नाहीं. कीचकवध नाटक रंगभूमीवर आलें तेव्हां त्यानें महाराष्ट्र हलवला पण त्यावरील बंदी उठून तें पुन्हा प्रयोगरूपानें पहावयास मिळालें, तेव्हां तुटून पडलेल्या ताऱ्याप्रमाणें निष्प्रभ ठरलें. गद्य त्राटिका गाजली तसें संगीत चौदावें रत्न गाजलें नाहीं. खडाष्टक नाटक महाराष्ट्र व समर्थ या दोन्हीं नाटक मंडळ्यांना गद्यस्वरूपांतहि पैसा देऊं शकेल. पण संगीताची मोहक झूल घालूनहि राजाराम संगीत मंडळीच्या रंगभूमीवर तें नीट उभेसुद्धां राहू शकलें नाहीं !

याच्या उलट प्रकारहि कांहीं नाटकांचा झाला आहे. फाल्गुनराव हें नाटक गणपतराव जोश्यांच्या रंगभूमीवरहि विसरलेलें एक नाटक, संगीताच्या सोबतीनें 'संशयकल्लोळां'त रूपांतर पावल्यापासून गेलीं तीस एक वर्षे मराठी रंगभूमीवरील सौभद्र, मृच्छकटिक, मानापमान या सारख्या मोजक्या कायम रंगदार नाटकांपैकीं एक होऊन राहिलें आहे. अप्पा टिपणीसांचें "राज्यारोहण" हें गद्य नाटक खुद्द त्यांच्या आर्यावर्त नाटक मंडळीच्या रंगभूमीवर 'बॅक बेंचर' ठरलें, त्याला संगीताची जोड देऊन ललितकलादर्शने "शिक्काकट्यारां"त त्याचें नामांतर करतांच तें चांगलेंच फलदायी ठरलें.

नाटकाचें रंगभूमीवरील यश असें चंचल व परिस्थितिवश आहे. पाश्चात्य पद्धतीचीं दोन तासी नाटकें मराठी रंगभूमीवर व्हावींत म्हणून श्री. वरेरकरांनीं मुद्दाम तुरुंगाच्या दारांत, सदा बंदिवान या सारख्या नाटिका लिहिल्या; पण तो प्रयोग तेव्हां नाटिकांच्या चांगुलपणाच्या अभावीं नव्हे तर परिस्थितीच्या अनुकूलतेच्या अभावीं, अयशस्वी ठरला. उलट बोलपटाच्या

सुरवातीस श्री. अनंतराव गद्रे यांनीं आपल्या नाटिका रंगभूमीवर दणदणून गाजवून दाखवल्या. वाङ्मयदृष्ट्या श्री. गद्रे यांच्या नवनाटिकारत्नहारापैकीं एकहि नाटिका श्री. वरेरकरांच्या तुरुंगाच्या दारांत या नाटिकेच्या बरोबरीला येणार नाहीं. तरीहि तुरुंगाच्या दारांत अयशस्वी ठरली–तिचें पतितपावन हें नामांतर करून पुनरुज्जीवन करण्याचा पेंढारकरांचा दुसरा प्रयत्नहि फसला. पण अनंतराव गद्रे यांच्या नाटिकांनीं मात्र एके काळीं मुंबई, महाराष्ट्र व नागपूर दणदणून सोडलें.

वाङ्मयदृष्ट्या उत्कृष्ट नाटक रंगभूमीवर यशस्वी होईलच याची नेहमींच खात्री नसते. आंधळ्याची शाळा हें 'भयंकर' गाजलेलें नाटक फक्त मुंबई-पुण्यांतच यशस्वी झालें; सोलापूरांतील प्रेक्षकांना नाटकांत आंधळे कोठें आहेत व त्यांची शाळा कोठें आहे, असे प्रश्न नाटक पाहून झाल्यावर विचारले असें श्री. काणेकरांनीं एका आठवणींत सांगितलें आहे. नाट्यमन्वतरानें रंगभूमीवर आणलेल्या सर्व नाटकांत "तक्षशीला" हें नाटक माझ्या मतें वाङ्मयदृष्ट्या उत्कृष्ट होतें–आहे. पण तें दहा प्रयोगांच्या आंत कोसळलें आणि त्या मानानें अतिशय भिकार व सदोष असलेलें 'उसना नवरा' नाटक अजून रंगभूमीवर कोठें कोठें सवड मिळेल तेव्हां डोकें काढीत आहे. श्री. वरेरकरांच्या सत्तेचे गुलाम ह्याणि सोन्याचा कळस या दोन्ही सदोष नाटकांनीं बापूराव पेंढारकरांना चांगला हात दिला, पण वरेरकरांचें वाङ्मयदृष्ट्या अतिशय श्रेष्ठ दर्जाचें असलेलें "कोरडी करामत" हें नाटक कोणीं रंगभूमीवर आणण्याचें देखील मनांत आणलें नाहीं—आणीत नाहीं. "सौभद्र" नाटक जुन्या टाकाऊ तंत्रानें लिहिलेलें म्हणून त्याला नाकें मुरडून नव्या तंत्राची हळद फांसून वरेरकरांनीं त्याच्या लावलेल्या "संन्याशाच्या लग्ना" चा कसा वाजा वाजला हें ताजचें आहे!

नाटकाचें प्रयोगयश आणि वाङ्मयगुण यांची सुबुद्ध माणसानें यासाठींच गल्लत करूं नये असें मी म्हणतों. नाटकाचा प्रयोग पुष्कळ वेळां अनेक फालतु कारणांनीं लोकप्रिय होऊन बसतो. भावबंधन हें गडकऱ्यांनीं लिहिले कोणत्या हेतूनें आणि तें रंगभूमीवर यशस्वी झालें कोणत्या कारणानें याचें स्मरण करा म्हणजे मी काय म्हणतों तें तुमच्या बरोबर ध्यानीं येईल. भावबंधनमधील धुंडीराजाची अद्वितीय, हृदयंगम भूमिका रंगभूमीवर बिनमहत्वाची ठरून कामण्णाच्या विनोदावर नाटकाचें रंगभूमीवरील जीवन अखेरपर्यंत अवलंबून राहिलें! वरेरकरांचें 'कुंजविहारी' नाटक वाङ्मयगुणापेक्षांहि गुजराती छापाच्या तेव्हां मराठी रंगभूमीवर नवीनच असलेल्या भपकेबाज भरजरी ड्रेपरीवरच गाजलें. राजापूरकर नाटक मंडळी व नाटककार शुक्ल यांच्या नाटकाच्या यशाचा मुख्य आधार त्यांतील ट्रन्सफर सीनची लयलूट हाच होता. "गोकुळचा चोर" या स्टेज टॉकीची महाराष्ट्रांतील लोकप्रियताही वाङ्मयगुणावर आधारलेली आहे, असें म्हणणारा इरसाल मूर्ख मला अद्याप भेटलेला नाहीं.

लोकांना आवडणारा, मानवणारा व रुचणारा विषय व विचार मांडणारीं नाटकें, वाङ्मयदृष्ट्या ढिसाळ असलीं तरी रंगभूमीवर यश मिळवून जातात. एके काळीं गाजलेलें "दं[illegible]" हें नेवाळकरांचें नाटक याचमुळें लोकप्रिय झालें. लो[illegible]ळक[illegible]या व्यक्तिदर्शनाचा प्रेक्षकांना त्या नाटकांत आभास झाल्यामुळें "दंडधारी" नें एकदां धमाल उडवून दिली होती. याच्या उलट यशवंत संगीत मंडळीनें बसवलेल्या "पुनरा[illegible]न" या नाटकांत प्रत्यक्ष टिळक मूर्तिमंत रंगभूमीवर आणण्यांत आले होते तरीहि त्या नाटकाचे पुण्यांत पांच प्रयोगहि झाल्याचें मला आठवत नाहीं! सुदर्शन, राणा भीमदेव, राक्षसी महत्त्वाकांक्षा, रणदुंदुभि, कुलवधू या सारख्या नाटकांनीं वेळोवेळीं मिळविलेली लोकप्रियता वाङ्मयगुणापेक्षांहि तत्कालीन लोकाभिरुचीचीच निदर्शक आहे.

लोकांना न आवडणारा विषय नाटकांत मांडण्यांत आल्यास त्याला आश्रय देण्यास जनतेची तयारी नसते. मग तें नाटक कितीहि चांगलें लिहिलेलें असो कीं, तो नाटककार कितीहि नामवंत असो. कोल्हटकरांचें मतिविकार, खाडीलकरांचें सवाई माधवरावाचा मृत्यू, वरेरकरांचें पतितपावन व सारस्वत, भोळे यांचें सरलादेवी, किंवा रांगणेकरांचें नंदनवन हीं नाटकें वाङ्मय दृष्ट्या सरस असूनहि प्रयोगदृष्ट्या नाकामी ठरलीं याचें मुख्य कारण प्रेक्षकांच्या प्रकृतीला पेलण्यासारखीं तीं नव्हतीं हें होय. एक पति जीवंत असतां दुसरा पति करूं पहाणाऱ्या बंडखोर स्त्रीचा प्रश्न श्री. रांगणेकरांनीं 'नंदनवनांत' गांभिर्यानें मांडलेला लोकांना मानवला नाहीं, पण त्याच्याहि पुढें जाऊन एकाच वेळीं प्रत्यक्षपणें दोन नवरे करणाऱ्या स्त्रीनें त्या दोघांहि नवऱ्यांची 'आई' होऊन राहण्याचें ठरविलें असें श्री. ह. वि. देसाई यांनीं "अर्ध्या वाटेवर" नाटकांत दाखवतांच, तें नाटक मात्र यशस्वी झालें.

या सर्व विवेचनावरून नाटकाचें प्रयोगयश आणि वाङ्मय-मूल्य यांचा अर्थाअर्थी कांहीं संबंध नाहीं असें मी कां म्हणतों तें तुमच्या लक्षांत आलेंच असेल. आतां कांहीं नाटकें अशींहि असतात कीं, तीं वाङ्मयदृष्ट्या जशीं हृदयंगम असतात तशींच रंगभूमीवरहि यशस्वी ठरतात. पण तेवढ्यावरून प्रयोगयश हें वाङ्मयगुणाचें निदर्शक ठरत नाहीं. उलट प्रयोगयश पदरीं पडावें म्हणून पुष्कळदा नाटककाराला आपल्या नाटकांत स्वतःच्या हातानें घोडचुका घुसडाव्या लागतात. कोल्हटकरांना वीरतनय नाटकाचा आपला पहिला दुःखान्त शेवट बदलून अनैसर्गिक आनंदकारक अखेर करावी लागली ती या पायींच गडकऱ्यांनी आपल्या प्रेमसंन्यास नाटकाच्या शेवटीं मृत्यूला रंगभूमीचा कबजा दिला तो यासाठींच. स्वयंवर नाटकापासून खाडीलकरांनीं आपलीं नाटकें फक्त नायिकेला प्राधान्य देऊनच लिहिलीं तीं याचमुळें आणि वरेरकरांनीं पेंढारकरांच्या प्रकृतीला झेपणारे नायक निर्माण करण्याची कसरत प्रत्येक नाटकांत केली तीहि या कारणानेंच. हीं उदाहरणें पाहिलीं कीं, तुम्हीहि कबूल कराल कीं, नाटकाचें प्रयोगयश हें त्याच्या वाङ्मयगुणाला पोषक होण्यापेक्षां त्याची गळचेपीही करण्यालाच फार वेळा कारण होतें. मग अशा मादक मोजमापानें नाट्यकृतींचे वाङ्मयगुण मापीत बसणें सर्वथा चुकीचेंच नाही कां ठरणार?

अनुक्रमणिका

परमेश्वरानें जग निर्माण केलें; त्यांत राहण्यासाठीं माणसांची उत्पत्ति केली आणि त्या माणसांना जीविताचं आकर्षण वाटावं म्हणून सुखदु:खाची योजना केली. त्याला वाटलें कीं सुख-दु:खाच्या छायाप्रकाशांत प्रत्येक जण रमून जाईल !

पण थोड्याच कालाविधींत त्याला वेगळा अनुभव आला !

माणूस स्वत:च्या दु:खाला कंटाळला. दुसऱ्याचें सुख त्याला विलोभनीय वाटूं लागलें. आपल्या वाट्याला सुखापेक्षां दु:खच अधिक आल्याची त्याची समजूत झालीं. आणि फुरंगुटून तो म्हणूं लागला—

" सुखदु:खाच्या वाटणींत परमेश्वरानें जाणून बुजून विषमता केली आहे खास ! "

वैयक्तिक तक्रारीनें सामुदायिक गाऱ्हाण्याचें स्वरूप धारण केलें.

परमेश्वरानें कांहीं काळ दुर्लक्ष केलें पण सर्वांचेच चेहरे उदासीन दिसूं लागले तेव्हां त्यालाही राहवलें नाहीं.

सर्व माणसांना त्यानें एका मोठ्या पटांगणांत बोलावलें व सांगितलें—

" प्रत्येकानें स्वत:च्या सुखदु:खांचे, आशानिराशांचे व भल्या-बुऱ्या मनोधर्मांचे गाठोडे बांधून आपल्या पुढें आणून टाकावें. "

प्राप्त परिस्थितीला सर्वच त्रासून गेले होते. जितक्या व्यक्ती तितकीं गाठोडीं गोळा झालीं. प्रत्येकाला हायसें वाटलें !

अधिऱ्या अंत:करणानें आणि कुतुहलपूर्ण दृष्टीनें सर्वांनीं परमेश्वराकडे पाहिलें.

परमेश्वरानें उपाय सुचविला.

" हवें त्याचें गाठोडें हवें त्यानें घेऊन जावें. "

याहून अधिक उल्हासदायक गोष्ट कोणती असणार ? सर्वच आनंदानें धावले.

इतके दिवस मनीषा बाळगलेली दुसऱ्यांचीं गाठोडीं प्रत्येकानें सूक्ष्मपणें निरखून पाहिलीं. त्यातील सुखदु:खांची, स्वभावधर्मांची कसोशीनें तुलना केली.

आणि थोड्याच वेळांत प्रत्येकजण स्वत:चेंच गाठोडें घेऊन आनंदानें परत गेला.

तेथें माणूसही राहिला नाहीं व गाठोडेंही राहिलें नाहीं.

परमेश्वरानें केवळ स्मित केलें !



चालू दिवाळी आण

नूतन वर्ष—

आमच्या हजारों रसिकांना,
चाहत्यांना आणि ग्राहकांना
सुखाचें आणि समृद्धीचें जावो !

लाइन, हाफटोन आणि कलर ब्लॉक्स
यासाठीं गेलीं अनेक वर्षें सुप्रसिद्ध

**प्रभात प्रोसेस स्टुडिओ**

— आणि —

**शंकर अँड कंपनी**

धोबीवाडी, ठाकुरद्वार रोड, मुंबई.



छायाचित्र – डब्ल्यू. एन्. भट,
A. R. P. S.




......स्नान






संध्या......

छायाचित्र – डब्ल्यू. एन्. भट,
A. R. P. S.





अनुक्रमणिका










# कालिंदीची कहाणी

चिं. वि. जोशी

**•• वाचक हो! योगिनीच्या कृपेने [illegible] गोळ्यांच्या आणि लेपाच्या सेवनानें मी जशी कालिंदीची गौरी होऊन पतीचें प्रेम संपादन केलें तसें तुम्हांला पतीचें किंवा पत्नीचें प्रेम काबीज करतां येणार नाहीं काय.?**

प्रिय वाचक हो ! ह्या तुमच्या एका काळीं कपाळकरंट्या ठरलेल्या पण आतां मुलें, सुना, जावई आणि नातवंडे ह्यांनीं गजबजलेल्या वाड्यांत पतीसह आनंदानें कालक्रमणा करणाऱ्या तुमच्या भगिनीची कहाणी ऐका आणि जर तुम्हीं माझ्या सारख्या दुःखानें पोळलेल्या असाल तर माझें अनुकरण करून सुखी व्हा. ही माझी कहाणी माझ्या असंख्य भगिनींना सांगून त्यांस दुःखमुक्त करीन असें त्या प्रबल योगिनीला वचन दिल्या-मुळेंच जाहिरातींचा अफाट खर्च करून मी आपली गोष्ट जगापुढें मांडीत आहें.

माझा जन्म सहारानपुर जिल्ह्यांतील धूपछाव गावांत श्रीमंत आईबापांच्या पोटीं झाला. मी आईबापांची एकुलती मुलगी व एकटेंच मूल असल्यानें त्यांनीं मोठा खर्च करून अंबाला जिल्ह्यांतील नबाबपुरा येथील एका खानदानीच्या पण गरीब वराशीं माझा विवाह करून दिला. माझ्या दुर्दैवानें माझ्या लग्नानंतर सहा महिन्यांत माझे आईबाप मृत्युमुखी पडले. माझी सर्व संपत्ति पतीनें ताब्यांत घेतली. उशिरा संपत्ति मिळालेल्या इतर तरुणां प्रमाणें माझ्या पतीस अनेक व्यसनांनीं गुरफटलें.. प्रथम प्रथम शेजारी पाजारी आणि नोकरचाकर यांच्याकडून माझ्या कानीं हे प्रकार येऊं लागले पण मला ते खोटें वाटले. पुढें आमचा मुनीम देवचंद म्हणाला, " बाईसाहेब माझं म्हणणं खोटं वाटत असेल तर चला आत्तांच्या आत्तां माझ्या बरोबर. शेठसाहेब कोणत्या थराला पोंचलें आहेत तें मी तुम्हांला प्रत्यक्ष दाखवितो. "

तत्काळ मीं ड्रायव्हरला मोटार जोडण्यास सांगितलें आणि देवचंदाला बरोबर घेऊन मी अंबालाशहरच्या बाजार पेठेंत जाऊन एका उंच इमारती पुढें हजर झाल्यें. देवचंद म्हाणाला " बाई-साहेब, गुलाबकळी नांवाच्या नायिकिणीचं ( त्यानें अस्सल हिंदुस्थानी शब्द वापरला होता पण तो येथें देणें मला प्रशस्त वाटत नाहीं. ) हें घर आहे. वरतीं नाचरंग चालला आहे. तुमच्या सारख्या पडदानशीन बाईनं वरती जाणं बरोबर नाहीं. आपणच हॉर्न वाजवून शेठसाहेबांना खालीं बोलावूं. "

ड्रायव्हरनें हॉर्न वाजविल्यावर माझे पति खालीं आलें त्यांच्या मागोमाग ती मेली गुलाबकळी पण नाचत मुरडत आली. पतीस झिंगलेल्या अवस्थेंत पाहून मी दचकल्यें. त्यांनीं विचारिलें " काय ग, माझा पाठलाग करीत तुला इथं कोणी आणलं ? " मी त्यांचा हात धरून म्हणाल्यें, " नाथ, घरीं चला. ह्या अवदसेच्या नादीं लागूं नका. " पतींनं माझ्या हाताला हिसडा दिला आणि तिरस्कारानें म्हटलें, " जा काळुंद्रे, तूं कोळशांतलं माणिक आहेस म्हणून मीं तुला पत्करलें नाहीं. तुझ्या बापाच्या पैशाकडे पाहून मी तुला माझी बायको केली. ही प्यारी गुलाबकळी पहा तिच्या शरीराची कांति पहा तिचे गुलाबी कोल्ड्रींकसारखें नाजूक हात पहा, विलायती दारूपेक्षां लाल असलेले गाल पहा. आणखी स्वतःचं रूप आरशांत पहा. गुलाबकळीची तस्त धुणारी मोलकरीण देखील गोरी आहे! अन् तूं पंजाबी म्हशीला लाजवशील इतकी काळी आहेस; मी तुझ्या अंगाला स्पर्श देखील करायला तयार नाहीं. तुला वाटलं तर ह्या देवचंदा-बरोबर संसार कर. ह्य ! ह्य ! ह्य ! "

चे हृदयाला घरे पाडणारे शब्द बोलून माझे ...त्यांच्या खांद्यावर हात टाकून माडीवर निघून मीं निर... अंतःकरणानें घर सोडलें. ज्या ठिकाणीं पतीला आपली किंमत ... अशा घरांत राहाण्यांत काय अर्थ होता?

भिक्षा मागत मागत मीं हिमालयाच्या निरनिराळ्या भागांतून प्रवास करूं लागलों. कोळशासारख्या आपल्या काळ्याकुट्ट हातापायांकडे पाहून माझी मलाच किळस येऊं लागली. आणि जेव्हां एकाद्या हिमनदींत मी डोकावून पाहीं तेव्हां वानराच्या-सारखें आपलें काळेकुळकुळींत तोंड पाहून माझी मलाच लाज वाटे. मानस सरोवरांतील दुग्धधवल हंस माझ्या कृष्णवर्ण देहाचें बुजगावणें पहातांच कल कल करीत उडून जात. मी ह्या 'कल' शब्दाचा अर्थ 'उद्यां' असा करून "उद्यां तूं आमच्या सारखी गौरवर्ण होशील असा त्यांचा आशीर्वाद समजें, पण तो उद्यांचा दिवस उगवेना. शेवटीं एका उंच कड्यावरून आपला तिरस्करणीय देह ढकलून देण्याच्या निश्च-यानें मीं एका शिखराच्या कडेला जाऊन उभी राहिल्यें. तेथून खालचा भूमिभाग दिसत देखील नव्हता. ओढणी कंबरेस बांधून केस घट्ट करून मीं डोळे मिटले' आणि उडी घेतली. निमिषार्धानें डोळे उघडून पाहात्यें तो मला एका तेजःपुंज आणि कांतिमान् देवतेनें हातावर झेलून घेतलें आहे असें दिसलें. तिनें मला भुईवर उभें केलें. त्या देवतेचा वर्ण चंद्राला, चाफे-कळीला, गुलाबाच्या पाकळ्यांना आणि निर्मेळ दुधाला लाज-विणारा होता. मीं मोठ्या भक्तीनें तिच्यापुढें प्रणिपात केला मला उठवीत ती म्हणाली ! "बेटी, माझ्यापुढें नमस्कार घालूं नको, मी देवी नाहीं, तुझ्यासारखीच एक मनुष्य आहे; पण अबला मात्र नाहीं. ह्या देहाला प्रबलयोगिनी म्हणतात. बेटा, ज्या दुःखानं तूं जिवावर उदार झाली आहेस तें तुझं दुःख अंत-र्ज्ञानानें मला कळलं आहे. तुझ्या शरीराचा वर्ण बदलून गोरा वर्ण येण्याची तुझी इच्छा मी पूर्ण करीन मग तूं आपल्या पतीकडे परत जा"

प्रबल योगिनीचे शब्द ऐकून मला किती आनंद वाटला असेल त्याची कल्पनाच केलेली बरी. मी तिच्या पवित्र आश्र-मांतील फुलें सकाळीं खुडावीं, गाईचें दूध काढावें, येणाऱ्या जाणाऱ्या महात्म्यांची सेवा करावी, अलकनंदेच्या पवित्र प्रवा-हांत स्नान करावें अशा उच्च आयुष्यक्रमापुढें पंजाबातल्या क्षुद्र संसाराची आठवणहि राहिली नाहीं. नित्य सकाळीं मध्यान्हीं आणि सायंकाळीं योगिनीनें दिलेल्या गोळ्यांतील एकेक गोळी गायीच्या दुधाबरोबर मी सेवन करीत असें. त्याच प्रमाणें तिनें दिलेला सुवर्णलेप देहाला चोपडून दोन घटकांनीं स्नान करीत असें. या दिव्य औषधाच्या सेवनानें माझा कोळशासारखा अस-लेले देह कांहीं दिवसांनीं दगडाच्या वर्णासारखा ईषत् कृष्ण झाला. नंतर नंतर तो तपकिरी रंगावर जाऊन अनुक्रमानें त्यानें हळद, सोनें, सोनचाफा, आणि गुलाबपुष्प यांची कांति धारण केली. रंगवलेल्या युरोपियन तरुणींच्या शरीर कांतीपेक्षां माझी स्वाभाविक कांति अधिक तेजोमय झाली.

"बेटा, आतां तुझं दुःख हरण झालं आहे. तूं आपल्या घरीं आतां परत जा. मनुष्य वस्तीपर्यंत पोंचवायला माझा शिष्य तुझ्याबरोबर येईल" योगिनी म्हणाली.

मला रडूं कोसळलें. "माई, ह्या पवित्र स्वर्गांतून संसाराच्या नरकांत मला कां लोटतेस ? मी आतां जन्मभर या तपोवनांतच राहीन, त्या व्यसनाधीन पतीची चाकरी करण्यापेक्षां तुझीच सेवा करीत रहावें अशी माझी इच्छा आहे, " मी म्हणाल्यें.

प्रबल योगिनीनें पतीची सेवा हीच स्त्रीजन्माची सार्थकता आहे असें बजावल्यावर पुष्कळ वादविवाद झाल्यावर मी पंजाबांत परत जाण्यास आणि पतीबरोबर संसार करण्यास कबूल झाल्यें. मात्र माझ्या सारख्या दुसऱ्या ज्या अभागिनी काळ्या भगिनी असतील त्यांचें दुःख निवारण करण्यासाठीं योगिनीनें मला दिलेल्या गोळ्या आणि लेप यांची कृति तिनें मला सांगावी असा हट्ट मीं धरिला. योगिनी म्हणाली, "बेटी, तुला माहीतच असेल कीं पार्वती प्रथम काळी होती. शंकर तिला नेहमीं 'काली काली' अशी हाक मारायचे. तिला वाईट वाटलं. तिनं ह्याच आश्रमांत येऊन तपश्चर्या केली आणखी गोरा रंग संपादन केला. नंतर शंकर तिला 'गौरी' म्हणूं लागले. पार्वतीनं ही



गोळ्यांची अन् लेपाची कृति शोधून काढली. मला तिच्या-कडूनच ही समजली. आतां तुला मी देत आहे. या कृतीवर एका गवताच्या काडीइतकी किफायत जरी तूं मिळवलीस तरी तुझा वर्ण नष्ट होईल इतकंच नाहीं तर ही कृति तूं विसरून जाशील. शक्य तितक्या अधिक बायकांना ह्या कृतीचा लाभ मिळावा म्हणून तूं काय करशील ?"

"वर्तमानपत्रांत जाहिराती देऊन ह्या दिव्य औषधींचा प्रचार करीन. माते, मात्र जाहिरातीच्या खर्चापुरते पैसे लोकां-कडून घेण्याची अनुज्ञा तूं दिली पाहिजेस,—" मीं विनंती केली.

"ठीक आहे, बेटी. जाहिराती टपालखर्च अन् औषधी द्रव्यांची मूळ किंमत एवढयापुरते पैसे घ्यायला हरकत नाहीं. जा बेटा माझी समाधीची वेळ झाली आहे. बेटा शारंगधर !" आपल्या एका शिष्याला हाक मारीत ती म्हणाली, "ह्या तुझ्या ताईला रक्सौल स्टेशनापर्यंत नेऊन पोचीव. तेथून ती आग-गाडीनं पंजाबांत परत जाईल. तूं परत येतांना सुईदोरा अन् अंगारडब्ब्या घेऊन ये."

प्रबल योगिनीचा निरोप घेऊन शारंगधराबरोबर मी रक्सौ-लला आल्यें. तेथें येतांच देशरिवाजाप्रमाणें घुंगट धारण करणें मला भाग पडलें. पण उजळ तोंडानें जोंपर्यंत मी फिरत होत्यें तोंपर्यंत माझ्या मुखाकडे पाहून लोक थक्क होत इतकी मी आतां सुंदर दिसूं लागल्यें होत्यें. माझे नाकडोळे मूळचे रेखीव असले तरी ते काळ्या डांबरांत बुडाल्यामुळें खुलून येत नव्हते. आतां गौरवर्णामुळें त्यांची खुलावट झाली होती. शारंगधरानें नवाबपुऱ्याचें तिकीट माझ्या हातीं देऊन माझा निरोप घेतला. दुसऱ्या दिवशीं नवाबपुऱ्यास पोंचल्यावर मी आपल्या घरीं म्हणून गेल्यें. गांवांत कोणीही मला ओळखलें नाहीं इतका माझ्या स्वरूपांत फरक पडला होता. मी घरांत पहात्यें तों अगदीं निराळीं माणसें तेथें दिसत होतीं. त्यांना मीं विचारिलें, "कालिंदीनाथाचं हेंच घर ना ?" त्यांनीं मला सांगितलें, "कालिंदीनाथानं हें घर विकलं आहे. लाहोरच्या त्रैलोक्यनाथ कपूरनीं हें विकत घेतलं आहे. कालिंदीनाथ तिकडे अंबाल्याला गुलाबकळीच्या वाड्यांत कुलंग्या कुत्र्यासारखे पडून असतात."

लगेच मी अंबाल्याला गेल्यें. गुलाबकळीच्या घराजवळ पोंच-ल्यावर घराभोंवतीं गर्दी जमलेली मला दिसली. लोक "हुर्यो हुर्यो, बरी झाली बेशरम कुत्र्याची फजिती !" अशा अर्थाच्या पण अत्यंत अचकट विचकट आरोळ्या ठोकीत होते. मी जवळ जाऊन पाहिलें तर माझे पती एका धोतरानिशीं रस्त्यांत छुकांडया खात होते. एक फाटका गंजीफ्राक त्यांच्या खांद्यावर लोंबळत होता. अंग चर्मरोगानें चिडलेलें, दाढी वीटभर वाढ-लेली, डोळ्यास चिपडें, पोट खपाटीस गेलेलें अशी त्यांची दीनवाणी चर्या पाहून मला भडभडून आलें. ती बाजारबसवी

'गुलाब... अर्धवट केलेल्या पेहेरावानें रस्त्यांत येऊन हातांत धरलेल्या छत्रानें माझ्या पतीला बडवीत होती. तिच्या तोंडांतील आक्षेपार्ह शब्द वजा केल्यास तिचे बोलणें असें होतें,—

"मेल्या भिकारड्या जवळ नाहीं दमडी नि् गुलाबकळी बाळगायला पाहिजे ! म्हणे तुझ्यापायीं मी भिकेला लागलों ! फार झालं तर तुझ्या कडून मला पंचवीस हजार रुपये मिळाले असतील. अरे पंचवीस हजार म्हणजे एका बैठकींतली माझी पिंक आहे पिंक ! लाखोपतींना मीं धुळीला मिळविलं आहे अन् त्यांत ते फुशारकी मानतात. तुझ्या सारख्या डुकराची किंमत काय ? जा आतां आपल्या काळुंद्र्या घुशीकडे नि नीट संसार कर !" मला भयंकर संताप आला. "वेश्ये, काळुंद्री असेल तुझी आई" कोणाला म्हणतेस काळुंद्री ?" असें म्हणत तिच्या थोबाडांत चार फटके लगावले. लोकांनीं हा तमाशा पाहून पुनः आनंदानें आरोळ्या ठोकल्या. माझ्या अनपेक्षित हल्ल्यानें गुलाबकळी भांबावून गेली. गाल चोळीत ती मुकाट्यानें उभी राहिल्यावर मीं पतीस विचारलें, "नाथ दासीला ओळखलं कां ?"

"आवाजावरून अन् तोंडवळ्यावरून तूं माझी धनीण कालिंदी असावीस असं वाटतं पण हीं दिव्य अंगकांती पाहातांच ती तूं नाहींस अशी खात्री होते, " पति म्हणाले.

"तीच मी आपली आज्ञांकित कालिंदी. हिमालयांतल्या एका योगिनीच्या प्रसादानं मला ही दिव्य कांति प्राप्त झाली आहे. चला घरीं. ह्या बाजारबसवीचा नाद सोडा," मी म्हणाल्यें.

पति "मला क्षमा कर" असें म्हणत माझ्या पाया पडूं लागले. त्यांस निवारण करून आम्हीं दोघें, आश्चर्यानें थक्क होऊन आ पसरून उभ्या राहिलेल्या गुलाबकळीच्या तोंडावर थुंकून, तेथून निघालों.

पंचवीस वर्षें झालीं ह्या गोष्टीला. आतां माझें घर लेकीसुनांनीं, मुलांजावयांनीं गजबजलेलें आहे. प्रबलयोगिनीला दिलेल्या वचनाप्रमाणें तिनें सांगितलेल्या गोळ्या आणि सुवर्ण लेप यांचा प्रचार भगिनीवर्गात मोठ्या प्रमाणावर मीं केलेला आहे. ह्या दोन प्रासादिक औषधांची कृति जनहितार्थ आणि महिला दुःखनिवारणार्थ येथें मी देत आहें:—

प्रथम खालील वनस्पतींच्या बिया मिळवून त्या उन्हांत सुकवाव्या. नंतर त्या उंटिणीच्या दुधापासून केलेल्या तुपांत तळाव्या आणि त्यांचा बारीक खल करावा. कुत्तरशिंगी, धूमधडाका, फसफशी, मिनाक्षी, वनमाला, रानकोंबी, गांवकीगोरी. प्रत्येक वनस्पतीच्या बिया बरोबर एक तोळा, दोन मासे, चार गुंजा घ्याव्या. या बियांचा खल झाल्यावर सर्व चूर्ण एकत्र मिसळून तें काळ्या काचेच्या कुपींत घालून अंधाऱ्या जागेंत एक दिवस, दोन प्रहर, चार घटका ठेवावें.

ह्या नंतर पुढें दिलेलीं तेलें एकत्र मिसळून तीं लाकडाच्या कढईंत घालून विस्तवावर ठेवावीं. मगर माशाचें तेल, बकुळीचें तेल, लोखंडाचें तेल, मोत्याचा अर्क आणि काचेचा आसव. हें मिश्रण चांगलें उकळूं लागल्यावर त्यांत प्रथम सांगितलेलें चूर्ण मिसळावें. आणि तें घट्ट होईपर्यंत सोन्याच्या उलथन्यानें ढवळावें. ढवळींत असतांना, "माझा वर्ण गोरा होवो" असा अष्टाक्षरी मंत्र सारखा जपावा. मिश्रण घट्ट झाल्यावर त्याच्या बंदुकीच्या गोळ्यांएवढ्या गोळ्या तयार कराव्या.

यानंतर सुवर्ण लेपाची कृति सांगावयाची राहिली. रानघोड्याचें शिंग सहाणेवर उगाळून त्याचा लेप तयार करावा. तो चांदीच्या वाटींत घालून, वाटी चांदण्यांत ठेवावी. नंतर धमासा, धपाटा, नागरमोथा आणि हरणउडी ह्या चार वेलींची फुलें जमवून तीं पाण्यांत घालून तें पाणी ज्या वेळीं चंद्रग्रहण आणि सूर्यग्रहण एकदम येतील त्या वेळीं उघड्या आकाशाखालीं परातींत ठेवावें. तें अशा बेतानें कीं सूर्य आणि चंद्र ह्या दोघांचीं प्रतिबिंबें त्या पाण्यांत पडतील. लगेच असा चमत्कार होईल कीं तें पाणी एकदम मेणासारखें घट्ट होईल. मग त्यांत मघाशीं केलेला रानघोड्याच्या शिंगाचा लेप मिसळावा कीं, अंगकांति सुधारणारा दिव्य सुवर्ण लेप तयार झाला. वाचक हो! योगिनीच्या कृपेनें वरील गोळ्यांच्या आणि लेपाच्या सेवनानें मी जशी कालिंदीची गौरी होऊन पतीचें प्रेम संपादन केलें, तसें तुम्हांला पतीचें किंवा पत्नीचें प्रेम कात्रीज करतां येणार नाहीं काय? त्यासाठीं तुम्हाला माझ्याप्रमाणें हिमालयांत वणवण हिंडायला नको. घरच्या घरीं प्रयोग करून पाहा पण यदाकदाचित् वरील वनस्पती मिळणें असाध्य असेल तर आणि तरच माझ्याकडे मनीआर्डरनें दहा रुपये प्राठवा. केवळ आंतील द्रव्यांची किंमतच आहे ही. नफा किंवा श्रमाचा मोबदला मी घेत नाहीं, कारण प्रबल योगिनीला तसें वचन दिलें आहे. लगेच पोष्टानें तुमच्याकडे बत्तीस गोळ्यांची डबी आणि लेपाची बाटली येतील. मग पहा चमत्कार! जास्त काय लिहूं? माझा पत्ता:—

सौ. अध्यात्मदेवी, योगाश्रम, पोष्ट काळाबाजार, सहारानपूर, पंजाब.

मला बुडविलें ह्या कृपावन्तांनीं
आपुल्या औदार्यानें !
काय मी ह्यांचें मारिलें होतें नकळे घोडें
म्हणून मला केला पांगळा ?
श्रावणाभ्रेधील जलदांसारखी
ही ह्यांची खैरात
करी माझा घात !
झगडाया मज नुरली वासना
वासनेमागून जातसे त्राण !

होतों मी नादांत
माझिया कैफांत
कांहीं बरळत.
उतरूं नये ती माझी धुंदी
म्हणून पुरवी हा मज चंदी.
चंदीचा तो माज नव्हे परि कैफ.
कैफ तोच खरा रणझुंजाराचा
कैफ तोच खरा क्षुब्ध सागराचा
कैफ तोच खरा मत्त मयूराचा
विश्व-विसरल्या संत-नर्तकाचा.

एकदां, नाचलों बेभानपणें
गवती तुरे, रानटी फुलें
लेवून, नाचऱ्या झऱ्याच्या कांठीं.
तदा उदारधि रसिकवरानें
उद्यानामधील आपुल्या महालीं
आदरानें माझी स्थापना केली;
आणि पाचू हिरे—
मोतियांचे तुरे
खोवियेलें भावें माझिया मंदिलीं.
अरेरे ! बसलों तेव्हांपासून
नर्तनकलेस माझिया मुकून !

काय शार्दूलाचें पाहता क्रीडित
लोखंडी गजांच्या उंच सापळ्यांत ?
भकाळ पोटाची रिकामी पोतडी
लोंबतां, पडते नेभळीच उडी !
चला डोंगराच्यागव्हरांत गर्द
तिथें शिलाखण्डी सुस्तावला जर्द
पंचानन जर आढळला कोणी
पहा क्रीडेसाठीं तया डिवचोनी.

मर्दानी क्रीडांचा राया, तूं शौकीन !
झुंजार पाळिसी रतीब लावून,
झुंज ते करिती नकली दिखाऊ,
झुंज करतील काय ऐद खाऊ ?
घेई रोमरोमीं अहंकार पेट
घेतात संग्रामीं ऐसे जेव्हा भेट
खुराक, वजन किंवा कृतज्ञता
शुद्ध हिशेबाची असते कुणास ?
जीवित सर्वस्व लाविती पणास.
फिटतें तेधवां डोळ्यांचें पारणें
पाहून होतात शौर्याचीं स्फुरणें.

अगा कृपावन्ता उदार रसिका
भुलीनें करसी केवढ्या ह्या चुका
शौर्य-भक्ति-नृत्य-स्फूर्ति
नव्हेत बाहुलीं हीं कळसूत्रीं,
भावना मानिसी खेळणें सुन्दर ?
पूर्वनिश्चित कीं घड्याळ-गजर !

अगा भागवता, सावध ! सावध !
मठ आणि गादी
स्वीकारी ना कधीं.
बसाहती वेंगें करती गादींत
रुधिर-पिपासु ढेकूण पिसवा
जमतो मठाच्या तेंवि ओवरींत
भोंदू नि आळशी बैराग्यांचा थवा.
देखत-देखतां
मठ आणि पंथ होतात-हा हन्त !—
मोक्षदलालांची उतार पेठ.
अगा भागवता, सावध ! सावध !
स्वीकारूं नकोस ऐसा आत्मवध.

सातारा
१८-८-४५

यशवन्त

अनुक्रमणिका

# पाव आण्याचें पांडित्य

लेखक ना. ह. आपटे

• • ज्यांनीं तो प्रसिद्ध प्रवास करून, प्रत्येकीं पाव आण्याचें पांडित्य प्रगट केलें, ते हे आठ थोर लोक!

यांच्या चार जोड्या होत्या. ॒ अनेक पक्ष होते. त्यांच्या मता मतांचा-त्यांचा त्यांनाच-पत्ता नव्हता. वयें होतीं—पंचवीस तीसच्या दरम्यान.

हो, नांवाचा परिचय आधी करून दिला पाहिजे.

पहिली जोडी—**बादशाहा** आणि **बिरबल**. पहिल्यांना राज्य नव्हतें आणि दुसरे अकलचे खंदक होते.

दुसरी जोडी— **गलिव्हर** आणि **डॉन-क्विझोट**. पहिला, चहाच्या पेल्यापासून तो चार आठ आण्यापर्यंत हात उसनवारी करीत फिरणारा भटक्या होता. तर दुसरा, मार्गानें जाणाऱ्या येणाऱ्या तरुणींच्या तोंड्याकडे तिरकी नजर टाकीत पराक्रमाचे शाब्दिक फवारे उडविणारा शिलेदार होता.

तिसरी जोडी—**लॉरेल** व **हार्डी** या जाड्या-रड्यांची ओळख करून द्यायची म्हणजे चित्रपट-शोकीनांचा अपमान करण्यासारखें आहे.

चवथी जोडी—**मांचुसेन** व **चार्ली चापलीन**. पहिल्याची ओळख अनेक वाचकांना नसण्याचा संभव आहे हा गलिव्हर व डॉन यांच्याच गांवचा. भटक्या व बोलघेवडा. शपथेवर खरें बोलायचें असा त्याचा बाणा होता आणि प्रतिज्ञापूर्वक अकटोविकट थापा द्यावयाच्या असा त्याचा नेहमीचा व्यवसाय होता!—राहिला आपला चार्ली! याची ओळख करून द्यायलाच हवी का?—मग त्याच्या त्या प्रसिद्ध मिशा, ती विजार, ती छडी आणि ती चालण्याची ढब—छे:! फाजील वर्णन नकोच. सिटी लाइटस् मध्यें वावरणाऱ्या मॉडर्नटाइम्सच्या तरुणांना जास्त सांगण्याची जरूरच काय?

या आठ थोरांचा स्नेह कसा जमला?—ते राहणारे कुठले आणि करतात काय? इत्यादि वायफळ गोष्टींत झरणींतील शाई संपविणें एकंदरींत बरें नाहीं म्हणून—इति अलम्!

एवढें खरें: केव्हांतरी एकदां त्यांच्यामध्यें प्रवास करण्यासंबंधीं गोष्टी निघाल्या. देशाटन केल्यानें मनुजा चातुर्य (नसलें तर) लाभतें हें त्यांच्या ध्यानीं येतांच त्यांनीं कुठेंतरी प्रवासाला जाण्याचें निश्चित केलें. पुष्कळदां देशाटनामुळें मनुजाठायीं असलेलें चातुर्य खलास होतें, याचा त्यांना अनुभव पुढें आला!—प्रत्येकीं पाव आण्याची बचत करून.

कसेंहि असो. मांचूसेनानें प्रवासाची कल्पना उचलून धरली, आणि म्हटलें, "आपण अमरखेटच्या लोकप्रसिद्ध अशा श्री पारायण महाराजांचें दर्शनास जाऊं. स्वार्थांत परमार्थ साधेल! संत संगतीचा लाभ होईल—"

पेंगत असलेल्या बादशाहांनी म्हटलें, "बिरबल—"

"जहाँपनाह—"

"हे पारायण महाराज कोण?"

बिरबलनें मांचुसेनाकडे पाहिलें. चार्लीनें किंचित् मान उडवली. नी पडती टोपी सावरली. हार्डीनें लॅरेलला कोपरखळी मारली व सावध होण्यास सुचविलें. हार्डीकडे लांबट मुद्रेनें पाहात लॅरेलनें टाळूवरील झिंज्या खाजविल्या! "डुलसी!" असा उद्गार काढीत क्विझोटनें मिशी पिळली. गलिव्हर शून्य दृष्टीनें पाहात राहिला.

मांचूसेनानें त्या सर्वांच्या अज्ञानाची कींव करीत म्हटलें, "ज्या सत्पुरुषानें एका आठवड्यांत तेरा कोटीचें गायत्री पुरःश्चरण केलं, दुसऱ्या आठवड्यांत तेरा कोटी गुरुचरित्राचीं पारायणं केलीं, तिसऱ्यांत तेरा कोटी लिंगार्चनं करून श्रीशंकरास प्रसन्न करून घेतलं आणि चवथ्यांत तेराशें कोटी सत्यनारायण करण्याचा संकल्प सोडून आणिमादि सिद्धी हाताचा मळ करून टाकल्या, त्या संतश्रेष्ठ पारायण महाराजांना तुम्ही जाणूं नये. धिःक्कार असो तुमच्या बहुश्रुतपणाला!—"

"बिरबल—"

"जहाँपनाह—"

अनुक्रमणिका






" सत्यनारायणाच्या प्रसादाची व्यवस्था कशी काय असते, तलास कर आणि ती हवी तशी असेल तर प्रवासाची ताबडतोब तयारी ठेव—"

" जी—" म्हणत बिरबलानें पुन्हां मांचूसेनाकडे पाहिलें.

चार्लीनें टोपी सरळ करीत पुन्हा तिरपी बसविली आणि शीळ घालण्याची तयारी केली.

लॅरेलच्या रडक्या चेहऱ्यावर खुणेचें हास्य उमटलें आणि हार्डीचा वाटोळा मुखडा पूर्ण वाटोळा झाला. डॅननें तरवारीस हात घालण्याचा आविर्भाव केला. गलिव्हरनें भानावर आल्याचें दर्शविलें.

मांचूसेनानें सत्यनारायणाच्या प्रसादाची माहिती दिली.

तुपाकरितां श्रीपारायण महाराजांनी उत्कृष्ट दुध देणाऱ्या पन्नास म्हशी पाळल्या असून दिवसांतून सहा वेळ त्यांची धार काढली जाते. धारा काढतां गवळी थकतात पण म्हशी दूध द्यायच्या थांबत नाहींत! साखरेकरितां एका भक्तानें एक कारखाना महाराजांच्या सेवेंत अर्पण केला आहे!—केशराकरितां काश्मीरांतील अर्धी अधिक खोती घेण्यांत आली असून बदाम वेदाण्याचा मक्ता एका कंपनीकडे दिला आहे—"

" बीरबल—"

" जहाँपनाह—"

" प्रसाद घेण्याआधीं पोथी ऐकण्याची सक्ति आहे का?—माहिती काढ. नी त्या अदमासानं तिथं जाण्याचं धोरण बांध—"

" जी—" बीरबलानें मांचूसेनाकडे पाहिलें.

मांचूसेन अभिमानानें म्हणाला, " श्री पारायण महाराजांच्या मठांत—सक्ती या शब्दाला पूर्ण मज्जाव आहे. तिथं प्रेमाचं साम्राज्य आहे महाराजा, केवळ प्रेमाचं साम्राज्य!"

" प्रेमाचं साम्राज्य!" चार्लीनें उद्गार काढीत मानेंत बुक्की मारल्याप्रमाणें डोळे फाड्ले नी कोटाच्या गुंड्या तपासल्या.

हार्डीनें बोटें नाचवीत हास्य केलें. लॅारेलनें तोंडांत बोट घालीत लाजऱ्या पोरीचा अभिनय केला. क्रिश्चननें डोकें झाडलें नी गलिव्हरनें—'भगवंताची इच्छा!' असा भाव दर्शविला.

मांचूसेनानें सर्वांच्या वरील तर्कटाचा निषेध करीत म्हटलें, " संसारांतील अनित्य अशा सुखाविषयीं आसक्ति दाखविणाऱ्या मूर्खांनो, साधुसंगतीवाचून तुमचा उद्धार नाही. तातडी करा नी पुण्यमार्ग धरा."

एवढें बोलून त्यानें पुन्हा एकवार श्री पारायण महाराजांच्या मठांतील राजसुखोपभोगाचें सुरस वर्णन केलें. श्रीसत्यनारायणाच्या पूजा, त्याकरितां होणारा तो केशरी रंगाचा—साजूक तुपांत असलेला प्रसाद, ती महाराजांचीं खास पतंग—छे छे छे, एकालाहि नकार देण्याचें धैर्य राहिलें नाहीं.



मग मांचूसेनानें कानगोष्टी करण्याचा आविर्भाव आणून म्हटलें, " महाराजांच्या पट्टशिष्यापैकीं मी एक आहे—"

प्रवासाचें निश्चित ठरलें.

" बिरबल—"

" जहाँपनाह—"

" प्रवासाची तयारी?"

मांचूसेनानें म्हटलें, "उठायचें नी सडें चालू लागायचें!—अमरखेट—रेल्वे स्टेशनपासून पांच सहा मैल आंत असं उत्तरेला किंवा दक्षिणेला आहे. मी एकदां रात्रीं गेल्यामुळं मला नक्की माहित नाहीं. पण तशी अडचण आपल्याला पडायची नाहीं. मी पत्र टाकतो नी दोन तीन टांगे बोलावून घेतो. सायंकाळी पांचला त्या स्टेशनला पोचेल अशी गाडी आहे. त्या गाडीनं तिथं जायचं. टांग्यांनीं तासा भरांत अमरखेट!"

पुढचें वर्णन ह्याहिपेक्षां सुरस होतें. टांग्यातून उतरतांच या या म्हणून स्वागत, कपडे काढून घ्यायला प्रत्येकीं एक स्वयंसेवक, समोर चौकांत आठ पाट मांडलेले. जवळ सोसवेल अशा उन्हापाण्याचे चांदीचे गडवे, घमघम करणारी साबणाची वडी आणि मागें पांढरे फेक टुवाल घेतलेले नोकर!"

त्या पुढें—बाजूच्या प्रशस्त खोलींत प्रवेश. तिथें टेकाय बसायला पाट, पुढ्यांत चौरंग, त्यावर प्रसादाचा भरगच्च द्रोण, बाजूस चांदीच्या तबकडींत लिंबाच्या लोणच्याची फोड—

हें वर्णन ऐकतांच सर्वांचें मनोमालिन्य नष्ट झालें. प्रत्येकाच्या हृदयांत भक्तिभाव दाटला.

" बिरबल—"

" जहाँपनाह—"

" मठांतील ही व्यवस्था ठीक आहे. आपण खुष आहोंत—पण एक आयब दिसतो यांत. तुझ्या लक्षांत नाहीं आला?—अरे, पाय पुसण्यास टुवाल घेतलेले ठोंबे असावे, हें काय शोभतें?—यापेक्षां ज्यांनी सोळावें वर्ष ओलांडलं आहे आणि विसावें वर्ष पाहिलं नाहीं, अशा नाजूक कोमलांगी—काय, माझी कल्पना पसंत?—टिपण करून घे. महाराजांच्या जवळ काढूं ही गोष्ट—"

मांचूसेनानें बादशाहाच्या पायावर एक चटकाणी दिली! त्या बरोबर इतरांनी आपला टेकू खिशांत घातला.

प्रवासाचा दिवस ठरला. मांचूसेनानें खलिता रवाना केला. प्रत्येक त्या दिवसाची वाट उत्सुकतेनें पाहूं लागला.

त्यानंतर एका सायंकाळीं वरील आठ व्यवहारपंडित त्या स्टेशनावर येऊन पोचले. पुढें होणाऱ्या स्वागतासंबंधीं मनोराज्य करण्यांत त्यांना मधल्या वेळचा चहा घेण्याचें भानहि राहिलें नाहीं.

इंग्रत खिदळत व विनोद करीत चारी जोड्या स्टेशन बाहेर आल्या! स्टेशन शक्य तितकें भिकार व उससे सवाई बाहेरचा देखावा!—झाडेंझुडेंसुद्धां भरपूर नव्हती. दोन तीन गाडीरस्ते मात्र इकडे तिकडे जात होते. पावसाळ्याचे दिवस असल्यामुळें चिखल, डबकीं आणि माजलेलं गवतीरान सगळीकडे दिसत होतें.

"बीरबल—"

"हुजूर"

"टांगे?"

"जी—वाट पाहिली पाहिजे."

सगळेजण मांचूसेनाकडे पाहूं लागले. आणि तो थापाड्या तिन्ही रस्त्याकडे दूरपर्यंत पाहूं लागला!

सूर्यानें आकाशांतील ढगाआड केव्हांच दडी दिली होती. अर्थात् तो मावळल्यासारखाच झाला होता.

हळू हळू अंधार पुढें पुढें करूं लागला.

टांग्याचा पत्ता नव्हता.

"बीरबल—"

"हुजूर—"

"टांगा?"

"जी—आपल्या कमरेखालीं आहेत."

"बीरबल, चहा—"

"अस्मानमें—खाविंद!"

सगळ्यांनीं मांचूसेनावर प्रश्नाचा भडिमार केला!

गलिव्हरनें सुचविलें, "संध्याकाळ झपाट्यानं पुढं सरकतें आहे. मुकाट्यानं चाळूं लागूं या—"

डॉनक्विझोट शड्डू ठोकून तयार झाला. हार्डीचा चेहरा पडला. लॉरेलनें सुस्कारा टाकला. चार्लीनें गिरकी घेत छडी फिरविली.

"बीरबल—"

"खाविंद—"

"मांचू कुठं आहे? त्याचा गळा दाबून प्राण घे—"

लॉरेल हार्डीनें टाळ्या वाजवून बादशाहाच्या या हुकमाला मान्यता दिली! गलिव्हरनें क्विझोटला डोळा घातला! त्यांनें रुकार दिला. चार्लीनें ओठ मुडपीत शीळ घातली!

तों पर्यंत दूर जाऊन टेहळणी करीत होता—मांचूसेन!

सर्वांनी मांचूसेनाला गांठून म्हटलें, केला ", आता पुढं होऊन वाट तरी काढ. चाळूं लागूं या—"

त्यानें गांगरून म्हटलें, "नक्की वाट कोणती, हें माझ्या लक्षांत येईना. मघापासून तेंच शोधतोय्!"

संतापलेल्या दृष्टींत मारण्याचें सामर्थ्य असतें तर मांचूसेनाचे चिरडें झालें असतें!

तितक्यांत एक चमत्कार झाला. एक बैलगाडी सपाट्यानें स्टेशनकडे येत होती. बैलांची जोडी तरणी ताठी, गाडीवानहि त्यांच्या शिणेचा. चावूक फडफावीत व तोंडानें कांहींतरी गुणगुणत स्वारी बैलांना पळवीत होती. बैलांच्या जुपण्याला लावलेले घुगूर खुळखुळ वाजत होते. किती प्रोत्साहक देखावा होता तो!



मांचूसेनाची छाती फुलली. तो म्हणाला "मला वाटलंच. पावसापाण्यामुळं वाटेला चिखल. टांगा चालणं अशक्य म्हणून महाराजांनीं गाडी पाठविलेली दिसते. चला काम झालं!"

"बिरबल—"

"जहाँपनाह—"

"मांचूसेनीचं नरडं दाबणं योग्य ठरलं नसतं—"

"जी—"

"त्याला एखादं गांव इनाम दिलं पाहिजे."

"जी—दिल्लीचं तक्त हातीं येतांच पहिलं काम तेंच करूं. हुजूरांची इच्छा मंजूर आहे—"

सर्वांनीं तुर्तास मांचूसेनाला शाबास देण्याचं ठरवलं.

तोंच गाडी आमच्या अंगावरून (अक्षरशः नव्हे) स्टेशनांत गेली! मांचूसेनाची गोड कल्पना फोल ठरली!!

व्यवहारपंडित पाहतच राहिले.

गाडीवानानें एका स्थानीं गाडी थांबवून स्टेशनांत प्रवेश केला. वरील अष्टक आशाळभूतपणे गाडीच्या आसमंतांत जमले.

पांच मिनिटांत गाडीवान एक छकड गात परतला.

मांचूसेनाला सर्वांनी पुढं ढकलला.

"काय पाटील?" मांचूसेनानें मधुस्त्रियाच्या आर्जवी सुरांत विचारिलें, "कोण गांव?"

"अमरखेट नव्हं का!" तो मधुर स्वरांत उत्तरला.

"मग आम्हाला नेताय् का?—महाराजांच्या मठांत—"

मुंगळ्याप्रमाणें पंडितांचा तांडा गुळाच्या गाडीला चिकटला!

"दहा आणे बसतील!"

"सर्वांना मिळून?"

"हॉ!—चला बसा लौकर. न्हाईतर निगाली बगा आमची फोरड गाडी—आटपा!"

व्यवहारपंडित विचारांत पडले. मागितलेलें भाडें एकदम कबूल करणें हा काय व्यवहार झाला?—कोणाचीहि मंजुरी मिळेना.

"बिरबल—"

"हुजूर—"

"आठ आण्याला येतोय का विचार?"

"येस!—आठ आणे मंजूर—" सर्वांनीं गिल्ला केला आणि गाडीवानानें तें मान्य करावें म्हणून त्याची प्रत्येकानें समजूत घातली.

पण तो अडाणी. दहा आण्याच्या ऐवजीं आठ आणे घेण्यांत आपलें कल्याण असून शिवाय परोपकार आहे हें त्याच्या टाळक्यांतच घुसेना.

त्यानें हंसत व मान डोलावीत व्यवहार पंडितांना जरा बाजूला होण्यास सांगितलें. त्यांना वाटलें, गाडींत घोंगडें पसरून तो आता सर्वांनाच वर घेणार. आठ आण्यांत सौदा पटला. दोन आणे वाचविण्याचें जें व्यवहारचातुर्य आपण दाखविलें, तें फोल ठरलें नाही.

या गोड विचारांत ते सारेच गाडीपासून पांगलें. एकानें छोटे मोठे विधी उरकून घेण्याची सूचना पुढें आणली. ती अनेकांना मानवली. बैलगाडांच्या सुखकर प्रवासाचीं चित्रें रंगवीत बाकीचे उभे आहेत, तों क्षणांत चमत्कार !

गाडीवानानें गाडींत उडी मारली, बैलांचीं तोंडें वळवलीं आणि चाबूक हवेंत फडकावींत—



**तूं चाल पुढं—तुला र गड्या,**
**भीति कशाची ? पर्वाहि कुणाची ?**

हें गीत त्या आठी शहण्यांच्या तोंडावर फेकलें आणि गाडी पळवली !

सब हक बक् होगये !

सर्वांनीं गिल्ला केला—"अरे ! अरे ! ए शहाण्या, थांब. दहा आणे सही—गाडी थांबव-ए—ए—" असे ऊर्ध्वश्वासांत म्हणत त्यांनी त्याचा पाठलाग आरंभिला !—पण त्याचा कांही उपयोग झाला नाही.

दूर दूर झपाटयानें जाणाऱ्या गाडीकडे पाहात सर्वांनी त्या हलकट, पाजी, उर्मट गाडीवानाचा व त्याच्या जातगोताचा उद्धार केला !

घायकुती आलेला गलिव्हर म्हणाला, "त्याला शिव्या देण्यांत अर्थ काय ?—पाव आण्याची बचत करण्याची कल्पना काढणारानें स्वतःच्या तोंडांत मारून घ्यावी आधी."

सर्वांनी एकमेकाकडे पाहिलें.

मांचूसेन म्हणाला, "बादशहानें हा गाढवपणा केला—"

बीरबलानें ऐटींत विचारलें, "पण तुम्ही शहाण्यांनीं ती उचलून कां धरली ?—पाव आण्याचं पांडित्य सर्वांचं आहे !

बादशहा म्हणाले, "आणि हा सारा गाढवपणा मांचूसेनाचा आहे. पारायण महाराजांच्या दर्शनाला जाण्याची अचरट कल्पना त्याची ?"

हार्डीनें मांचूसेनास प्रश्न केला, "काय शिष्ट, टांग्यांची वाट काय ?"

लॅरेनें टाकून खाजवीत वाकुल्या दाखविल्या.

गलिव्हर व डॉन क्विझोट यांनी वाटेला लागण्याचा पुन्हा इशारा दिला. चार्लीनें मांचूसेनाला छडीनें डवचलें. त्यानें त्याचा निषेध करीत म्हटलें. "हा सारा घोटाळा तुम्हां मंडळीच्या नास्तिकपणामुळें झाला!–तुम्हा शिकलेल्या लोकांना धर्माविषयीं प्रेम नाहीं, साधुसंताविषयीं श्रद्धा नाहीं, मनांत भक्तीचा लवलेश नाही! त्याचं हें फळ आहे!—पारायणमहाराज तुमची कसोटी पाहाताहेत बेट्यांनो!—मुकाट्यानं त्यांना शरण जा. अविश्वास दाखविल्याबद्दल त्यांची मनोमन क्षमा मागा नी मग पाहा, काय चमत्कार होतो?"

"ए अकलेच्या खंदका, पुरे तुझी बटबट." कोणीतरी म्हटलें.

संध्याकाळ झपाट्यानें येत होती.

पुन्हां त्यांच्यामध्यें पाव आणण्याचें पांडित्य कोणाचें? हा प्रश्न चिडलेल्या भाषेंत



निघाला. वाटाघाटींत प्रत्येकानें दुसऱ्यास गाढव ठरविण्याचा प्रामाणिक प्रयत्न केला!

पुढें काय?—हा प्रश्न सर्वांना भेडसावूं लागला.

पारायणमहाराजांच्या मठांतून होणाऱ्या स्वागताच्या मनोहर रामराज्यांत त्यांना प्रवासी तयारीची कांहीच मातबरी वाटली नव्हती. फटिंग अवस्थेंत ते त्या स्टेशनावर अवतरले होते. पावसाळ्याचे दिवस असतां त्यांनीं साध्या छत्रीची वा रेनकोटाचीसुद्धां आठवण ठेवली नव्हती. मग इतर तयारीचें भान ठेवतो कोण?—अशा स्थितींत थोडा थोडा पाऊस येऊं लागतांच आभाळाकडे पाहात झाडाचा आश्रय घेणें व पावसाला गालिप्रदान करणें एवढाच पुरुषार्थ त्यांना करतां येण्यासारखा होता.

तो त्यांनीं अहमहमिकेनें लागलीच अंमलांत आणिला. पण तेवढ्यानें चालू पेंचप्रसंग कसा सोडवावयाचा?—हें कोडें त्यांच्यापुढें होतेंच.

पुन्हा त्यांनी झाडाच्या सावलींतून टपकणाऱ्या पावसाला चुकवीत वाटाघाट आरंभली. एकमेकाला दोष दिला आणि मांचूसेनाला भंडावून सोडला.

गलिव्हरचें मत पडलें परत जाणारी आगगाडी गांठून गांव पाहावें हें उत्तम. डॉन क्विझोटनें त्याला टेकू दिला. हार्डीनें विचारलें. तोंपर्यंत खाण्यापिण्याची व्यवस्था काय?—लॅरेनें पोटावर हात फिरवीत चेहरा लांबट केला.

चार्लीनें मधेंच तोंड उघडून परतीची गाडी



अनुक्रमणिका

पहाटे पांचला असल्याचें सांगितलें !—मांचू-सेन वेड्यासारखीं भोवतालीं पाहात म्हणाला, "खेटाला कसं जायचं ?—ही वाट ध्यानांत येईना रे. नाहींतर रायांनो, दाखविलें असतें."

"बीरबल—"

"जहाँपनाह—"

"राज्याचा एकंदर बंदोबस्त फिसकटला असून पाव आण्याची बचत चांगलीच अंगलट आली आहे !—इथं झाडाखालीं उभं राहून गारीगार होण्यापेक्षां स्टेशनमास्तराला शरण जाऊन रात्रीची कांहीं व्यवस्था लावणं शहाणपणाचं ठरेल. तसं कांहीं करणार का ?"

बादशाहाची ही सूचना सर्वांना बरी वाटली सर्वांनीं झाडाचा आश्रय सोडून मार्गावर पदार्पण केलें आणि थोड्या अंतरावर असलेल्या कंगाल स्वरूप स्टेशनकडे पाहिलें. एका झाडाच्या मोठमोठ्या फांद्या आडून तिकिट खिडकीचा एकाक्ष त्यांच्याकडे उपहासानें पाहात होता.

पावसाचा शिंतोडा थोडा मंदावला होता. येणाऱ्या थेंबांचें निवारण करीत पंडितांचा तांडा पांच दहा पावलें गेल्यावर स्टेशन-मास्तरला शरण जायचें म्हणजे काय करायचें ? हा प्रश्न त्यांच्यापुढें आला.

" We are eight "—एकानें वर्डस्वर्थचें अनुकरण करीत म्हटलें.

"स्टेशनमास्तरला मामा बनवावा"—दुसऱ्यानें सुचविलें.

"मामा म्हणजे आईचा भाऊ कीं बायकोचा बाप ?" हार्डीनें पृच्छा केली. लॅरेलनें हसत टाळू खाजविली.

"पहिल्यापेक्षां दुसरें नातें जास्त सोयीचें!" बादशहा बोलले.

"स्टेशनमास्तरनें मानलें तर !—" मांचू-सेन म्हणाला, "त्याच्याशीं नातें जोडीत बसण्यापेक्षां अमरखेटची वाट विचारून महाराजांच्या दर्शनाला जाणें जास्त चांगलें–"

"ए—तुझ्या त्या महाराजांचें कौतुक बस्स कर—" दोघा चौघांनी एकदम म्हटलें, "त्यांचा मिळाला एवढा प्रसाद पुरे."

मांचुसेन कांहीं बोलणार तोंच मागून आवाज आला—

"दादा—जरा वाट सोडताय् का—"

व्यवहार पंडित चपापले. त्यांनीं वळून पाहिलें. एक छकडा ! डोक्यावर फाटका तट्ट्या, साधारण म्हातारा बैल, छकडा त्याला शोभणारा, हाकणारा तसाच. आत एक खोकलेकरी पासींजर !

या नव्या देवदूताला पाहातांच मांचू-सेनाची कळी खुलली. त्यानें आंग्लभाषेंत आपल्या मित्रांना चुप्प राहाण्याविषयीं सुचविलें आणि त्या छकडेवाल्याला गटवलें.

त्याच्या मुखांत पारायणमहाराज येऊन बसले होते कीं काय कोण जाणे ? त्यानें अमरखेटला सर्वांना नेतो असें एकदम कबूल केलें. आणलेला पासींजर त्यानें तिथेंच उतरवला, आणि नंतर बैलाला थापटून म्हटलें, "दादा, बैलाच्या पोटाकडं बगून भाडं द्यायच बरं का !"

"काय घेणार भाडें ?" मांचूसेनानें मित्र-मंडळाला डोळ्यानें गप्प बसवीत प्रश्न टाकला.

छकडेवाला भला माणूस. तुका त्याचें नांव. पंढरीला जाणारा येणारा वारकरी ! त्यानें गळ्यांतील माळेला साक्ष ठेवून माणशीं सरळ बारा आणे सांगितलें !

"बारा आणे माणशीं ?" दोघे तिघे उद्गारले.

मांचुसेनानें डोळे वटारीत इंग्रजींत म्हटलें, "मेहरबानी करून गप्प बसा अं !—आपण आठ जण आहों. आठ पावणे सहा रुपये कांहीं फार नाहीत. प्रवास म्हटला कीं, रुपया आठ आणे बाजीपेक्षां जास्त लागायचेच."

अडला नारायण काय करतो ?—व्यवहार आहे ! कधीं पैसा वाचवायचा असतो तर कधीं रुपया घालवायचा असतो !

भाडें मंजूर झालेलें दिसतांच तुकानें लागलीच हात पुढें पसरून चार रुपये बैलाला पेंड घ्यायची आहे. जातां जातां वाटेंत लागणाऱ्या खेड्यांत घेणार, इत्यादि अर्ज केला !—व्यवहारपंडितांनी पाहिलें. नकार दिल्यास नवी पर्वणी चुकायची. त्यांनी आपसांत पैसे जुळवून चार रुपये तुकाच्या हातावर दिले आणि नंतर (मनांतून दचकत) दरडावून त्याला बजावलें, "हें पाहा, आतां राहिलेले दोन महाराजांच्या मठांत गेल्यावर मिळतील बरें का !"

तुकानें मिळालेले चार चंचीच्या स्वाधीन करीत मोठ्या उदार मनानें तें मान्य केलें. नंतर तो म्हणाला "बरं का बाबानूं, जनावर (बैल) हाय म्हातारं. माझ्याबानी. तवा फगत दोन मानसं बसायचीं. मी हाकायला न् तुमापेकीं कुनीतरी योक !—"











" बीरबल—'

" हुजूर—"

त्याला म्हणावं, बैल घाल छकड्यांत आन् आम्ही आठीजण छकडा नेतो, ओढत या पारायण महाराजाच्या मठांत—"

तुका हंसला व म्हणाला, " गरीबाची चेष्टा करताय. करा बाबानूं तुम्हीं इंग्रजी लिवणं पुसणं येणारी मानसं—चला, दोग दोग बसा. मंग तर झालं—असें म्हणत त्यानें बैलाचें तोंड वळवलें.

बादशाहा बिरबल चटकन् आरूढ झाले.

तुका म्हणाला, " बाबानूं, तुमच्यापैकीं म्होरं होऊन रस्त्या कोन दावनार. मला जरा कमी दिसतं ! "

सर्वांनी त्याला मर लेका म्हणत आशीर्वाद दिला.

तितक्यांत लॅरेल हार्डींनी बंड पुकारलें. आम्ही आधीं बसणार असा त्यांनीं दावा केला आणि कोणाच्याहि अनुमतीची वाट न पाहतां घाई करीत छकड्यांत उड्या मारल्या !

ही दंडेली पाहून बादशाहा बिरबल स्तंभित झाले व इतरांना यावर तोड काय हा प्रश्न पडला.

तुक्या मात्र एकदम खवळला. तो ओरडून म्हणाला, " ए–ए शान्यांनों, अरं तुमी माणसं का गाडवं ! नशापानी केल्यावानी असं र का करताय् ! उतरा खाली सारीच ! —मर्दांनो, माझ्या बैलाचा जीव तर बगा ! का भाडं दिलं म्हून असा दंगा करनार !—बैलानं परान सोडण्याच्या आदी उतरा शेन्यांनो—"

आणि तो अशी तक्रार करतो आहे तोंच मालकाचें बोलणें त्या वृषभराजाला उमगलें असावें !–त्यानें शिंगें हलवीत क्षणांत बैठक मारली !

छकड्यांतील चौघे वीर एकमेकावर कोसळले !

" बीरबल—"

" अरे कायका बीरबल—" बीरबल म्हणाला, " बीरबल गया जहन्नममें ! "

" कुछ हर्जा नहीं !—पर ये बात है क्या ? "

पण हा त्यांचा संवाद अपुराच राहिला. तुक्यानें बैलाची हालत बघून किंकाळी फोडली—

" पंढरीच्या इठ्ठला ! धाव र बाबा ! या बामनाच्या कारट्यांनीं माझा गरीबाचा बैल मारला. !—धाव र धाव ! "

त्याचा हा आकांत वैकुंठाच्या पैलतीराला सहज ऐकूं गेला असता !—मग तें कंगाल स्टेशन खडबडून जागें झालें यांत नवल तें काय !

व्यवहारपंडित ! आठीच्या आठी थंड पडले !

चार माणसें धावून येतांच तुक्यानें लॉरेलला लाजविण्या योग्य भोकाड पसरलें !–जमलेल्या तमासगिरांनाहि उलगडा पडेना कीं, आहे काय ही भानगड !

( पान १७३ पहा

# उस्तादजींचें देऊळ

रघुवीर सामंत

आम्ही दोघें समोरासमोर तसे बराच वेळ अबोलपणें बसलों होतों; तोंच काळोख दाटला; केवळ त्यांना भानावर आणण्यासाठींच मी पटकन् उठलों नि डोक्यावरचें बटन दाबलें.

दुकानांत चकन् उजेड पडतांच ते चमकले, उठले; नि पूर्व संस्कारस्फूर्तीप्रमाणें यांत्रिकपणें त्यांनीं दिव्यासमोर हात जोडले.

मघापासून गादीसमोर पैशाच्या पेटीवर पळसाच्या पानांची एक पुडी पडली होती; आंतला हार काढून त्यांनीं समोरच्या भिंतीवरील दत्ताली घातला; लहानशा तबकांत चार कापराच्या वड्या पेटवून त्या ओवाळल्या; नि पेटीवर आरती ठेऊन हवेंत विरणाऱ्या कापराच्या धुरावर हात ओवाळून तळवे एक दोनदां आपल्या चेहऱ्या कपाळावरून फिरवले, तीन उदवत्त्या पेटवून तसबिरीखालच्या भिंतीच्या फटींत रोंवल्या; नि पेढ्याची पुडी सोडून तींतले दोन दत्तासमोर ठेवल्यावर ते पुन्हां गादीवर येऊन बसले.

तबकांतला कापूर जळून गेला होता; उदवत्त्यांचा सुगंध मात्र अजून चौफेर दरवळत होता.

रस्त्यावर ट्राम मोटारी नि माणसें वर्दळत गजबजत होती; दुकानांत मात्र किती तरी वेळ अगदीं शांत होतें.

तेवढ्यांत त्यांनीं पुडींतले भाऱ्याचे पांच पेढे सुहास्यमुद्रेनें माझ्या हातांत ठेवले; ते खाऊन संपत आहेत नाहींत तोंच त्यांच्या पोऱ्यानें बर्फ तरंगणाऱ्या डाळिंब सरबताचा ग्लास माझ्या हातीं दिला.

मग गादीजवळच्या एका उघड्या शिसवी पेटींत रांगेनें लावून ठेवलेल्या अत्तरांच्या रंगीबेरंगी लहान मोठ्या कुप्यापैकीं एक हिरवी शिसी त्यांनीं काढली. हिन्याचा बोळा करून मोठ्या आदबीनें माझ्या मनगटाजवळ चोळला नि शेवटीं हिरकुटासह तो माझ्याच हातीं देऊन ते लोडाला टेकले.

मग पुडींतला एक पेढा तोंडांत टाकून सस्मित चेहऱ्यानें ते मला म्हणाले—

" हां ! अभि कुछ् कहिये, महाशय ! "

× × ×

जवळजवळ गेले तीन महिने, अगदीं दर गुरुवारीं, याच दुकानांत, याच संध्याकाळच्या वेळीं, सर्व अगदीं हें असेंच होत असल्याचें मी पहात आलों होतों.

मी कोणी त्यांच्या धंद्यांतला झोपाळू भागीदार नव्हतों किं विक्री खरेदी नि जमाखर्च यांचा हिशेब पहायला मी त्यांच्याकडे दर आठवड्याला तसें जावें. त्यांच्या बाटल्या खपवणारा एखादा एजंटहि नव्हतों त्यांचा मी !....नि स्वतः अत्तरें विकत घेऊन अंगाला चोपडण्याचा वेडा नाद तर जन्मांत कधीं ठाऊक नाही मला !....

प्रत्येक गुरवारीं मी तसा त्यांच्या दुकानीं जायचों तें केवळ त्यांच्या इच्छेनुसार !.... त्यांनीच ठरवल्याप्रमाणें पैसे घेऊन जायला !

पण म्हणजे माझ्या कर्जाची वसूली करायला नव्हे....( त्यांचा सावकार होण्यासारखा कांही मोठा पेढीवाला नव्हतों मी !— ) धर्मराजकारणाचं नांव सांगून धर्मदाय फंडगुंडगिरीहि नव्हती चाललेली माझी ती !

तरीहि मी नेत असे ते पैसे माझेच होते. व्यवहारानेंच माझे तेवढें देणें लागत होते ते !

पैशाचा-देण्या-घेण्याचा व्यवहार जगांत विशिष्ट परिस्थितीनें तयार होतो. नि चालला तर तो विशिष्ट परिस्थितीमुळेंच चालतो.

म्हणजे असं....ते जें माझें देणें लागत होते ते त्यांच्या अत्तराच्या ( माझ्या मासिकांतल्या ) सहा महिन्यांच्या जाहिरातीचे पैसे होते !—देणें असल्याचें त्यांना कबूल होतें; नि येणें कोणीहि कबूल करतो !!.

× × ×

अगदीं जाहिरात वाचतां क्षणींच त्यांच्या दुकानावर ग्राहकांच्या पांच दहा रुपयांच्या नोटा घेऊन उड्या पडाव्यात इतके आमचे वाचक अत्तरगुलाबीचे विशेष शौकीनरंगेल होते असें म्हणायला माझ्याकडे पुरावा नाहीं. किंबहुना एकहि गेला नसावा अशीच उलट मला खात्री आहे !

बरं दाट ओळखीच्या भिडेला बळी पडूनहि मी ती जाहिरात त्यांच्याकडून उपटली नव्हती. ते कनोजी उत्तर हिंदुस्थानी क्षत्रीय; तर मी महाराष्ट्रीय ब्राह्मण....या संबंधापूर्वी त्यांची माझी जन्मांत गांठभेट नव्हती. वय,

दिपावली
१९४५

छायाचित्र :
कुमार चंद्रशेखर




मेघ




तरंग

छायाचित्र : कुमार चंद्रशेखर



अनुक्रमणिका

FAMOUS FILMS

Mughal-e-Azam

A SHIRAZ PRODUCTION

Starring-
★VEENA ★NARGIS
★CHANDRAMOHAN
& OTHERS

Directed by
K. ASIF
Art Director
N.M. KHWAJA

अनुक्रमणिका

शिक्षण, आवडीनिवडी, उद्योगधंदा....सर्वच बाबतींत आम्ही परस्परभिन्न !

ते पंचेचाळीशीं पुढले. पण अजूनहि रोज शे शंभर जोर बैठका ते नेमानें घुमवणारे पिळदार अंगाचे पहिलवान !....तर मी चष्मा सांभाळत ट्राम-बस पकडत फिरणारा पंचविशी आंतला एक काडी पहिलवान ! त्यांना कुस्त्या भजनांचा शौक तर मी पुस्तकांत डोकें खुपसून बसणारा, क्वचित् न्हाणीघरांत सिनेमा संगीत गुणगुणणारा नि एरवी उच्च वाङ्मयचा घरोघर रतीब घालत असल्याचा उद्धट पुकार करणारा मराठी शौकिन संपादक !

केवळ अपघात म्हणूनच माझी त्यांची जगांतली भेट !

नि म्हणूनच मला ती घटना वारंवार आठवते !

× × × •

घट्ट मनानें नकार लेक्चर नि बेफिकीर बोळवण जाणून बुजून पदरांत पाडीत, 'काळबादेवी' ला जाहिरातीचा कौल लावून फिरण्याचा 'मा' फेलषुवृत्तीचा कर्मयोगी खटाटोप चालवला होता मी त्या दिवशीं ! अनेक दुकानें जाहिरात चाकोरींतून भरडून नकार-परंपरा झाल्यावर योगायोगानेंच मी त्या दुकानांवर जाऊन आपटलों होतों.

गिऱ्हाइकाचें चिटपांखरूं नाहीं; निरूंद नि त्यांत पुन्हां अत्तराचें दुकान ! आंत शिरायला प्रथम मन तयार नव्हतं. पण तो साराच प्रयत्न बिनखर्चाचा, बिनभांडवलाचा ! ....तेव्हां मी आंत पाऊल टाकलें.

पुढे गादीवर तीनचार अंक टाकलें नि जाहिरातीसाठीं शब्द टाकण्यासाठीहि 'सूतोवाच' केलें.

बैठकीवर बसलेल्या मोठ्या मिशांच्या त्या शेटजींनी चार दोन मिनिटें अंक चाळले नि शेवटी, कव्हरवरील जाहिरातीची (व्यवहार धोरणानें पाहतां) 'उद्धट' चौकशी केली.

तेवढयांत रस्त्यानें जातां जातां कोणीसें थबकून म्हटले—"नमस्कार....उस्तादजी !" माझ्या समोरच्या शेटजींनीं हंसून उलट नमस्कार केला.

नांव गमतीचं वाटलं मला—उस्तादजी—मनांतली जाहिरात रस्सीखेंच मला जरा नमवीत होती म्हणून; नाही तर वाटत होतं जाहिरातीसाठीं कव्हरवर उडया घेण्याच्या गप्पा मारण्याऱ्या या 'वस्तादा'चा लागलाच निरोप घेऊन पुढल्या एखाद्या 'यशस्वी' खटपटीला तरी लागावं !

पण तेवढ्यांत 'उस्तादजीं'च्या गड्यानें दोन शरबत ग्लासांपैकीं एक आग्रहानें माझ्यापुढें करून दुसरा स्वतःच्या तोंडाला लावीत ते संथपणें म्हणाले—"ये तो हमारा छोटासा धंदा ! हमे जाहिरातका क्या उपयोग होंगा बाबूजी ?"

"या सरबती गोडपणापेक्षां सरळ नाहीं म्हणून मला सोडवा कीं !" रिकामा ग्लास पोऱ्याकडे देतांना माझ्या मनांत आलें. पण उस्तादजींनी आमचे सारे अंक पुन्हा चाळले नि माझ्याकडे सस्मित पाहून पृच्छा केली, "परंतु आपका मासिक पुस्तक तो अच्छा और आकर्षक भि मालुम होता है ! मैं तो मरेठी नहि जानता !....तो क्या ये मरेठी उच्च साहित्य का आदर्श है ना ?....साहित्य कु मैं तो बहुत मानता हूं बाबूजी !—"

"हां हां !" संपादकांतला जाहिरात एजंट जागा होऊन तेवढं तरी हिंदी ठांसून बोलूं शकला वेळेवर !

"तो ठीक, बाबूजी ! इसका छ महिनेका दाम क्या होगा ?" एका छापील जाहिरातीवर बोट फिरवीत वस्तादजींनी पृच्छा केली.

तो उंदिर मांजराचा खेळच असल्यासारखे मला मनांत स्पष्ट पणें वाटत होतें. तरी देखील अडल्या हरीच्या भूमिकेंत मी सवलतीची आकडेमोड करून सत्तावीस रुपये आठ आणे सांगितले.

'अच्छा ! आज तो नहीं ! परंतु दीवालीके मोसमसे जाहिरात जरूर सुरुं करना !'—वस्तादजी अंक माझ्या हातीं देऊन म्हणाले.

× × ×

प्रथम मला तें खरंच वाटेना; मनांत संशयच खूप आला. पण खूष करण्यासाठीं त्यांना अंक परत देऊन मी स्वतःची अधिक खात्री करण्यासाठीं त्यांनां विचारलें—"मजकूर ?"

"क्या ? आपही संपादक हैं ना ?" वस्तादजी सहास्य म्हणाले.

"तो—आपही आपके ध्यान मे आवे ऐसा लिख दो ! इस्से जादा मै क्या आपको बतावूंगा ?–दुकान का नाम और आप चाहे वैसा मजकूर ! बस्स् !"

मी पायऱ्या उतरण्यापूर्वी त्यांनी एक त्रेतायुगांत छापलेली हिंदी जाहिरात माझ्या हातीं दिली; अत्तराचा बोळा करून माझ्या कोटाला अडकवला व सहास्य नमस्कार केला.

त्या बोळ्यांतील अत्तराच्या घमघमाटानें माझें डोकें धुंद झालें होतें. वित्तंवातमी सांगायची म्हणजे वस्तादजींच्या गूढवागणूकीनें कीं, त्यांच्या अत्तराच्या कायम जाहिरातीनें कोण जाणें.

ॲडव्हान्सचं सोडाच पण नव्या मासिकांच्या जाहिरातीच्या कॉन्ट्रॅक्ट फॉर्मना, अगदीं जाहिरात छापल्यानंतरच्या बिलांनाहि अर्थ नसतो. ही जाहिरात तर त्यांत आणखी तीन महिन्यांनी सुरूं व्हायची ! ब्लॉक हातांत नाहीं, मजकूर आमच्या डोक्यांत नि अत्तरवाल्या वस्तादजीचें दुकान नि धंद्याची चलती मी नुकतीच प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलेली !—

तेव्हां अगदीं दिवाळी पूर्वीच्या जाहिरातपायपिटींतही मी वस्तादजींच्या दुकानाला दूरच्या धोरणानें टाळलें.

कारण मला वाटलें—"खात्री करायला आपण जावं नि फट् म्हणता ब्रह्महत्त्या व्हावी. त्यापेक्षां मनांत बिल येण्याची जी आशा आहे तीच जास्त सुखद !"

शेवटीं, त्यांनी दिलेलें तें जुनाट जाहिरात चिटोरें शोधून काढून त्याच्या मदतीनें केलेली जाहिरात आमच्या दिवाळीच्या अंकांत एकदां अवतीर्ण झाली !

एवढंच नव्हे तर माझे पुढले पांच अंकही वस्तादजीच्या अत्तरानें मी सुगंधीत केले.

त्या अवधींत फक्त दिवाळीच्या नंतर एकदांच वस्तादजींचें घमघमणारें एक पाकीट मला आलें. आंत हिना व खस यांचे दोन छोटे बोळे नि एक बोटभर चिठी होती—एक बोट भरच !–








चिठींत मजकूर होता—" संपादक महाशय,–शुक्रिया! जाहिरात और जाहिरातका स्थान मन पसंद.–कृपाभिलाषि–उस्ताद."

मी मात्र कामाच्या सवबीवर त्या काळांत वस्तादजींना एकदांही भेटलों नाहीं. कारण खास व्यवहार तोंडी नि जुना होता; विचारांतीं जाहिरात बाबतच्या कोठल्याही नव्या मासिकाच्या धोरणी प्रथेप्रमाणें त्या छापलेल्या जाहिरातींची बिलें पाठवण्याचा व्यवहारी पण धोक्याचा मार्गहि मी प्रयासानें टाळला होता.

× × ×

आणि योगायोग असा, कीं चालता धंदा नि बंद धंदा यांच्या 'मागील वसुली'च्या प्रश्नांतील जमीन-अस्मानी फरकाचा प्रत्यक्ष अनुभव येण्याची माझ्यावर शेवटीं पाळी यायला नि तेव्हांच उस्तादजींच्या जाहिरातीची सहामहिन्यांची मुदत संपायला एक गांठ झाली.

अगदीं ओळखीचे वर्गणीदार, एजंट नि जाहिरातदारहि तोंडें वळवतांना किंवा कानावर हात ठेवतांना पाहून मी येण्याच्या कागदी हिशेबांत अनोळखी वस्तादजींचें नांव साहजिकच बुडित यादींत घालून मोकळा झालों होतों.

तरी पण शेवटीं, खात्री करून घेण्यासाठीं, एके दिवशीं सर्व बिलांच्या भुतांना उठवून मी माझ्याबरोबर घेतलें; नि जवळजवळ नऊ महिन्यांनी वस्तादजींचें चिचोळें दुकान पुन्हां एकदां शोधून काढलें.

चार मंडळी दुकानांत जमून वस्तादजींबरोबर गप्पा मारीत होती.

मी दबकत दबकतच बैठकीवर जाऊन बसलों.

मित्रांशीं बोलतां बोलतां थबकून क्षणभर माझ्याकडे ओळखीच्या नजरेनें पाहून वस्तादजी आस्थेनें म्हणाले–आइये, महाशय !

सर्वांबरोबर पुढे आलेला सरबताचा ग्लास घशाखालीं उतरवल्यावर मी-हळूच खिशांतून काढलेलीं बिलें पुढें केलीं.

वस्तादजींनी ती न पहातांच पेटींत टाकलीं; नि पूर्वीसारखाच एक अत्तराचा बोळा माझ्या हातीं देत ते मला म्हणाले–" आपको तकलीफ पडेगी; संपादक महाशय! परंतु गुरवार शाम आना !–"

× × ×

लक्ष्मीदेवीचा कौल मिळाला होता !–

त्या आश्चर्याच्या धक्यांतून जागा झाल्यावर मी दोन दिवसांनी वस्तादजींकडे गेलों; तेव्हां ते दुकानांत एकटेच होते;....बराच वेळ मी बसलों. त्यांची दत्ताची पूजा चालली होती; मग पेढे, सरबत सर्व झालें; मला रीतसर अत्तराचा बोळा देऊन ते शेवटीं मला म्हणाले–" देखीये मैं एक गरीब आदमी हूं: अभी जाहिरात कृपया बंद रखना !—"

त्यांच्या त्या आदबशीर शब्दांत डोकावणारे आमच्या मराठी मासिकाच्या भवितव्याबद्दलचें अज्ञान मला सहन होईना; तसं पहातां व्यवहारी दृष्टींनें थोडा धोका होता; तरी मी त्यांना मासिक बंद पडल्याची सारी खरी खरी वस्तुस्थिती सांगितली.

'अरर !' एवढे दुःखसूचक शब्द उच्चारून वस्तादजी गप्प झाले; त्यांचा चेहराहि थोडा पालटला.

क्षणभरानें मी हळूच दबेल्या आवाजांत विचारलें, " झालेलं बील देणार ना ? "

" हां ! देना तो जरूर ! हरगिज देनाहि पडेगा ! " माझ्या प्रश्नावर वस्तादजी पटकन् नि मोठ्यानें म्हणाले; पण मग किंचित थांबून म्हणाले....' परंतु देखीये महाशय, एकदम एक दफेमें तो इतनी रकम देना मुझे मुष्किल पडेगा ! "

तें नकार घंटेचेंच अपेक्षित परिचित 'सूतोवाच' समजून मी गप्प बसलों.

तेवढ्यांत वस्तादजी दुकान बंद करायला उठत मला म्हणाले—" धका खानेकी और तकलीफकी बात होगी ! परंतु दर गुरवार शाम को आप इधर कृपा करके आना ! घंटा देड घंटा ठेरना....दत्तजीका प्रसाद और शरबत ग्रहण करना !....और जातेवख्त उस्ताद जो कुछ रुपया दो रुपया दे दे गा ये भी लेके जाना ! क्या ? ख्याल में आया होगा ना ? "

तसली वसूली म्हणजे एक तारेवरचा नाचच होता तो; पण त्यांतही मला एक नवीनच गंमत वाटली. मनांत म्हटलं " कांहीं




पहिला पाळणा !

अनुक्रमणिका

चिठ्ठींत मजकूर होता—"संपादक महाशय,–शुक्रिया! जाहिरात और जाहिरातका स्थान मन पसंद.–कृपाभिलाषि–उस्ताद."

मी मात्र कामाच्या सबबीवर त्या काळांत वस्तादजींना एकदांही भेटलों नाहीं. कारण खास व्यवहार तोंडी नि जुना होता; विचारांतीं जाहिरात बाबतच्या कोठल्याही नव्या मासिकाच्या धोरणी प्रथेप्रमाणें त्या छापलेल्या जाहिरातींची बिलें पाठवण्याचा व्यवहारी पण धोक्याचा मार्गहि मी प्रयासानें टाळला होता.

× × ×

आणि योगायोग असा, कीं चालता धंदा नि बंद धंदा यांच्या 'मागील वसुली'च्या प्रश्नांतील जमीन-अस्मानी फरकाचा प्रत्यक्ष अनुभव येण्याची माझ्यावर शेवटीं पाळी यायला नि तेव्हांच उस्तादजींच्या जाहिरातीची सहामहिन्यांची मुदत संपायला एक गांठ झाली.

अगदीं ओळखीचे वर्गणीदार, एजंट नि जाहिरातदारहि तोंडें वळवतांना किंवा कानावर हात ठेवतांना पाहून मी येण्याच्या कागदी हिशेबांत अनोळखी वस्तादजींचें नांव साहजिकच बुडित यादींत घालून मोकळा झालों होतों.

तरी पण शेवटीं, खात्री करून घेण्यासाठीं, एके दिवशीं सर्व बिलांच्या भुतांना उठवून मी माझ्याबरोबर घेतलें; नि जवळजवळ नऊ महिन्यांनी वस्तादजींचें चिंचोळें दुकान पुन्हां एकदां शोधून काढलें.

चार मंडळी दुकानांत जमून वस्तादजींबरोबर गप्पा मारीत होती.

मी दबकत दबकतच बैठकीवर जाऊन बसलों.

मित्रांशीं बोलतां बोलतां थबकून क्षणभर माझ्याकडे ओळखीच्या नजरेनें पाहून वस्तादजी आस्थेनें म्हणाले–आइये, महाशय !

सर्वांबरोबर पुढे आलेला सरबताचा ग्लास घशाखालीं उतरल्यावर मी-हळूच खिशांतून काढलेलीं बिलें पुढें केलीं.

वस्तादजींनी ती न पहातांच पेटींत टाकलीं; नि पूर्वीसारखाच एक अत्तराचा बोळा माझ्या हातीं देत ते मला म्हणाले–"आपको तकलीफ पडेगी; संपादक महाशय! परंतु गुरवार शाम आना !–"

× × ×

लक्ष्मीदेवीचा कौल मिळाला होता !–

त्या आश्चर्याच्या धक्यांतून जागा झाल्यावर मी दोन दिवसांनी वस्तादजीकडे गेलों; तेव्हां ते दुकानांत एकटेच होते;....बराच वेळ मी बसलों. त्यांची दत्ताची पूजा चालली होती; मग पेढे, सरबत सर्व झालें; मला रीतसर अत्तराचा बोळा देऊन ते शेवटीं मला म्हणाले–"देखीये मैं एक गरीब आदमी हूं: अभी जाहिरात कृपया बंद रखना !—"

त्यांच्या त्या आदबशीर शब्दांत डोकावणारे आमच्या मराठी मासिकाच्या भवितव्याबद्दलचें अज्ञान मला सहन होईना; तसं पहातां व्यवहारी दृष्टीनें थोडा धोका होता; तरी मी त्यांना मासिक बंद पडल्याची सारी खरी खरी वस्तुस्थिती सांगितली.

'अरर!' एवढे दुःखसूचक शब्द उच्चारून वस्तादजी गप्प झाले; त्यांचा चेहराहि थोडा पालटला.

क्षणभरानें मी हळूच दबल्या आवाजांत विचारलें, "झालेलं बील देणार ना?"

"हां! देना तो जरूर! हरगिज देनाहि पडेगा!" माझ्या प्रश्नावर वस्तादजी पटकन् नि मोठ्यानें म्हणाले; पण मग किंचित थांबून म्हणाले....'परंतु देखीये महाशय, एकदम एक दफेमें तो इतनी रक्कम देना मुझे मुष्किल पडेगा!"

तें नकार घंटेचेंच अपेक्षित परिचित 'सूतोवाच' समजून मी गप्प बसलों.

तेवढ्यांत वस्तादजी दुकान बंद करायला उठत मला म्हणाले—"धक्का खानेकी और तकलीफकी बात होगी! परंतु दर गुरवार शाम को आप इधर कृपा करके आना! घंटा देड घंटा ठेरना....दत्तजीका प्रसाद और शरबत ग्रहण करना!....और जातेवख्त उस्ताद जो कुछ रुपया दो रुपया दे दे गा ये भी लेके जाना! क्या? ख्याल में आया होगा ना?"

तसली वसूली म्हणजे एक तारेवरचा नाचच होता तो; पण त्यांतहि मला एक नवीनच गंमत वाटली. मनांत म्हटलं "कांहीं



पहिला पाळणा!



अनुक्रमणिका

हातीं नाहींच लागलें तर निदान हा वस्ताद किती वस्ताद माणूस आहे तें तरी पाहूं जवळ बसून !—"

मी नमस्कार करून जाऊं लागतांच, दुकानाचें बंद कुलुप एकदोनदां खडखडून पहात, वस्तादजी माझ्याकडे वळून सस्मित म्हणाले—'भूलना नही, महाशय !.... दर गुरुवार शाम !....तकलीफ माफ !....'

× × ×

पुढच्या गुरुवारीं संध्याकाळीं मी काळबा-देवी रस्त्यानें जात असतां मनांत म्हणत होतों ...."कसला सापडतोय् तो वस्ताद—आपण येणार हें नक्की ठाऊक असल्यावर ?"

आणि दुकांनात शिरल्यावरही तोच अनुभव आला. 'वस्तादजी आज येतीलच असं नक्की नाहीं' मला आतां परिचित झालेला त्यांच्या दुकानांतील तो पोऱ्या म्हणाला.

तेव्हां जगांतल्या लबाड अघळपघळ बोल-णाऱ्या व्यवहार मांडून बसलेल्या वस्तादांना मनांतल्या मनांत शिव्या देत थोडया रागांतच परत फिरण्यावाचून मला दुसरें गत्यंतर दिसेना !

पण त्या गूढामुळेंच मात्र तिसऱ्या गुरुवारी वस्तादजींची पुन्हां आठवण झाली.

या यावेळीं वस्तादजी भेटले. आदल्या गुरवारीं बेत ठरवून एक प्रसिद्ध कुस्ती पहा-यला ते गेले होते. मला त्रास पडल्याबद्दल त्यांनी माफी मागितली नि मग त्यांनीं आपण पूर्वी कसकशा कुस्त्या खेळलों होतों, आपले शिष्य कसे आहेत वगैरे विविध रसभरित वर्णनहि केलें.

पण प्रसाद, सरबत नि अत्तर या प्रत्यक्ष गोष्टी नि पुढील गुरुवारचे आणखी एक अप्रत्यक्ष आश्वासन या शिवाय त्या दिवशींही मला कांहीं मिळालें नाहीं !—

त्या दिवशीं परततांना तर पैशाबद्दलची अधिकच निराशा नि जगांतील व्यवहारा-बद्दलची भयंकर खिन्नता माझ्या मनांत भरून आली होती.

× × ×

तरिहि चौथ्या गुरवारीं व्यसनी मनुष्य जसा गुत्त्याकडे जातो तसा (पूर्ण निराशा मनांत ठेऊनच) मी वस्तादजींच्या व्यवहारी गूढाकडे आकर्षिला गेलों.

नेहमीप्रमाणें बऱ्याच गप्पा झाल्यावर शुक्रवारच्या एका भजनी मेळ्याला मला आमंत्रण देऊन ते बैठकीवरून उठले.

पण मग जणूं सहजच खालीं वांकून, पेटींत असलेले सगळेच सहा रुपये त्यांनीं काढले. दोनदां मोजले, आपले खिसे चाचपले नि मग ते सहा रुपये माझ्या हातीं पटकन् देऊन ते म्हणाले,...."आपका तीन गुरवारका हिसाब तो हो चुकाना बाबूजी ?"

त्यावेळीं माझ्या अंगांतून एक अनपेक्षित नि अननुभूत भावनांची लाट उठून गेली. जगांतला तो अनुभव मला स्वप्नवत् नि अग-दींच अतर्क्य वाटत होता—

माझ्या मनांतील आजपर्यंतच्या त्यांच्या-बद्दलच्या कुत्सित कल्पनाबद्दल क्षणभर माझी मलाच भयंकर लाजहि वाटली ! ....मला वाटलं ! "वस्ताद वस्ताद माणूस नाहींत !. वस्ताद माणूस आहेत !"

× × ×

त्या पुढले तीन गुरुवारीं वस्तादजींच्या गप्पा, पेढे, सरबत नि तीन अधिक एक अधिक दोन असे आणखी सहा रुपये इतक्या गोष्टी त्यांच्या खात्यांत जमा झाल्या.

त्या पुढे दोन आठवडे साफ रिते गेले. त्यांतल्या शेवटच्या आठवड्याला वस्तादजींनी त्यांच्या दोन शिष्यांच्या कुस्तीच्या त्यांनी पुढील गुरवारीं ठरवलेल्या समारंभाचें तिकिट मला बक्षीस दिलें.

आपण न भेटण्याची ती त्यांची नोटीसच होती मला. पण मी मात्र गुरुवारीं कुस्ती पहायला जाण्याची चिकाटी ठेवली.

त्यावेळची वस्तादजींची आवेशपूर्ण समर-सता मला मोठी अभिनव नि गमतीची वाटली. आपल्या दोन्ही शिष्यांची बरोबरी झाल्यावर त्यांना दोन बगलेंत कौतुकानें घेऊन ते गर्दीत उभे असतानाच तेथून मी काढता पाय घेतला.

पुढल्या गुरुवारीं त्या कुस्तीविषयीं बोल-ण्यांतच वस्तादजी रंगले होते. त्यांनी किंवा मी कोणीच पैशाची गोष्ट काढली नाहीं.

शेवटीं उठतां उठतां मात्र त्यांनी नवी बातमी मला सांगितली—महिना अखेर हें दुकान काढून टाकून ते कनोजला परत जाणार !

× × ×

खरंच ! माणसाचं मन मोठं स्वार्थी नि गुंतागुंतीचं असतं !

नऊ महिन्यापूर्वी वस्तादजींच्या दुकानांत मी प्रथमच पाऊल टाकलं, तेव्हां मला कस-लीच आशा नव्हती. त्यांनी जाहिरात दिल्या-नंतरच नव्हे तर ती सहा महिने छापून झाल्यावरही मला कसली मूर्त अपेक्षा नव्हती. एवढंच काय पण पहिले तीन गुरुवार त्यांचे पेढे सरबत खाऊन पिऊनही मला कशाबद्दल खात्री नव्हती.

पण तरी देखील त्या पुढील महिन्यांत त्यांनी मला अनपेक्षित बारा रुपये दिले होते. अजून साडेपंधराचा हिशेब उरला असला तरी त्यांचे आतां पर्यंतचें विविध प्रकारचें प्रेमळ आदरातिथ्य मी मनमुराद आस्वादित आलों होतों.

पण मग 'दुकान काढून, मुलखांत जाणार' ही आडपडदा न ठेवतां त्यांनीच सांगितलेली बातमी ऐकल्यानंतरच्या गुरवारीं त्यांच्या दुकानाकडे वळताना एक दुष्ट विचारी संशय माझ्या मनांत वारंवार डोकावत होता—"वस्ता-दजी दुकान सोडून गेलेलेच दिसणार तर नाहींत ना आपल्याला आज ?"

माझ्या त्या स्वार्थी मनांत असं मात्र आलं नाहीं कीं अगदीं पहिल्या अगर पुढच्या कोणत्याहि गुरवारीं (आपलें दुकान आहे तेथेंच कायम ठेवूनहि) वस्तादजींना मला एका क्षणांत वाटाण्याच्या अक्षता व काळबा-देवीचा रस्ता दाखवता आला असता !

× × ×

पण माझं मानवी मन तसं कितीहि वाकड्यांत शिरलं तरी वस्तादजी मात्र आज मी तिथें पोंहचण्यापूर्वीच् दुकानांत येऊन बसले होते.

आजहि दर गुरुवारप्रमाणेंच सर्व झालं; नि शेवटं ते माझ्याकडे सस्मित पहात म्हणाले "हा ! अभि कुछ् कहिये, महाशय !"

पूर्वीपूर्वी बराचवेळ आमच्या गप्पा झाल्या होत्या; त्यांत आपला जाण्याचा बेत नक्की झाल्याचंच त्यांनी मला पुन्हां सांगितलं होतं.

" एकाकी मनुष्य; एक लहानसं मालकीचं घर; लहानपणापासून तालमीचा नाद, आपला एक आखाडा होता. एका चुरशीच्या कुस्तींत उजव्या पायाचं हाड मोडलं; तीन वर्षांपूर्वी औषधोपचारासाठीं मुंबईंत आलों. मालीश वगैरे उपचार चालू असतां दिवसभर मनाला करमणूक म्हणून हें दुकान काढलं; एक कनोजी मित्र अत्तराचा धंदा करतो म्हणून दुकानांत अत्तरें ठेवली. तीन वर्षांत मुंबईंतही मित्र झाले. भजनी मेळे केले. कुस्त्या पाहिल्या, करवल्या; आतां पाय जरा बरा आहे; तेव्हां मुलखाला परत जाण्याचे दिवस आले. स्वतः कुस्ती नाही यापुढें मारता येणार. पण कुस्ती मारणारे जवान तालमेंत तयार करूं! उरला-वेळ साहित्य वाचूं!—हाच आतां आपला आवडता धंदा!—" वगैरे ते खूप बडबडले होते.

माझा त्यांचा आतां इतका परिचय झाला होता, कीं तें ऐकल्यावर त्यावेळीं एकादा नातेवाईकच दूर देशाला कायमचा जात असावा इतकं दुःख वाटत होतं मला!—

× × ×

पण तेवढ्यांत पेटी उघडून वस्तादजींनी एक दहा रुपयांची नोट चटकन् माझ्या पुढे केली—नि ते म्हणाले—" आप कहोगे वस्तादजी बहोत बूरा आदमी था! माफ कीजीयेगा, बाबूजी! आपको मेरेलीये बहोत तकलीफ उठाने पडी!—अच्छा! तो आते गुरवार भी आप आना! आपकी बाकी सब आने पै तक चूकती होगी!"

ती नोट नि वर आणखी वस्तादजींचे ते शब्द ऐकून मात्र माझं हृदय पार विरघळलं!—अगदीं अभावितपणें माझ्या डोळ्याच्या कडाहि ओल्या झाल्या.

मी जरा घसा खाकरून म्हटलं,—" असं काय बरं, वस्तादजी? अगदीं सारंच्या सारं देऊन असं लाजवूं नका, बुवा! आतां उरलेला साडेपांच रुपयाचा हिशेब स्नेहाखातर सोनडू टाकण्याची तरी संधी मला द्या! माझ्यावर मोठे उपकार होतील आपले!—"

वस्तादजी हंसले व म्हणाले—" अच्छा, महाशय! जैसी आपकी मर्जी!—मै भी मुलुखमे आपके ये दामकी और आपकी कभी कभी यांद करूं गा!—"

× × ×

नि पुढल्या गुरुवारीं मी केवळ स्नेही या नात्यानें शेवटच्या भेटीसाठीं वस्तादजींच्या दुकानाकडे वळलों.

दत्ताचे पेढे, सरबत, उदबत्तीचा घमघमाट नि वस्तादजींच्या अत्तरांचा बोळा! सर्व आतां माझ्या अगदीं अंगवळणीं पडलं होतं! त्यांच्या दुकानांत मला नेहमीं नर-नारायणाची भेट झाल्यासारखं वाटे!—

पण तेथें गेलों तो दुकानाला कुलुप होतें; दारावर पाटी होती—' दुकान भाड्यानें देणें आहे '

कुठले वस्तादजी नि कुठला मी?—कुठल्या कारणानें आमची ओळख झाली? वाढली-संपली!—नि आतां वस्तादजी मुलखाला गेले. माझी त्यांना आठवण कधीं कधीं होईल असे ते म्हणाले होते खरे! पण व्यवहारा शिवाय त्यांच्या बाबतींत मी कांहींच केलें नव्हतें माझी त्यांना आठवण यायला!

पण त्यांनी मात्र माझ्यापाशीं असामान्य औदार्य, प्रेम नि माणुसकी दाखवली होती! अगदीं व्यवहारांतसुद्धां तें असामान्य माणुसकीनें वागले होते!

व्यवहाराच्या दारांतूनच ते माणूस म्हणून माझ्या मनाच्या घरांत शिरले होते!

नि म्हणूनच—चालू आयुष्यांतल्या कठोर व्यवहाराची झळ मला कधीं असह्य झाली नि मन अगदीं बेचैन झालं.... किं दरनाहीं तरी निदान एखाद्या गुरवारीं तरी मी मुद्दाम एक नंबरच्या ट्रामनें त्या बाजूस जातो; नि ते परिचित चिंचोळें दुकान जवळ येऊं लागले किं तिकडे भिरभिऱ्या दृष्टीनें खिडकींतून पाहूं लागतो.

त्याचें बदलेलें बाह्य स्वरुप माझ्या दृष्टी समोरून विरतें; नि तेथें माझ्या दृष्टीला वस्तादजींची ती भव्य प्रेमळ मूर्ती पेहलवानी थाटांत तिथल्या गादीवर बसून येणाऱ्या जाणाऱ्यांना अत्तरानें चपचपलेले बोळे वाटत आहे, सरबत पेढे आग्रहानें देत आहे, उदबत्ती—कापूर दत्ताभोंवतीं ओवाळत आहे, असा सारखा भास होतो.

—आणि म्हणूनच ट्राम पुढें निघून जाऊं लागली तरी सारखें पुन्हा पुन्हा मागें वळून मी स्वतःशींच मनांतल्या मनांत म्हणतो—"हं! पाहिलंस?—हेंच हो तें उस्तादजींचें देऊळ!!"



लग्न पहावं करून!

# गणितांतलें जिणें

गुणिताच प्रीती भागली-अधिकात व्हायाचें उणे
दृढभाजकी संयोग हा-गणितांतलें माझें जिणें
व्यवहारि अव्यवहार कीं-पूर्णांकही अपुरा पडे
अधिकार कर्मा तेवढा-संख्या न वाढावी पुढे
ती शून्यता अंकांतली-एकाविना गणि का कुणी
सौभाग्य भागीदार मी-क्षण कुंकवाचा कीं धनी
निस्संग प्रीतीरंग ते-अंगावरी या घेतले
तरि हातचें राखोनिया-मी हात हातीं घेतले
आनंद आसूं गुंफिती-क्षणभंगुरा मुंडावळी
ती वंशवेली कोवळी-जरठास या गुंडाळली
पूजा वयातें ना गुणा-तरि पाहिलें जातीकुल
पिकल्या शिरीं या झेलिले-मी सावधानी तंडुल
भुजबंधनांतिल भूमिती-ना बीजगणितानें तुटे
सहजीवनीं सहजीं मला-कंसांतलें कोडे सुटे !

विवाहित ब्रह्मचर्याश्रम
—सेवाग्राम
१९-८-१९४५

—राजा वढे








# ★ ★ ★ मुलाखती ? उं:, त्यांत काय आहे ? ★



: लेखक :

त्र्यं. वि. पर्वते

" मुलाखती घेण्याच्या तंत्राचा कांहीं विशेष अभ्यास तुम्हीं केलेला आहे ही गोष्ट तुमच्या 'मीं घेतलेल्या मुलाखती' या पुस्तकावरून स्पष्टच आहे. "

× × ×

" लंडन स्कूल ऑफ जर्नलिझममध्यें मुलाखती घेण्याच्या कलेचे कांहीं खास शिक्षण दिलें जातें काय ? मुलाखती घेण्याची आपली आकर्षक व चतुर शैली असल्या कांहीं खास शिक्षणाचें फल दिसतें ! "

× × ×

" मुलाखती घेण्याच्या तंत्राचा अभ्यास करावा अशी फार इच्छा आहे. यासाठीं तुम्ही वाचलेल्या ग्रंथांचीं नांवें कृपा करून सांगाल काय ? "

× × ×

" आपण जेव्हां एखाद्या मुलाखतीसाठीं जाल तेव्हां मेहेरबानी करून मला बरोबर येऊं द्या. म्हणजे आपण आपलें काम कसें करतां याचा वस्तुपाठच मला पाहायला सांपडेल. "

× × ×

गेल्या पांच वर्षांत मला आलेल्या अनेक पत्रांतील मजकूरांतून वरील चार वाक्यें इतस्ततः उतरून घेतलेलीं आहेत. खाजगी संभाषणांत आणि दोनतीन वेळां व्याख्यानप्रसंगींहि मजवर वरील वाक्यांत करण्यांत आलेल्या प्रश्नांचाच भडिमा करण्यांत आलेला आहे. चांगली मुलाखत लिहिणें म्हणजे एखाद्या चाकबगार आणि समंजस रिपोर्टराचें काम आहे आणि याहून जास्त असें कांहीं तंत्र, कांहीं दीर्घकालीन अभ्यास, कांहीं लठ्ठ इंग्रजी पुस्तकांचें पठण आणि लंडन स्कूल ऑफ जर्नलिझममधील वर्षदोन वर्षांचा अभ्यास अशा प्रचंड तपश्चर्येची त्या साठीं जरूरी आहे असें मला कधींच वाटलेलें नाहीं. यांपैकीं कांहींहि मी केलेलें नाहीं आणि मुलाखतींचें काम मी जें प्रथम केलें तें देखील केवळ योगायोगानें. तेव्हां तंत्राची, ग्रंथांची, अभ्यासाची वगैरे वगैरे माहिती मी सांगूं तरी काय ?

माझ्या सगळ्या पत्रलेखकांना आणि इतर जिज्ञासूंना मी एकदम सांगून टाकतों कीं या कामाचा एखादा आडाखा अगर ठोकताळा कांहीं मी बसविलेला नाहीं. मुलाखती कशा घ्याव्या या विषयावर एक देखील इंग्रजी अगर मराठी पुस्तक वाचलेलें नाहीं. त्यांत कांहीं खास तंत्र आहे असें मला वाटत नाहीं. फार काय पण या विषयावर कांहीं पुस्तकें आहेत किंवा काय हेंहि मला माहीत नाहीं. १९३७ सालीं 'चित्रा' पत्रांत काम करीत असतां रांगणेकर, काणेकर, प्रभाकर पाध्ये, दत्तु बांदेकर, शामराव ओक या मंडळीचा प्रथमच परिचय झाला. हे सर्व 'चित्रा'चे संपादक, उपसंपादक, लेखक होते. 'प्रकाशांतील व्यक्ति' हा त्या पत्रांतील एक रकाना भरण्याचें काम मजकडे होतें. त्यांतील







अनुक्रमणिका

मजकूर वाचून रांगणेकरांना व या मित्रांना वाटलें कीं हिन्दुस्तानांतील आणि महाराष्ट्रांतील सार्वजनिक कार्यकर्त्यांच्या व्यक्तिविशेषांचा व कामगिरीचा माझा अभ्यास बरा आहे आणि या समजुतीच्या बळावर त्यांनीं तेव्हां 'चित्रा' मध्यें प्रसिद्ध झालेल्या व पुढें पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालेल्या मुलाखती घेण्याचें काम मजवर सोंपविलें. 'चित्रा' मध्यें व पुढें 'आशा' मध्यें प्रसिद्ध होणाऱ्या मुलाखतींवर माझें लेखक म्हणून नांव देखील नसे. रांगणेकर अथवा काणेकर त्यांचे लेखक होते असें पुष्कळ लोकांस वाटत असे आणि पुस्तकरूपानें त्या मुलाखती छापल्या गेल्या म्हणूनच मी पत्रकाराचा ग्रंथकार तरी झालों!

प्रथमच मीं जी मुलाखत घेतली ती श्री. मुकुंदराव जयकरांची. या पहिल्याच मुलाखतीनें वाचकवर्गावर फार चांगली छाप पडली. माझे सहकारीहि फार खूष झाले. 'व्यक्तिचित्रें' रंगविण्याचा एक नवा प्रकार आणि वाङ्मयीन कलेचा आविष्कार म्हणून या मुलाखतीचें, तत्त्वचर्चेसाठीं सदा भुकेलेले असलेले श्री. प्रभाकर पाध्ये यांनीं स्वागत केलें आणि अशी कांहीं तात्विक उपपत्ति त्यांनीं 'मीं घेतलेल्या मुलाखती' या पुस्तकावर अभिप्राय म्हणून लिहिलेल्या एका मोठ्या लेखांत बसवून दाखविली आणि तिचा बराच विस्तार श्री. हरि विठ्ठल देसाई यांच्या 'मोठ्यांच्या मुलाखती' या पुस्तकाला लिहिलेल्या प्रस्तावनेंत केला. त्यावेळीं देखील 'मीं घेतलेल्या मुलाखतीं'चा गौरवपर उल्लेख त्यांनीं केला आणि या सगळ्याचा परिणाम म्हणूनच कीं काय, मला लेख लिहिण्याची विनंती करतांना कोणत्याहि मासिकाचा अगर साप्ताहिकाचा संपादक मला फक्त मुलाखतीचेंच काम सांगूं लागला, जणूं कांहीं लेखनाचा दुसरा प्रकार मला येतच नाहीं!

मलाहि आतां असें वाटूं लागलें आहे कीं, 'होतकरू तरुणांस' उद्देशून, त्यांच्यापासून चार हात लांब अंतरावर खुर्चीवर बसून व ते बांकावर बसले आहेत असें समजून 'बहारदार मुलाखत कशी घ्यावी' या विषयावर अनुभवी आणि मुरब्बी उस्तादाच्या पवित्र्यांत आणि थाटांत चार पांडित्यपूर्ण गोष्टी सुनवायला हरकत नाहीं. क्षणभर मला असेंहि वाटलें कीं लंडन आणि न्यूयॉर्क येथें या विषयाचें खास शिक्षण संपादन करून मी आलों आहे ही कांहीं मंडळींची गैरसमजूत देखील तशीच राहूं द्यावी!

परंतु खरोखर असल्या ढोंगबाजींत कांहीं अर्थ नसतो. मुलाखती घेणाऱ्या मनुष्याजवळ कांहीं कसब असलें पाहिजे ही गोष्ट खरी. परंतु हें संपादन करणें फार कठीण आहे असें मात्र मला मुळींच वाटत नाहीं. सभांचे, संमेलनांचे, काँग्रेसच्या अधिवेशनांचे, कोर्टांतील खटल्यांचे, अग्निप्रलय, जलप्रलय, दंगेधोपे, भूकंप वगैरे प्रसंगीं सर्व हकीकती व्यवस्थितपणें लिहून काढणें ज्यांना जमतें त्यांना मुलाखती लिहिणें कठीण वाटण्याचें विशेष कारण नाहीं. मुलाखती घेणें आणि आकर्षक रीतीनें त्या सजवून मांडणें हा रिपोर्टिंगचाच एक प्रकार आहे. मात्र आपण स्वतःच लिहून, टंकलिखित करून रिपोर्टरांच्या हवालीं स्वतःच्या कैफियतीच जेव्हां पुढारी मंडळी करतात व हें सर्व मुलाखतींत सांगितलें गेलें असा बहाणा वर्तमानपत्रें करतात तेव्हां त्या यांत्रिक प्रकाराला मुलाखत म्हणणें योग्य ठरणार नाहीं!

मुलाखत म्हटली म्हणजे या साचेबंद प्रकारापेक्षां पुष्कळच निराळी असली पाहिजे. माझ्या मतें ज्या व्यक्तीची मुलाखत असेल तिच्या कांहीं स्वभावविशेषांचें, खास लकबींचें, हावभावांचें दर्शन त्यांत वाचकाला घडलें पाहिजे. दोन व्यक्ति एकमेकांशीं बोलत आहेत, सवालजबाब करीत आहेत, एकमेकांना मधेंच अडवीत आहेत, उत्तरें प्रत्युत्तरें होत असतांना कांहीं थट्टा विनोद होत आहे, कांहीं हर्षामर्षाचें प्रदर्शन घडत आहे, कोठें भावनेचा, कोठें तर्ककर्कशतेचा, कोठें करुणरसाचा परिपोष वगैरे होत आहे असें वाचकाला अनुभवितां आलें पाहिजे. मुलाखत म्हणजे ती एखाद्या एकांकिकेसारखी अथवा चित्रपटाच्या एखाद्या रीलसारखी म्हणजेच ज्या व्यक्तीची मुलाखत असेल तिच्या चरित्राची अंशतः तरी ओळख पटविणारी असली पाहिजे. कादंबरीकाराचें, कथालेखकाचें, नाटककाराचें कौशल्य थोड्या बहुत प्रमाणांत मुलाखती लिहिणाराचें अंगीं असलें पाहिजे असें म्हटलें तर माझ्या म्हणण्याचा अभिप्राय स्पष्ट होईल असें मला वाटतें.

एका अर्थानें, कादंबरीकार, कथालेखक अथवा नाटककारापेक्षां मुलाखतलेखकाचें काम कठीण आहे. आपल्याच कल्पनेनें स्वतःच्या खोलींत बसून अनेक पात्रांच्या कल्पना वसवून त्यांच्या स्वभावांचें चित्रण संभाषणांत आणि इतर वर्णनांत इतरांना करतां येतें. मुलाखत लिहिणाराला अगदीं पहिली अवश्य गोष्ट म्हणजे दुसऱ्याशीं नीट वागतां आलें पाहिजे. तिरसट, तुसड्या, रागीट, स्वतःच्या मनावर कबजा नसणाऱ्या, प्रसंगावधान नसणाऱ्या, संभाषणाची कला न जाणणाऱ्या, थोडक्यांत म्हणजे अव्यवहारी माणसाला मुलाखतीचें काम चांगलें करतां येणार नाहीं. आपल्यापेक्षां मोठ्या दर्जाच्या माणसाला भेटायचें असो अथवा आपल्यापेक्षां खालच्या दर्जाच्या इसमाला भेटायचें असो, त्याची नाखुषी झाली म्हणजे मुलाखत बिघडलीच. त्याची खुषामत करूं नका, पण त्याची मुलाखत घ्यायला आपण जातो याचा अर्थच त्याचें महत्त्व अगर मोठेपण मानतों असा आहे आणि असें त्या माणसाला करायला लावण्याचें कौशल्य तुमच्या वागणुकींत, बोलण्याचालण्यांत असलें पाहिजे, निदान तसा अविर्भाव पाहिजे. असें असले तरच तो माणूस

तुमच्याशीं मोकळेपणानें बोलेल, संकोच सोडून वागेल व आपल्या व्यक्तित्वाचें अंशतः तरी प्रदर्शन होऊं देईल आणि मगच तुम्हांला तुमच्या लेखनसामर्थ्याला, स्वाभाविचित्रणाला व्यक्तता देतां येईल. अगदीं थोडक्यांत व रोजच्या भाषेंत बोलायचें म्हणजे तुमचा स्वभाव चांगला असला पाहिजे. तुम्ही स्वाभिमानी असलां तरी अहंमन्य असून चालणार नाहीं, तुम्ही चांगले बोलणारे असलां तरी दुसऱ्याला तुम्ही बोलूं दिलें पाहिजे, ज्ञानी असलां तरी दुसऱ्याकडून घेण्यासारखें नेहमींच असतें अशी वृत्ति ठेवली पाहिजे. थोडक्या परिचयांत, थोडक्या वेळांत, दुसऱ्याचें मनोगत समजून घेणें व सत्याशीं प्रतारणा न करतां तें कागदावर वठविणें आणि असें करतांना त्यांत कांहीं रसिकता दाखविणें, रंजकता आणणें याचेंच नांव चांगली मुलाखत लिहिणें.

या कसोटीवर मीं लिहिलेल्या पुष्कळशा मुलाखती उतरणार नाहींत याची माझी मला चांगली जाणीव आहे. परंतु कांहीं नक्की उतरलेल्या आहेत असा माझा मला पुरा भरंवसा आहे. 'मीं घेतलेल्या मुलाखती' या पुस्तकांत छापलेल्या मुलाखतीं-खेरीज आणखी पुष्कळ मुलाखती मीं मराठी व इंग्रजी या दोनहि भाषांत लिहिल्या. त्यांतील पुष्कळ अगदीं तांत्रिक स्वरूपाच्या आहेत. कांहीं केवळ एकाच विषयावरील मतें मिळविण्याच्या दृष्टीनें, दुसऱ्याच्या सांगण्याप्रमाणें व गरजेप्रमाणें केलेल्या आहेत; म्हणजे त्या करण्याला मी सर्वस्वीं स्वतंत्र नव्हतों. त्यांना वर उल्लेखिलेला निकष मुळींच लागूं पडणार नाहीं. इतकी गोष्ट मात्र खरी कीं मुलाखत घेण्यासाठीं गेलों आणि लिहिण्यासारखें कांहीं मिळालें नाहीं असें मात्र गेल्या सहासात वर्षांत, या कामाला सुरवात केल्यापासून कधींच झालेलें नाहीं.

याला अपवाद असा एकच घडला. म्हणजे मुलाखत मिळाली नाहीं असें नव्हे; ती मिळाली. पण प्रश्नांचीं उत्तरें देणारा गृहस्थ असा भेटला कीं तीं देण्यापासून इष्ट विषयाचें कांहीं ज्ञान होण्याला त्याचा कांहींच उपयोग होऊं नये. परंतु हा उद्देश जरी सफल झाला नाहीं तरी याच कारणामुळें सदरहू गृहस्थाच्या व्यक्तिमत्वावर मात्र त्यामुळें उत्तम प्रकाश पडतो. कोण असतील हे राजश्री असें वाचकांना वाटतें ? दुसरेतिसरे कोणी नसून महंमदअल्ली (जिना) झीणा हेच ते प्रख्यात गृहस्थ होत. आजवर शेंपाऊणशें, समाजांत अगदीं उच्च पदवी पावलेल्या, लोकांना मी भेटलों असेन. त्यांत कोणी चांगले बोलके, कोणी मोजकें बोलणारे, कोणी अगदीं अबोल, कोणी हजरजबाबी, कोणी कंटाळवाणें बोलणारे, कोणी थोडक्या शब्दांत पुष्कळ अर्थ व्यक्त करणारे, कोणी पुष्कळ बोलून फार थोडा अर्थ होईल असें बोलणारे असे सगळे प्रकार मीं पाहिले आहेत. परंतु सर्व प्रश्नांचीं उत्तरें देऊनहि मुलाखत घेणाराला नाखूष करून परत पाठविणारा, अत्यंत परीटघडी सभ्यपणानें





वागूनहि उद्वेग उत्पन्न करणारा, एकहि वावगा शब्द न काढतां चीड येईल असें वर्तन करणारा असा हाच एक गृहस्थ मला आढळला. या मुलाखतीच्या पूर्वी देखील श्री. झीणा यांना दोनतीन वेळां मी भेटलों आहे. परंतु तेव्हां त्यांचा अनुभव चांगला आला. एकदां तर ते अगदीं खेळकरपणें क्रान्ति व समाजवाद यांसारख्या विषयांवर बोलले होते. परंतु यावेळींच त्यांच्या मानेस कोणतें भूत बसलें होतें कोण जाणे !

म्हणजे त्याचें असें झालें कीं, 'फिल्मिंडिया' या इंग्रजी मासिकासाठीं देशांतील थोर स्त्रीपुरुषाच्या मुलाखती घेण्याचें काम त्या मासिकाचे संपादक श्री. बाबुराव पटेल यांनीं मला सांगितलें होतें. सुमारें पंचवीसतीस ठळक स्त्रीपुरुषांना भेटलों. मुलाखती एकाच विषयासंबंधीं होत्या. हिन्दी चित्रसृष्टि, तिची सध्यांची परिस्थिति, त्या सृष्टीमध्यें अनेक विभागांत काम करणारे स्त्रीपुरुष, जनतेच्या त्यांच्याविषयींच्या आकांक्षा आणि ही चित्रसृष्टि भविष्यकालांत समाजाला जास्तींत जास्त उपयुक्त होण्यासाठीं काय केलें पाहिजे या बाबतच्या कल्पना असें अनेक मुद्दे या मुलाखतींत चर्चेसाठीं घेतलेले होते. त्याप्रमाणें डॉ. राधाकृष्णन्, नेकनामदार जयकर, डॉ. आंबेडकर, सर रूस्तुम मसानी, श्री. बाळासाहेब खेर, श्री. विनायकराव सावरकर, श्री. वल्लभभाई पटेल, श्री. खुर्शेद नरीमान, सर चिमणलाल सेटलवाड, श्री. वालचंद हिराचंद, डॉ. मुळगांवकर, नेकनामदार श्रीनिवास शास्त्री, श्री. राजगोपाळाचारिअर, डॉ. श्यामा प्रसाद मुकर्जी, श्री. जम्नादास मेहता, श्री. युसुफ मेहेर अली, श्री. रशीद अली बेग, श्री. कनयालाल मुनशी, श्री. मिनू मसानी, सर सीताराम पाटकर, श्री. तात्यासाहेब केळकर यांसारख्या थोर पुरुषांच्या मुलाखती मीं घेतल्या. श्री. हॉर्निमन्, सर स्टॅफर्ड क्रिप्स आणि श्री. व्हेरिअर एल्विन यांसारखे इंग्रजहि त्यांत होते. सर तेजबहादूर सप्रू, सर सी. पी. रामस्वामी अय्यर आणि सर चिंतामण देशमुख यांसारख्या लोकांनीं सवडीप्रमाणें या विषयावर आपले विचार व्यक्त करण्याचें आश्वासन दिलेलें आहे. श्री. सरोजिनी नायडू, श्री. कमलादेवी चट्टोपाध्याय व श्री. सोफिया वाडिया यांच्याहि मुलाखती घेऊन मी प्रसिद्ध केल्या. परंतु श्री. जिना हे एकच गृहस्थ असे भेटले कीं त्यांची भेट व बोलणेंचालणें होऊन देखील मुलाखतींत लिहायला मजकूर असा कांहीं मिळाला नाहीं ! लिहितां लिहितां आतां आठवण होत आहे कीं डॉ. गोपाळराव देशमुख हे एक असेच तऱ्हेवाईक गृहस्थ भेटले. दोन दिवस सगळी चर्चा यथासांग झाली. मुलाखत लिहून काढली. त्यांनीं वाचून पसंत केली आणि अखेरीस ही मुलाखत छापायची नाहीं असें फर्मान त्यांनीं काढलें. मला तरी हा प्रकार शुद्ध लहरीपणाचा वाटला, मग डॉ. देशमुखांचीं कारणें कांहींहि असोत.

डॉ. देशमुखांना येथेंच सोडून आपण आतां झीणासाहेबांचा समाचार घेऊं या. श्री. झीणा यांनीं एका सकाळीं नऊ वाजतां त्यांच्या मलबार हिलवरील बंगल्यावर बोलविलें होतें. त्याप्रमाणें मी वेळेवर गेलों. त्यांच्या दरवानानें मोठ्या अदबशीरपणें मला लायब्ररींत नेऊन बसविलें व साहेब घुसळखान्यांत म्हणजे स्नानगृहांत आहेत असें सांगितलें. सुमारें एक तास त्यांचें स्नान संपून, नवीन कपडे पेहरून मुलाखतीला तयार होण्याला त्यांनीं घेतला ! एका लहानशा खोलींत आरामखुर्चीवर ते बसले होते. पाय एका लहानशा तिपाईवर ठेवून, 'टाइम्स ऑफ इंडिया' चा त्या दिवसाचा अंक हातांत घेऊन ते बसले होते. खोलींत शिरतांच त्यांना मी 'शुभ प्रभात' चिंतिली. त्यांनीं उलट तोच प्रकार केला, एका खुर्चीवर समोर बसायला सांगितलें आणि आपल्या-हातून माझी काय सेवा होण्यासारखी आहे तें मला विचारलें. सगळें संभाषण इंग्रजीमधून झालें हें सांगायला नकोच. त्याचा मराठी तर्जुमा जशाचा तसा खालीं देत आहे.

"फिल्मिंडिया'च्या वतीनें आपली मुलाखत घेण्यासाठीं मी आलों आहे. हिन्दी चित्रपटसृष्टीबाबत आपलीं मतें समजावून घेण्याचा इरादा आहे. 'फिल्मिंडिया' नें अनेक थोर हिन्दी स्त्रीपुरुषांचीं मतें याबद्दल घेतलीं आहेत. डॉ. राधाकृष्णन्, श्री. जयकर, श्री. सरोजिनी नायडू, राजाजी वगैरेंना आतांपर्यंत मी भेटलों आहे."

सुरुवातीचीं चार वाक्यें बोलतां बोलतां 'फिल्मिंडियाचा' त्यावेळचा ताजा अंक मी त्यांच्या हातीं दिला. तो उघडूनहि न पाहातां अथवा त्यांच्या उत्तम छपाईबद्दल तरी किमान पक्ष, शिष्टाचाराचे दोन शब्दहि न काढतां, ते म्हणाले, "मला बोलपटांबद्दल कांहींच समजत नाहीं आणि कांहीं उपयुक्त असें बोलण्याची माझी पात्रता आहे असें मला वाटत नाहीं आणि म्हणून तुम्ही मला माफी करायला पाहिजे." झीणांनीं पहिल्याच उत्तरांत मी आपला गाशा गुंडाळावा अशी करामत लढविली होती.

"आपण केव्हां ना केव्हां कांहीं देशी अगर विलायती बोलपट पाहिलेले आहेत आणि तितक्या भांडवलावर राधाकृष्णन्, जयकर, सरोजिनीबाई यांना जसे आपले विचार व्यक्त करतां येतात तसे आपल्याला करतां येण्याला हरकत नसावी असें मला वाटतें" संभाषण चालू ठेवून कोठें तरी त्यांना पकडतां यावें अशा उद्देशानें मी म्हणालों.

"त्या थोर मंडळींना जें परवडलें तें मला परवडलेंच पाहिजे असें कसें म्हणतां तुम्ही ? त्यांना कांहीं सांगतां आलें असेल. मला येत नाहीं."

"आपण कधीं सिनेमा पाहतच नाहीं कां ?"

"क्वचित पाहतों."

"विलायतेंत असतांना आपण पुष्कळ अमेरिकन, इंग्रजी, रशियन, फ्रेंच असे पुष्कळ चित्रपट पाहिले असतील."

"कांहीं पाहिलें होते, पण त्यांची नीटशी आठवण नाहीं."

डरोथी लामर या नटीचें काम ज्यांत आहे असा कोणताहि चित्रपट श्री. झीणा चुकवीत नाहींत अशी मला ऐकून पण खात्रीलायक माहिती होती व त्या जोरावर मी माझे प्रश्न चालूच ठेविले.

"अलीकडे आपण कोणताहि देशी चित्रपट पाहिला नाहीं ?"

"नाहीं."

"पडोसी म्हणून एक प्रभात कंपनीनें थोडे दिवसांपूर्वी चित्र काढलें होतें तें पाहिलें होतें कां ?"

"नाहीं."

"त्याचा कांहीं बरावाईट लौकिक, त्याचें कथानक वगैरेबद्दल कांहीं आपल्या कानावर पडलें आहे ?"

"नाहीं."

"सध्यां शहरांत 'कबीर' या नांवाचा कबीर या हिन्दु-मुसलमानांना सारखाच पूज्य असलेल्या अवलियाच्या चरित्रावर निघालेला एक बोलपट चालू आहे हें आपणांस माहीत असेलच ?".

"नाहीं. माहीत नाहीं."

"आपल्या हातांत तो 'टाइम्स'चा अंक आहे त्यांत त्याची जाहिरात आहे व रोज येत असते."

"असेल. मी वर्तमानपत्रांतील जाहिराती वाचीत नसतों."

"हा चित्रपट 'मिनर्वा' थिएटरांत आहे. आपण तो पाहावा अशी शिफारस मी आपणांला केली तर मर्यादेबाहेर बोललों असें आपणांस वाटणार नाहीं ना ?"

"या शिफारशीबद्दल मी तुमचा फार आभारी आहे."

"हा चित्रपट आपण सवडीप्रमाणें पाहून यावा अशी मी आशा करतों. पाहिल्यानंतर मला जर फिरून आपणांस भेटण्याची संधि मिळाली तर बरें होईल."

"'कबीर' पाहण्याचें माझ्या हातून घडेलच असा मला भरंवसा नाहीं. त्यावर विसंबून आपले बेत आंखूं नका. तुम्हाला आणखी काय विचारायचें तें विचारा."

"बरें तें असो. हिन्दी चित्रसृष्टींत प्रत्येक विभागांत हिन्दु व मुसलमान एकत्र काम करतात, भांडवल एकत्र घालतात, डायरेक्टर-प्रोडयुसर एकत्र असतात. नटनटी, यंत्रविशारद, तंत्रविशारद, छायालेखक, ध्वनिलेखक सरमिसळ हिन्दु व मुसलमान असतात हें आपल्या लक्षांत आलेलें असेलच ?"

"नाहीं. तशी हिन्दी चित्रपटांच्या धंद्याची मला बारीक माहिती नाहीं. पण तुम्ही सांगतां तेव्हां तशी स्थिति असण्याचा संभव आहे."

"हाच प्रकार हिन्दी राष्ट्रीय जीवनांतहि सरमिसळपणें दृष्टीस पडतो असें आपल्याला वाटत नाहीं काय?"

"हिन्दी चित्रपटसृष्टीच्या धंद्याशीं याचा कांहीं संबंध पोंचत नाहीं. तुमच्या मुलाखतीचा हा विषय आहे काय?"

"प्रत्यक्षपणें नाहीं. पण सार्वजनिक जीवनाचें प्रतिबिंब चित्रसृष्टींतहि पडलें आहे असे दाखविण्यापुरता आपल्या मताचा उपयोग मला होईल कदाचित्."

"तो विषय स्वतंत्र आहे. हिन्दु व मुसलमान, सामाजिक जीवनांत सरमिसळपणें वागत नाहींत व वागणें अशक्य आहे असें माझें मत आहे. या मताप्रमाणें पाहातां चित्रसृष्टींत तुम्हीं सांगतां तसा प्रकार असेल तर तो अपवादच गणावा लागेल."

"पण आपलें मतच सत्याचा अपलाप असेल तर?"

"मी दिलगीर आहे मिस्टर पर्वते. परंतु याचा ऊहापोह करण्याची माझी इच्छा नाहीं."

"ठीक आहे. आपणास मी दिलगीर करूं इच्छीत नाहीं. ... पटांचा उपयोग, विशेषतः छोट्या छोट्या पटांचा उपयोग ...क्षणकार्यांत, प्रौढांच्या शिक्षणाच्या कामांत, प्रचारकार्यांत परिणामकारकपणें करतां येईल हें तरी आपणांस मान्य आहे?"

"मी शिक्षणतज्ञ अथवा प्रचारकहि नाहीं. तेव्हां त्याबद्दल तरी अधिकारानें काय सांगूं?"

"बरं तर, झीणासाहेब, मग आपला निरोप घेणें मला प्राप्त आहे. आपला व्यर्थ वेळ कां घेऊं? पण आपण मला निराश केलें येवढें स्पष्ट सांगूं द्या."

"त्याबद्दल मी दिलगीर आहे आणि माझा नाइलाज आहे."

गुडबाय आणि शेकहँड करून मी झीणांच्या बंगल्याबाहेर पडलों. माझा असा पक्का ग्रह झाला कीं या हट्टी मनुष्यानें आपल्या पाकिस्तानी भूमिकेला विरोधी असें कांहींहि आपल्या ओंठाबाहेर पडूं द्यायचें नाहीं असा निश्चय केला होता आणि म्हणूनच होतां होईतों सगळे जबाब एका नकारघंटेनेंच व्यक्त करण्याचा क्रम त्यांनीं ठेविला. तेव्हां, मुलाखती घेण्याचा प्रयत्न करणारानें असल्या प्रसंगालाहि तयार असायला पाहिजे. समोर बसलेला मनुष्य कांहीं सांगायचेंच नाहीं अशा निश्चयानें आसन ठोकून बसला म्हणजे तुम्ही केवढेहि कुशल संभाषक, चतुर लेखक अथवा मनुष्यस्वभावाचे निरीक्षक असलां तरी कराल काय?

---











पर्ल कंपनी, आयौषधी कारखाना, मुंबई २७.







"खरंच माणसाचं कांहीं सांगतां येत नाहीं." असा एक नेहमींचाच विचार माझ्या मनांत परवा मेट्रोमध्यें बसलों असतांना आला. आणि त्याला कारण माझ्या समोरच्याच रांगेंत बसलेलें नवपरिणीतसें दिसणारें एक दांपत्य. सिनेमा पाहावयास जाणाऱ्यांना अनेक मनोरंजक व 'दिलखेचक' प्रसंग पहावयास मिळतात हा माझा जुना आणि जाणीता अनुभव असल्यामुळें सिनेमा सुरूं होण्यापूर्वी १०–१५ मिनिटें तरी अगोदर जावयाचें व सभ्यतेच्या कक्षेंत राहून आजू बाजूच्या लोकांचें निरीक्षण करावयाचें हा माझा शिरस्ता. प्रेक्षकांपैकीं कांहींच्या चर्ये वरून व त्यांच्या हालचालीवर योग्य पाळत ठेवणाऱ्या द्रष्ट्याला तेथें अनेक १०० टक्के नाचती, गाती व केव्हां केव्हां रंगीनहि कथानकें सुचावयास हरकत नाहीं.

पण हो, त्या दांपत्याचे काय झालें? त्याचं असं, मला त्या दोन तरूण व्यक्तींना पाहून जरा समाधान वाटलं. कारण त्यांपैकीं जी नववधू होती ती माझ्या एका मित्राच्या मालकीच्या चित्रपट-कंपनींत 'एक्स्ट्रा' म्हणून काम करीत असतांना मी पाहिली होती. पण तिचा वेष, तिची शालीनता यावरून "सिनेमानटीव्वा" शी तिचा कोणीहि संबंध लावला नसावा. थोडी आवड व वरीचशी आर्थिक अडचण यामुळें ती सिनेमांत शिरली असली तरी सिनेमापणा तिच्या अंगांत शिरला नव्हता.

त्या मुलीवरून विचार करता करता जवळ जवळ १५ वर्षांपूर्वीची कांहीं चित्रें माझ्या मनांत चमकून गेलीं.

× × ×

परळमधील एका "स्टुडिओची" गोष्ट. त्यावेळचे स्टुडिओ म्हणजे एका सपाट जागेवर उभारलेले १०–१२ खांब व त्यावर टाकलेले पोतीवजा तट्टर आणि साधारण मोठ्या फ्रेमवर, सिगारेटच्या डब्यांतून येतो तसला, कागद चिकटविलेले रिफ्लेक्टर्स! साऊंड-प्रूफ "आलीशान" स्टुडिओज् किंवा सूर्याला लाजविणारे आर्क लॅम्पस् यांचा त्यावेळीं जन्म झालेला नव्हता. आणि त्या स्टुडिओंत इतस्ततः पसरलेलीं तीं पात्रें! पान चघळणाऱ्या, अस्ताव्यस्त पोषाख केलेल्या घाणेरड्या स्त्रिया, दोन शब्दांत एक अपशब्द बोलणारे नट व इतर कलाकार, पगार थकल्यामुळें कामांवर लक्ष नसलेला कामगार वर्ग, असा त्यावेळचा थाट! त्यांत सभ्य स्त्रिया सोडाच पण सभ्य पुरुषांना "लज्जायमान" होण्याचा प्रसंग आल्यास आश्चर्य नव्हतें.

सिनेमांत काम करणाऱ्यांना जागा देण्याचें घर-मालक साफ नाकारींत तें त्या वेळींच. आणि "त्यावेळीं" म्हणजे सिनेमा धंदा सुरूं होऊन चांगली १५-१६ वर्षे झालीं होतीं. बोलक्या चित्रपटाचा जमाना नुकताच सुरूं झाला होता.

× × ×

याच सुमारास या मायावी सृष्टीचे महर्षि कै. दादासाहेब फाळके यांची व माझी प्रथम भेट झाली. आणि त्यांनीं आपल्याला आलेल्या सुरवातीच्या अडचणी सांगितल्या त्या ऐकून त्यावेळीं होती ती परिस्थिति किती तरी पटीनें मला चांगली वाटली. कै. दादासाहेबांनीं काढलेल्या पहिल्या चित्रपटांत स्त्रियांचीं कामें पुरुषांनीं केली होतीं हें सुविदित आहे. सिनेमाबद्दल वृत्तपत्रकर्त्यांमध्येंहि तेव्हां किती अज्ञान होतें याचा एक मजेदार अनुभव दादासाहेबांनीं सांगितला.

"सावित्री-सत्यवान" बोलपटांत यम रेड्यावरून यावयास पाहिजे. पण अनेक वेळां यत्न करूनहि रेड्याकडून काम करून घेण्याची ज्ञानेश्वरी युक्ति कांहीं दादासाहेबांना साध्य झाली नाहीं. दरवेळीं तो म्हशीचा प्राणनाथ कॅमेरावर चाल करून जाई. शेवटीं कंटाळून दादासाहेबांनीं एका म्हशीवरच यमराजांना बसविलें व तें दृश्य घेतलें. चित्रपट लागल्यावर एका हुशार अखबारवाल्यानें या गफलतीचा उल्लेख आपल्या पत्रांत केला. व दोन आठवड्यानंतरहि अजूनहि यमराज आपलें वाहन बदलीत नाहींत असें पाहिल्यावर अत्यंत खरमरीत टीका केली. "आम्ही ही चूक चालकांच्या निदर्शनाला आणूनहि अजून ती सुधारण्यांत येऊं नये हें आश्चर्य नव्हे काय?" नाटकाप्रमाणें सिनेमांत दररोज प्रयोगाच्या सोयीसाठीं फेरफार करणें शक्य नसतें हें त्या बिचाऱ्याच्या डोक्यांत उतरलें नव्हतें!

सुरवाती–सुरवातीला या हालत्या चित्रांनीं लोकांना कसें वेडे केलें होते याचें वर्णन करतांना "लंका-दहना" चें एक आठवड्याचें उत्पन्न आपण बैलगाडींतून कसें आणलें याचें कै. दादासाहेबांनीं केलेलें रसभरीत वर्णन माझ्या अजून स्मरणांत आहे.

कै. दादासाहेबांची ती धीरगंभीरशी दिसणारी मूर्ति, तो सतेज चेहरा मी त्यानंतर अनेक वर्षांनीं सिनेमा धंद्याचा रौप्य महोत्सव झाला त्यावेळीं पुन्हां पाहिला. आपण केलेल्या कामगिरीचें एकदां तरी लोकांनीं कौतुक केलें हें पाहून तें अगदीं घळघळा रडले.

ब्रिटिश इतिहासांत "साऊथ सी बबल" नांवाच्या कंपन्या काढण्याच्या व बुडण्याच्या सायीचें वर्णन मी वाचलें होतें. त्याचा अनुभव १९३२ते३४ मध्यें मुंबईंत व इतरत्र ज्या कंपन्या निघाल्या त्यावेळीं प्रत्यक्ष आला.

दादरच्या मुख्य रस्त्यावर त्या सुमारास १०६ फिल्म कंपन्यांचे फलक लटकत होते. कितीतरी भुरट्या लोकांनीं त्यावेळीं प्रोडयूसर होण्याची आपली आकांक्षा पुरी करून घेतली. मोंगल सम्राट बाबरनें एका भिस्त्याला जसें एका दिवसासाठीं बादशाहा बनविले तसेंच कांहींसे यावेळीं घडलें. व "दादर-मेन रोडवर त्या दोन वर्षांत एखाद्या वात्रट मुलानें इतस्तत: दगड भिरकावला असता तर अर्धा डझन प्रोडयूसर व दोन डझन नट घायाळ झाले असते" असें माझा एक विनोदी मित्र म्हणतो तें अक्षरश: खरें होतें.

अर्थात् दोन वर्षांच्या आंतच ह्या सगळ्या कंपन्या विराम पावल्या. त्या काळीं सिनेमा कंपनीं काढणें फारसें अवघड नसे. ४०,००० ते ६०,००० रुपयांत एक बोलपट 'बिलकुल' तयार होत असे. मुंबईत त्या सुमारास कमीत-कमी ८ धंदेवाईक व 'जाणीते' फिनॅन्सिअर्स त्या ४–६ वर्षांत होते. कंपनी काढण्याचा फॉर्म्युला असा : कोणत्याहि एका स्टुडिओवाल्याकडे जाऊन त्याला सांगावयाचे, माझ्याकडे भांडवलवाला आहे मला तुझा स्टुडिओ पाहिजे. त्याच्याशीं कॉन्ट्रॅक्ट केल्यावर मग भांडवलवाल्यास जाऊन सांगावयाचे, मी स्टुडिओशीं कॉन्ट्रॅक्ट केले आहे मला आतां २५–३० हजार रु. पाहिजेत. भांडवलवाले एवढ्या रकमेसाठीं व्याज, रॉयल्टी वगैरे मिळून सहा महिन्यासाठीं १० ते १५ हजार रुपये सहज घेत. स्टुडिओचे ४ महिन्याचें भाडे ८ ते १२ हजार असे (आज ते, ४० ते ५० हजार आहे), कोणत्याहि नटाचा पगार महिना एक हजारापेक्षां जात नसे आणि नटींना १२०० ते १५०० मिळाले म्हणजे "अबब केवढा पगार" असे वाटे. मुख्य नटीचे दिग्दर्शक वा फिनॅन्सरशीं "सूत" असणेंही अगदीं स्वाभाविक गोष्ट समजली जात असे. प्रोडयूसर हा प्राणी त्यावेळीं फारसा अस्तित्वांत नव्हता. डिरेक्टर हाच कंपनीचा मालक असे.

सुलोचना, गोहर, सविता, झुबेदा वगैरेंचा तो जमाना होता. सवितादेवी ही शेअर व



कॉटन बाजारांतील सटोडियांची अत्यंत लोकप्रिय नटी होती. तिचा फोटो असलेले फिल्म–विषयक कुठलेंहि पत्र नेहमीपेक्षां जास्त खपत असे. सवितादेवीशिवाय लेख लिहिणाऱ्या कोणी नटी त्यावेळी नव्हत्या.

कथालेखक व कवि यांना आज सिनेमा धंदांत थोडेबहुत का होईना महत्त्व आलें आहे किंवा या लोकांना महत्त्व दिलें पाहिजे असें समंजस निर्मात्यांना व दिग्दर्शकांना वाटूं लागलें आहे. १०–१५ वर्षापूर्वी या दोन्ही वर्गांतील लोकांना 'किस झाड का पत्ता' समजत असत. आज प्रदीपसारख्या गान-लेखकाला एका गाण्याला एक हजारप्रमाणें मोबदला मिळाल्याची उदाहरणें आहेत. सीने-कवि इंद्रसुद्धां एका गाण्याचे २००–३०० घेतात. याच इंद्रांनीं ३० रुपयाला एक या प्रमाणें गाणीं लिहिल्याचे मला माहीत आहे. कथालेखक हा वर्गच त्यावेळीं अस्तित्वांत नव्हता. दिग्दर्शक सब–कुछ असे.

अत्यंत व्यवस्थित रीतीनें संघटित स्वरूपांत निघालेल्या तीनच कंपन्या आणि त्या म्हणजे प्रभात, बॉंबे टॉकीज् व न्यू थिएटर्स. कलकत्त्यास सुरवाती-सुरवातीला मारवाडी व्यापाऱ्यांच्या हातांत सिनेमाचा धंदा होता. तेथील सुप्रसिद्ध धनिक रायबहादुर कर्मानीं यांना कंजनवरील लोभामुळें काढलेल्या कंपनी-





अनुक्रमणिका




## युद्धसमाप्ती नंतरच्या नव्या युगाच्या आघाडीवर डेक्कन थिएटर्सचें पहिलें पाऊल—!

अद्यावत यंत्रसामुग्रीनें व आधुनिक सुखसोयींनीं सुसज्ज अशा चित्रपटगृहांतून जगांतील अग्रेसर चित्रपट-निर्मात्यांचें उत्तमोत्तम चित्रपट दाखविणारी दक्षिण महाराष्ट्रांतील एकमेव संस्था—

# डेक्कन थिएटर्स

अभिमानानें रसिकांना दीपावलीच्या सुमुहूर्तावर
— सर्वांगसुंदर बोलपटगृह —

# आशा थिएटर–सोलापूर

सादर करीत आहे.

डेक्कन थिएटर्सच्या व्यवस्थेखालीं—

★ रिट्झ थिएटर–बेळगांव
★ रेडिओ थिएटर–बेळगांव
★ चित्रा टॉकीज–बेळगांव
★ चित्रा टॉकीज–सोलापूर
★ चित्रा टॉकीज–बार्शी
★ प्रकाश टॉकीज–बार्शी
★ चित्रा टॉकीज–अहमदनगर
★ श्याम टॉकीज–बारामती
★ रॉयल टॉकीज–कऱ्हाड
★ चित्रा टॉकीज–वाई
★ चित्रा टॉकीज–सातारा
★ आनंद टॉकीज–सांगली
★ विजय टॉकीज–कोरेगांव
★ विजय टॉकीज–धारवाड
★ चित्रा टॉकीज–गदग
★ न्यू आदर्श टॉकीज–अमरावती



बद्दलच्या अनेक आख्यायिका प्रचलित आहेत. त्यांपैकीं कांहीं मोठ्या मनोरंजक आहेत.

कज्जन काम करीत असलेल्या एका बोल-पटांत पैशांचा पाऊस पडतो असें दृश्य होतें. सामान्य रीत्या अशा दृश्यांच्या वेळीं मोल्डिंग खात्यानें तयार केलेले, रुपेरी रंग दिलेले मातीचे रुपये वापरण्यांत येतात. पण कज्जन-वर मातीचा पाऊस पडावा हें रायबहादुरांना रुचलें नाहीं. त्यांनीं सीनच्या वेळीं खरोखरीचे १० हजार रुपये एका पोत्यांत भरून पाठ-वून दिले !

सध्यांच्या इनफर्मेशन फिल्मस्चे संचालक इझा मीर हे रायबहादुरांकडे दिग्दर्शक म्हणून होते. त्यांच्याबद्दल कांहीं गैरसमज झाल्यामुळें त्यांना एका क्षणांत काढून टाकण्यांत आले. त्यांनीं आफिसांत ठेवलेला आपला कोट घेण्याची सुद्धां त्यांना परवानगी मिळाली नाहीं.

एकदां एका नव्या चित्रपटाची ट्रायल बघत असतां क्रेडिट् टायटल्वर येणाऱ्या नांवाबद्दल रायबहादुरसाहेब पृच्छा करीत होते. एवढ्यांत Processed by अशी टायटल् आली.

" ए प्रोसेसिंग क्या है ? " मालकांनीं विचारलें.

" साब ए फिल्म धोता है " बाजूच्या माणसांनीं सांगितलें.

" तो उसकू धोबी कहो ! " रायबहा-दूरांनीं फर्मावलें.

तसेंच, बॉंबे टॉकीज्मधून निघाल्यानंतर नजमल हुसेन, कज्जन काम करीत असलेल्या एका चित्रपटांत नायकाचे काम करीत होता. एक दिवस तो जरा कज्जनच्या जवळ बसलेला पाहून रायबहादुरांचे पित्त खवळलें व ते गर्जले—

" देवीयां सामने पैडोंका क्या काम है ? घनःश्याम इसका पगार चुका दो, " आणि तत्काळ नजमल हुसेनचा पगार चुकविण्यांत आला.

पण या सर्व दिव्यांतून जाऊन हिंदी चित्रपटाचा- धंदा आज उत्कर्षाच्या मार्गावर आहे. परंतु या धंवाची खरीखुरी प्रगति होण्यास सुबुद्ध लोकांनीं त्यांत लक्ष घालणें जरूर आहे. कारण People get the government they deserve असें म्हण-तात त्या प्रमाणेंच चित्रपटाचेंहि आहे. आज हिंदुस्थानांतील सिनेमाप्रेक्षकवर्ग कितीतरी सुजाण झाला आहे. " एक होता राजा "— या सांच्याच्या प्रेमकथा व "जीव" नसलेले अचाटच्य बोलपट आंता त्यांना बिलकुल आवडेनासे झाले आहेत.

चित्रपटांचा आजचा जमाना कथा-लेखकांचा आहे आणि चांगले कथालेखक निर्मात्यांना शोधून काढता येतील तेच ' या नंतरच्या ' चढाओढीच्या जमान्यांत टिकाव धरूं शकतील.

अगदी भिकार असतात बुवा हिंदी बोलपट, असे उद्गार अनेक सुजाण लोकांच्या तोंडून ऐकूं येतात. आपल्या देशांत निघणारे चलच्चित्रें अगदी भिकार नसलीं तरी असावीं तशीं एकंदरीनें नसतात याबद्दल दुमत होण्या-सारखें नाहीं.

पण बोलपट उत्पादनाचा व्यवसाय हा देशांतील इतर उद्योग व्यवसायापेक्षां कांहीं निराळा नाहीं. अगदीं अपवाद असे उद्योग सोडून दिलें तर आपल्या देशांतील असे किती धंदे आहेत कीं ते परदेशांतील त्या त्या धंद्याची बरोबरी करतील. देशाच्या राजकीय परिस्थितीचा, त्याच्या परावलंबित्वाचा आणि त्यामुळें जनमनाला आलेल्या गंजाचा जसा राष्ट्राच्या औद्योगिक जीवनावर तसा समाज-जीवनावर परिणाम होतो. आपले आजचे राष्ट्रजीवन एखाद्या अत्यंत किंमती पण जुनाट झालेल्या गालीच्याप्रमाणें आहे. पारतंत्र्याच्या धुळींत पडल्यामुळें त्याचा मुलायमपणा नाहींसा झाला आहे. चुकीचें शिक्षण व आर्थिक-शोषण-रूपी मुषकांनीं त्याचे अनेक

भाग कुरतडून टाकलेले आहेत-आणि ते अनेक तेजस्वी राष्ट्रवीरांनीं रफू करण्याचा प्रयत्न केला आहे. या आपल्या रफू केलेल्या राष्ट्रजीवनाचें प्रतिबिंब रुपेरी पडद्यावर दिसले तर त्यांत नवल नाहीं.

चित्रपट-धंद्याची ही स्थिती त्याच्या प्रगतीच्या आड येत आहे असें म्हणणें निराशावादी खास होणार नाहीं. तरीहि ज्या प्रमाणें राजकीय, सामाजिक व औद्योगिक जगांत थोड्या फार अंशानें आपला देशप्रगति करीत आहे त्या प्रमाणांत हिंदुस्थानांतील सिनेमाचा धंदाहि खात्रीनें पुढें पाऊल टाकीत आहे.

पण येथें मी त्या प्रगतीचा आढावा घेण्याचा प्रयत्न केलेला नाहीं. गेल्या १९ वर्षांत सिनेमा धंद्याशीं माझ्या थोड्याबहुत संबंधामुळें मला जे कांहीं अनुभव आले व ज्या कांहीं गोष्टी ऐकावयास व पहावयास मिळाल्या त्यांतील कांहीं वर दिल्या आहेत.

---

अनुक्रमणिका








# राजसिंह माझा निजला

: कवि :
मनमोहन, पुणे.

[एका महान् देशभक्ताच्या मृण्मय शरीराभोंवती देवदूत पहारा करीत बसलेले आहेत. एवढ्यांत तेथे 'कांहीं जीवंत' येतात आणि उद्गारतात—आतां हें प्रेत हलवावयासच पाहिजे. त्या निष्क्रीय आणि पापी हातांचा स्पर्श त्या देशभक्ताच्या शरीराला होणार तोंच झटकन् त्याचा हात बाजूला सारून एक देवदूत त्यांना म्हणतो—]

खबरदार म्हणाल जर या
मुडयाला मुडदा;
जगांतील उभ्या जिवंतांना
मारतील याच्या
मस्तीच्या मर्यादा ! –

*

तुम्हाला नव्हती शक्ति
याची अवलानें पचवायाची,
तुम्हाला पेलता आली नाहीं
याची गरुड भरारी इरेची !

वाटाया—पाहिजे
ओठावरल्या लोकरीची
शरम तुम्हाला—!
खबरदार जर लावाल हात
या प्रेताला !

*

आम्ही देवदूत जाणतो
त्याच्या हृदयांतिल संवेदना.
अगाध पंचमहाभूतांचा
करूं त्याला पाळणा !
त्याच्या सद्दर्शनप्रकटनार्थ
पॅसीफिक होईल आयना !
आता या हृदयासारखे,
या रूपासारखे
येइल का होता कोणा ?

*

या गौरमुखावरती
होती—नव्हे आहे
कान्ति रविप्रभेची.
याचा त्याग—
अडाण्यानों, सोडा उपमा
भीष्माची !
आणि याच्या देशभक्तीचें
उदात्त अवसान—
त्याची स्फोटकता
प्रगटेल पुढें अणुबाँबहून !

डबक्यांत जन्मला
म्हणून—काय
खेकडा बनेल मत्त गजेंद्र ?
जे महान् अभिमानी—
ते वेगळया गोष्टीनें
होती ठार !
तसाच हा एक लाल—
फार मिजाशी वेल्हाळ–
आटापिटींत मायभूमीपासून
दूरदूर पडे घायाळ !

*

अनुक्रमणिका






कमनशिबी हिमालया,
आणि कमनशिबी गंगे,
या अगस्तिच्या अस्थींना
तूं मुकलीस शुभांगे !
शंभु जटेनंतरचा
आणि शेवटचा
होणारा हा दुसरा मर्मर स्पर्श
त्याला तूं मुकलीस वेडे,
करूं नकोस आक्रोश !

तूंच काय, पण पर्णकुटी खालचा
काडी पहिलवान,
जग जिंकणारा,
हारजीत करणारा,
मरणास बेगुमान !
परंतु त्याच्याहि
बुबुळपथावरती
अश्रुबिंदु-बंदी
करती येरझारा !

*

हवे होते गडकरी
माझ्या मराठीचे याला
राजसिंह माझा निजला
ही अंगाई गायाला !
त्या बेफिकीर लेखणीला
येती याची फिकीर कराया
नोकरीचे यशवन्त पाइक !
क्या कहूं भय्या !

*

देतात दानें देहाचीं
इर्षेचे हनुमन्त
फळीवरून सरकतात
सहनशक्तीचे सन्त.
तें चुकलें हें चुकलें
हा हन्त !
जसे वळवळती
हकनाक पोटांमधले जन्त !

तुम्ही डिस्टेंपरचीं डबडीं
मुरडता नाक इन्द्रधनुष्याला !
हटो दूर ? खबरदार
जर लावाल हात या प्रेताला !
येऊं द्यात ते वरचे
सिंग गुरू जतीन्द्र त्राफेकर !
शेवटचा प्रवास
या पुण्यात्म्याचा
त्यांच्याच खांद्यावरून होणार !

*

मखमली गादीवरची
याला बोचतील अग्रें;
याला आवडती फत्तराच्या
नव्हे बंदुकीच्या गोळीनें
फुटलेल्या मांड्या
टेकाया मान !
याचा आत्मा,—नव्हे
एक अजस्र धार,
उडाली देहपंजरांतुन—
जो घेतला उसनवार !

*

याच्या चरित्राची छापूं
आम्हीं आभाळावर पुस्तकें
कसा खालचा कायदा
घालील त्यावर जप्तीचे छापे !
आणि
खुद्द सोसाट्याचा मारुत मस्तवाल
याचा शाहीर बनून
कर्णाकर्णांना तडे पाडणार !

*

आणि मग जिथें पहाल
तिथें तो—
आणि मग चलाल
तिथें तो—
इथें तो तिथें तो
जो सर्वांना पुरून उरे तो—
तो जळणार कसा खुळ्यांनो,
आणि मरणार कसा—तो !







अनुक्रमणिका







**• आज आयुष्याचे वेगळे जोडीदार आपण निवडले आहेत. परस्परांच्या उष्ण श्वासांचा शिरशिरी आणणारा स्पर्श परस्परास व्हावा, इतक्या निकट येऊन गेल्यावर आतां आपल्या आयुष्यांचे मार्ग इतके दूर फांकले आहेत कीं संसाराच्या मुशाफिरींत पुन्हां आपली भेट होणें नाहीं.**

**•• पण ह्याची तुला कधीं तरी आठवण होते कां ?**




तुला आश्चर्य वाटेल, पण आजपर्यंत मला तुझी कधीं फारशी आठवणहि झाली नाहीं. माझ्या आयुष्यांत येऊन गेलेल्या इतर मुलींचे चेहेरे कधीं कधीं माझ्या डोळ्यांसमोरून तरंगून जातात, तसाच तुझाहि गेला. पुढें कधीं तरी उकलून मला दुःख देईल, अशी जखम माझ्या हृदयावर कुणीच ठेवली नव्हती—नाहीं, तूं सुद्धां नाहींस ! मोठ्या नवलाची गोष्ट आहे पण सहजगत्या ओळख झालेल्या मुलींना मी ज्याप्रकारें विसरलों, तसाच तुलाहि विसरलों, आणि त्यांची जितकी मी आठवण केली, तितकीच तुझीहि केली.

पण आज कितीतरी वर्षांनंतर अकस्मात् मी मेडिकेल स्कूलच्या वाटेनें गेलों, आणि तें झाड तिथें अगदीं तसंच फुलतांना पाहिलं. माझ्या स्मृतींतून तुझ्या इतकंच तें झाडहि नष्ट झालं होतं. आणि म्हणून मला वाटत होतं कीं प्रत्यक्ष सृष्टींतूनहि तें झाड आतां नष्ट झालं असेल. पण तें ठेंगणं छत्रीसारखं, पानापेक्षां फुलंच जास्त असणारं झाड, मुलींच्या वसतिगृहाशेजारीं आजहि अगदीं तसंच मुसमुसत उभं होतं. त्याचं वय वाढलं नव्हतं, तारुण्य ओसरलं नव्हतं, कीं बहर उतरला नव्हता. काळाच्या सोंसाटत जाणाऱ्या प्रवाहानें कुणाच्या हृदयांतले अग्नि थंड पाडले असतील, आणि कुणाच्या तारुण्याचा फुलोर उतरवून ठेवला असेल तो असो, पण त्या झाडावरचीं फुलं अजूनहि तितकींच लालभडक होतीं. आणि त्याचीं पानं अजूनहि तितकींच हिरवीं कंच होतीं. इस्पितळाच्या पडवींतून लांब झग्यांतल्या तरुण डॉक्टरांची आजहि झपाट्यानें जा ये चालली होती. शुभ्र वेषांतल्या परिचारिकांचे गुच्छ हंसींच्या कळपाप्रमाणें आजहि तेथें वावरत होते, आणि शेजारच्या बॅडमिंग्टन मैदानावर तरुण मुलींचे लवचिक देह अद्यापहि तसेच लचकत होते. माझी कल्पना होती, कीं त्यांचे हे सुंदर खेळ केव्हांच संपून गेले असतील ! पण क्षणाची उसंत न घेतां, तारुण्य त्या क्रीडांगणावर सारखं लवत राहिलं होतं. नवतीच्या चापल्यानें एके काळीं चकाकणारे जुने जलबिंदू त्या पात्रांतून ओघळत जाऊन आयुष्याच्या अनंत सागरांत शांत झाले, आणि नव्या जलकणांनीं त्यांची जागा घेतली ! इस्पितळाचे तेच मनोरे, क्रीडांगणावर पांखराप्रमाणें उडणारे परांचे चेंडू, फडफडणारीं वस्त्रें, उमलतं तारुण्य समावून धरणारे तें मुलींचें वसतिगृत, आणि निकटवर्ति तारुण्याच्या श्वासावर आपला बहर अक्षयपणें पोसत व फुलवीत बसलेलें तें झाड ! त्या झाडाखालीं पायाला लाडिक बांक देऊन व चेहेरा कलता करून आजहि एक सुबक मुलगी उभी होती, व गळ्यांत रवरी नळीची माळ घातलेला एक विद्यार्थी तिच्याकडे अगदीं अनिमिषपणें पहात आजहि तिथं खिळलेला होता. आणि वर त्या झाडाचीं पानं फुलें सळसळत होतीं, खूप सळसळत होतीं ! तो देखावा पाहिल्यावर एक गेलेला दिवस स्पष्टपणें माझ्या डोळ्यांसमोर उभा राहिला, आणि आतां—आज—इतक्या वर्षांनंतरहि आकांतानें ओरडून एकच प्रश्न मला तुला विचारावासा वाटूं लागला, कीं तो दिवस तुला कधीं तरी आठवतो का ? एकांताच्या अंतर्मुख क्षणांत भूतकाळावरून दृष्टी फिरवितांना आयुष्यांतल्या आश्चर्यकारक अपघातांच्या कल्पनेनं तुझं मन कधीं विस्मयचकित झालं कीं नाहीं ? बेसावध मोकळेपणाच्या अवस्थेंत तें झाड तुझ्या हृदयांत व स्मृतींत अचानक फुललेलं पाहून तूं—कधीं—दचकलीस कीं नाहींस ?

* * *

आतां माझं लग्न झालं आहे. आणि मी अगदीं सुखांत आहे. असं ऐकतों, कीं माझ्यानंतर कांहीं दिवसांनीं तुझंहि लग्न झालं, आणि तूं देखील अगदीं आनंदांत असली पाहिजेस. भानीव जखमा उकलून निष्कारण दुःख करण्याची आपली पद्धत नाहीं. तूं अबोल, दूरदर्शी आणि हिशोबी आहेस म्हणून आणि मी


अनुक्रमणिका

खेळाचे नियम चांगले जाणतो म्हणून ! आज तुझ्या जीवनावर तुझ्या पतीचा अधिकार आहे, आणि माझं आयुष्य सर्वस्वी माझ्या पत्नीशीं निगडीत आहे. एकेकाळीं परस्परांच्या अगदीं जवळ असलेले आपले जीवनप्रवाह कशाला तरी अडले, आणि एक अकल्पित वळण घेऊन दूर दूर निघून गेले. डोळ्यांचा लपंडाव खेळत बसलेल्या आपल्या मनाला परस्परांच्या हृदयांचा कानोसा लागलेला होता . तरीहि सुचलेले शब्द न बोलतांच आपण एकमेकांपासून अलग झालों. ह्यापुढें आपली भेट होण्याचा फारसा संभव नाहीं. आणि आपली कधीं अपघातानं भेट झालीच, तर ती परस्परांना कायमचे तुटलेले त्रयस्थ म्हणून होईल. तुझ्या जन्माचा जोडीदार तुझ्या शेजारीं आणि माझी जोडीदारीण माझ्या शेजारीं उभी असेल पण त्यांना कल्पनाहि येणार नाहीं कीं एक दिवस असा येऊन गेला होता—!

तूं मोजकं बोलशील, हळूं बोलशील आणि मर्यादेंत बोलशील. तूं नेहेमींच तसं बोलत होतीस. मी उपचार संभाळीन पण आवाज संभाळणार नाहीं. मी कदाचित् उपहासानं बोलेन कदाचित् परिहासानं बोलेन आणि कदाचित् बोलणाराहि नाहीं. एकाद्या आडरस्त्यावरच्या आगगाडींत, एकाद्या नाटकगृहांत, किंवा एकाद्या अनामिक नगराच्या राजरस्त्यावर कधीं आपण भेटलोंच, तर असे भेटूं आणि शांतपणें परस्परांचा निरोप घेऊं. आपण कधींच न फोडलेले शब्दांचे बांध पूर्वीं सहज फोडतां आले असते, पण आतां मात्र तें शक्य नाहीं. तुझ्यामाझ्यांत आतां अगदीं अभेद्य अशा भिंती उभ्या झाल्या आहेत एके काळीं आपण जें बोललों नाहीं तें ह्यापुढें आपणांस कधींहि बोलतां येणार नाहीं. त्याविषयीं तुला दुःख नसेल आणि पश्चात्ताप नसेल. आणि त्याविषयीं मलाहि दुःख नाहीं व पश्चात्ताप नाहीं. आज मला केवळ एका कमालीच्या कुतुहलाची अशी भावनाशून्य जाणीव तेवढी तीव्रतेनें झाली आहे. तेव्हांहि माझं कुतुहलच तूं प्रथम जागं केलंस.

आज जिच्याशीं माझं लग्न झालं आहे तिच्याच घरीं तूं प्रथम मला भेटलीस. तिचे वडील तुझे स्थानिक पालक होते, तिची वहिण तुझी मैत्रिण होती, आणि तिचा भाऊ माझा सोबती होता व तिच्या आईचा माझ्यावर लोभ होता. तिथें जमलेल्या मुलींच्या घोळक्यांतली प्रत्येक मुलगी तुझ्यापेक्षां रूपानं सरस होती, आणि पोषाखानं वरचढ होती. चालत्या माणसाचं मन आकर्षित करील असं तुझ्यांत कांहींच नव्हतं. आणि कदाचित् ह्याच जाणिवेमुळें शृंगाराच्या विषयांत तूं अगदीं उदासीन राहिलीस. निसर्गानं ठेवलेला उणेपणा भपक्यानं भरून काढण्याचा मोह तुला झाला नाहीं. पण तुझ्या मंद मर्यादशील आणि मोजक्या बोलण्यांत कोणत्याहि बुद्धीमंताचं कुतुहल जागं करील असं आकर्षण होतं. तुझ्या शांत व अबोल हृदयांत बुद्धी मारून त्याचा ठाव घेण्याचा मोह कोणत्याहि जातिवंत खेळाडूला झाला असता. तुझ्या निर्विकार व भावनाशून्य दिसणाऱ्या चेहेऱ्याचं सौंदर्य हें तुझ्या शरीराचं सौंदर्य नव्हतं, तर तें तुझ्या व्यक्तीत्वाचं सौंदर्य होतं. तुझ्या स्वभावानं तुझ्या चेहेऱ्याला फिक्कट चांदण्यासारखा एक सहजासहजी डोळ्यांत न भरणारा गोडवा दिला होता ह्यांत शंकाच नाहीं. पाहणाऱ्याची दृष्टी त्या गोडव्यानं रोखून धरली असती, आणि न पाहणाऱ्याला तो कधींहि दिसला नसता.

*  *

गप्पांत रंगलेल्या मुलींच्या घोळक्यांतून उठून दाराच्या पडद्यापाशीं अडखळलेल्या नोकराच्या हातांतून तूं चहाचं तबक घेतलंस, आणि कप माझ्यापुढें धरून माझ्या खुर्चीसमोर उभी राहिलीस. शारीरिक नसलेल्या तुझ्या मंद आकर्षणाची तेव्हां मला पहिली स्पष्ट जाणीव झाली. लांब बाह्यांच्या शुभ्र मलमली पोलक्यांत, आणि तसल्याच पातळांत आवृत असलेल्या तुझ्या सांवळ्या, कृश आणि शांत आकृतीकडे कांहीं क्षण मी पहातच राहिलों. माझ्या त्या नजरेला निर्विकार अविचलपणं तूंहि नजर दिलीस. तुझ्या चेहेऱ्यावर अगदीं पुसट स्मिताच्या खुणा उमटून गेल्या व मग माझ्याच समोर खुर्ची ओढून घेऊन तिथेंच तूं बसलीस. ह्या साऱ्या गोष्टी तूं अगदीं सहज कराव्या तशा केल्यास, पण तारुण्याच्या खेळांतले ओझरते संकेतहि ओळखणारं माझं मन मात्र त्या क्षणापासून एकाद्या

बहिरी ससाण्याच्या सावध पवित्र्यांत बसले. त्या क्षणापासून खोलींतल्या प्रत्येक मुलीचं मला विस्मरण झालं व मी तुझ्याशींच बोलूं लागलों. तुझा तोल किंचितहि सुटला नव्हता. मला बोलते ठेवण्या इतकेंच तूं बोलत होतीस.

एकाद्या कसबी कलाकाराच्या अखंड कौशल्यानं मी बोलत होतों, व कौतुकाच्या अबोल रसिकतेनं तूं ऐकत होती. माझ्या भाषणाच्या ठिणग्यांनीं माझंच हृदय अखेर चेतविलं आणि माझ्या मनांतला प्रेक्षक त्या ज्वालाग्राही ठिणग्यांच्या पडछाया तुझ्या डोळ्यांत शोधूं लागला. आतां तुझ्या शांत नजरेंतहि लहरींचा भाव होत होता—किंचित्—अगदीं किंचित्—!

तेवढं उत्तेजन मला पुरेसं झालं. मी माझ्या खोलीवर येण्याविषयीं तुला निमंत्रण दिलं आणि तें तूं मानेच्या एकाच हालचालीनं नाकरलंस. पण तेव्हां तुझी मान खालीं गेली होती, आणि तुझ्या चेहेऱ्यावर रंग चढला होता. खेळाचा कठीणपणा मला पटला आणि त्याच प्रमाणांत खेळ खेळण्याची माझी ईर्षाहि वाढली. त्या सामन्याच्या निमित्तानें सुरूं झालेल्या खेळांत हां हां म्हणतां जिवंत रंग भरतील, आणि माझी भूमिका कदाचित् उत्कट सत्याचें स्वरूप धारण करील, ही जाणीव मला होती. आणि ती जाणीव मला अप्रिय वाटत नव्हती. त्यानंतर चार दोनदां तूं मला भेटलीस, आणि उपचाराची ओळख देऊन पुढें गेलीस.

मुलींची मला नवलपरी नव्हती. माझ्या आजच्या कीर्तीचा प्रारंभ माझ्या त्या विद्यालयीन जीवनांतच झाला होता. मीहि तितक्याच अभिमानी उपचारानं तुला ओलांडून पुढें गेलों. त्यानंतर बरेच आठवडे आपण परस्परांस दिसलों नाहीं. परंतु अभिमानाच्या व हेतूपुरःस्सर विस्मरणाच्या आवरणाखालीं शल्यें सलत होतीं—तुझ्या व माझ्याहि मनांत. कारण वाटेंत तुझी दुचाकी थांबवून परत मी तुला माझ्या खोलीवर बोलाविलें, तेव्हां तूं मुकाट्यानं माझ्या मागोमाग आलीस. ह्या खेपेस तुझी एक मैत्रिण तुझ्यावरोबर होती. पुढच्या खेपेस तुझी एक बहिण तुझ्या सोबतीला होती. तुझ्यासारख्या सावध मुलीलाहि पूर्वी कधीं ठोकर बसली होती कीं काय नकळे, पण तुझीं पावलं फार जपून पडत होतीं. तुझ्या एकदोन प्रकरणांविषयींचे निसटते उल्लेख मी ऐकलें होते. तुझं अबोल गांभीर्य तुझ्या जितक्या बाजूनं होतं, तितकंच तें तुझ्या विरोधी अर्थानं लावणंहि शक्य होतं. पण तुझ्याविषयीं तसले उल्लेख करणारेहि विरळ सांपडत आणि तसे उल्लेख करतांना त्यांचा स्वर निश्चितीचा नसे—संशयाचा लाभ तुलाच द्यायला सामान्यतः ते सिद्ध असत.

तुझ्या मंद सावधपणामुळं कधीं मला चेव येई आणि कधीं चीड येई. माझ्या आयुष्याला स्वभावतःच गति, उत्कटता, आणि बेधडकपणा अधिक मानवत होती. सारं कांहीं विसरून







उताविळ उत्कंठेनं लागोपाठ तूं माझ्या खोलीवर कधीं आली नाहींस. कांहीं महिन्यांत आटोपलेल्या त्या खेळांत सारी सात आठ वेळा तूं माझ्याकडे आलीस. आणि त्याहिपेक्षां कमी मी तुझ्या वसतिगृहांतल्या खोलींत आलों. माझ्या अनुपस्थितींत माझ्या पत्रपेटींत तूं टाकलेलीं पत्रंहि अगदीं निरुपद्रवी, तोकडी, आणि फक्त एखाद्या शब्दानेंच सूचक असत. परंतु तरीहि आपल्या मनोमनांत कांहीं तरी निर्माण होत होतं, आपण परस्परांचे मोजमाप करीत होतों, आणि हें सारं आपणां दोघांसहि कळत होतं ह्या विषयीं मात्र शंका नाहीं. जें निराकार स्थितींत होतं, तें साकार व्हावयास आतां फक्त एखाद्या कृतीचा— एखाद्या शब्दाचा अवकाश होता. कसल्यातरी मर्यादेवर तूं घुटमळत राहिली होतीस, आणि ती मर्यादा मोडावयास मी उतावीळ झालों होतों. तूं अंतर तोडत होतीस, पण पुरेसें अंतर तोडत नव्हतीस. तूं बोलत होतीस पण पुरेसं बोलत नव्हतीस. ह्या सावध खेळांतहि एखादा उन्मत्त आणि गाफील क्षण असावाच लागतो, ह्याची तुला जाणीव नव्हती.

मी बोललो असतो असें कांहीं क्षण होते, कीं जेव्हां मी बोललों असतों. तुझ्या वसतीगृहांतल्या खोलींत मी प्रवेश करतांच खुद्कन हंसून तुझी सोबतीण निघून गेली व बाहेर पाऊस पडूं लागला. त्या पावसांत धांवत जाऊन माझी द्रुचाकी तूं पडवीत आणून ठेवलीस व मग आपले लांब सडक केस मोकळे करून तूं झटकलेस, तेव्हां मी बोललों असतों. केवळ क्रीडेची कल्पना लुप्त होऊन त्या क्षणीं एक प्रचंड भावना उदयास येत होती. पण परत बाहेर जाण्याच्या तयारीनं आंत आलेल्या आपल्या मैत्रीणीला तुझ्या सावध बुद्धीनं तेथेच बसवून घेतलेस, व जें ओठाशीं धडपडत होतें, तें मी बोललों नाहीं. ज्यासाठीं शरीराचा प्रत्येक कण उत्कंठित व उत्तेजित झाला होता, तें मी केलं नाहीं.

त्राग्यानें उत्तर भारतांत परागंदा झालेल्या तुझ्या एका परोसवदा नातलगाचें धमकीचें पत्र घेऊन अश्रू ढाळत तूं एकदा एकटी माझ्या खोलीवर आली होतीस. तुझ्या अडचणीच्या वेळीं तुला माझं स्मरण व्हावं, ह्या कल्पनेनं मी शहारून गेलों. तुझे अश्रू मी आज प्रथमच पहात होतों. तेव्हांहि मी बोललों असतों. पण तुझ्या मनाचा ठाव पहाण्यासाठीं माझ्याबरोबर उत्तर हिंदुस्थानांत येण्याविषयीं मी तुला म्हटलं, आणि क्षणाचाहि विलंब न लावतां ती कल्पना तूं मोडून काढलीस. दिल्ली आणि लाहोरची प्रत्येक पेठ शोधून आत्महत्येची धमकी देणाऱ्या त्या पोराला मी तुझ्यासमोर आणून उभं केलं, तेव्हां तुझे डोळे कृतज्ञतेनं पुन्हां भरले पण जें बोलणार होतों, तें मी बोलूं शकलों नाहीं.

...अभिमान आणि विस्मृति ह्यांनीं झाकळलेलें आणखी कांहीं दिवस गेले. आठवणीच्या दर्शनी पटावरून तुझं नांवहि पुसून टाकून मी कायद्याची अखेरची परिक्षा दिली. माझ्या अंतर्मनांत मात्र अद्यापहि तुझी वर्दळ चालू होती. पुष्कळ दिवसांत तूं मला भेटली नव्हतीस. एल. एम्. पी. ची तुझी दुसरी परीक्षा अगदीं जवळ आली होती. कुणीतरी मला सांगितलं कीं तूं माझी फार आठवण केलीस. भेटीची वेळ नसतांहि तिरीमिरीसरशीं मी सायकल उचलली, आणि अनेक वर्षांनंतर अनोळखी वाटूं लागणाऱ्या ज्या रस्त्यानं मी आज गेलों, त्याच रस्त्यानं भरधांव सायकल दामटीत ऐन दुपारीं एक वाजतां मी मेडिकल स्कूलचं आवार आणि तुझ्या वसतिगृहाची सरहद्द गांठली.

ह्या वेळीं वसतिगृहाच्या खोलींत मला येतां येणार नाहीं, हें मला माहीत होतं. दाराशीं जोरजोरानं सायकलची घंटा वाजवीत खालीं उतरलों, तेव्हां खांबावर हात देऊन तूं पडवीतच उभी होतीस. आजहि लांब बाह्यांचं शुभ्र पोलकं आणि तसंच तलम पातळ हा तुझा पोषाख होता. तो पोषाखच तुला शोभत होता आणि मला आवडत होता. जणूं कांहीं माझी वाट पहातच तूं तिथं उभी होतीस. कारण मला पहातांच मंद स्मित करीत तूं पुढं आलीस. तुझ्या चेहेऱ्यावर आज केवळ नम्र आणि सभ्य असं स्मितच नव्हतं, तर कांहींशी उत्सुकताहि होती, कांहींशी वेदनाहि होती. आज मला तूं सामोरी आलीस, ती तुझ्या नेहमींच्या संथ गतीनें आली नाहींस. तुझ्या चालींत इतकी उतावीळ मी कधीं पाहिली नव्हती. माझी अखेरची परीक्षा संपली होती, आणि मी गांवाला जाणार होतो. इथं मी बहुधा पुन्हां कधींच परत आलो नसतो.

न कळत आपण त्या झाडाखालीं जाऊन उभें राहिलों. मार्गस्थ होणाऱ्या हिवाळ्याचे ठसे, आणि येऊं घातलेल्या उन्हाळ्याचे उसासे ह्याचं हवेंत मोठं सुंदर मिश्रण झालं होतं. त्या झाडाभोंवती व चारी दिशास दूरवर पसरलेली हिरवळ अजून कुठेंहि












कोमेजली नव्हती. मधूनच गेलेले शुभ्र रस्त्यांचे छोटे पट्टे रांगोळ्यांच्या रेषाप्रमाणें उमटून दिसत होते. अद्याप फारसा ताप-दायक नसलेला सूर्यप्रकाश हिरवळीवरून एका रंगीन झळाळीनें परावर्तित होत होता. फुलं जागोजाग झुबक्यानं फुललीं होतीं. आपल्या मस्तकावरील झाड पानागणीक लदलं होतं. आकाशाच्या निळ्या विस्तारांत कुठेंहि डाग नव्हता. आणि ऊब व शितलाई ह्यांची गोड सरमिसळ झालेले झोत वारा सारखा उधळीत होता.

निरोपाच्या त्या दुपारीं आपण अगदीं जवळ परस्परासमोर उभे होतों. आतां जास्त अवकाश नव्हता. वेळ असली तर ती हीच होती, हें मला माहित होतें आणि तुलाहि माहित होते. आज तूं कशाची तरी अपेक्षा करीत होतीस. आणि मलाहि कांहींतरी अपेक्षित होते. वेळ नव्हता—आतां अगदीं वेळ नव्हता. ह्या क्षणाच्या पोटांत अनंत शक्यता होत्या—आणि पुढचे सारे क्षण त्या शक्यता नष्ट करणारा केवळ शून्याकार दाखवित होते. ह्याक्षणीं तुझा हात पुढें झाला असता तर तो गच्च धरून आयुष्याचा एकच मार्ग आपण कापूं लागलों असतों. मग वेगळ्या वाटा फुटल्या नसत्या. मग जीवनाचे प्रवाह न परतणाऱ्या मार्गानें इतके दूर वहात गेले नसते. त्या क्षणाचें महत्त्व आपणां दोघांसहि माहित होतें- निश्चलपणं परस्परांकडे हंसून पहात, कांहीं काळ आपण स्तब्धपणं उभे होतों. आपणाला शब्द सुचत नव्हते. जाणारा प्रत्येक क्षण आपला शत्रू होता. तुझ्या चेहेऱ्यावरचा चिरपरिचित असा सौम्य व शांत भाव आज ढवळला गला होता. परिक्षेचं, पुस्तकांचं, स्थळाचं व काळाचं आज तुला भान नव्हतं. त्या दुपारीं, त्या डंवरलेल्या झाडाखालीं, त्या अफाट हिरवळीवर, अगदीं जवळ, अगदीं समोरासमोर आज आपण उभे होतों. आपल्या एकांताला, पूर्ण नीरवता देण्यासाठीं सारं जग जणूं कांहीं लांब मागं सरकले होतं. फुलांच्या चुकार पाकळ्या मधूनच आपल्या मस्तकावर गळत होत्या, व सळ-सळणाऱ्या फांद्या हात हलविणाऱ्या प्रेक्षकांप्रमाणें आपणांस प्रोत्साहन देत होत्या. आणि तरीहि मर्यादा मोडून टाकण्याची कल्पना मनांत वागविणाऱ्या आपणा दोघांपैकीं कुणालाच शब्द सुचत नव्हते. कदाचित् तो तुझ्या स्वभावाचा परिणाम असेल! कदाचित् तो तूंच माझ्या मनावर केलेल्या पूर्व संस्काराचा परिणाम असेल—पण शब्द सुचत नव्हते, तुला किंवा मला, कुणालाच शब्द सुचत नव्हते!

"पेपर्स कसे गेले?" तूं विचारलंस.

"चांगले" मी म्हणालों.

"इथून कधीं जाणार?"—"लवकरच."

"पुन्हां इथे परत येणार कां?"—"कांही नेम नाहीं."

वास्तविक हे प्रश्न तुला विचारायचे नव्हते. वास्तविक हीं उत्तरं मला द्यायचीं नव्हतीं. तुझा थंड चेहेरा आज धुगधुगू लागला होता, पण माझी इच्छा होती, कीं क्षणभर, अगदीं क्षणभर तरी, तो पेटून निघावा. प्रवाहांत मावधपणं हात मारण्याऐवजीं प्रवाहाबरोबर क्षणभर तरी तूं वहावून जावेंस. म्हणजे खेळाच्या, अंदाज घेण्याच्या व पवित्रे मोजण्याच्या कल्प-नेचा विसर पडून मी बोलले असतो. तूं बोललीस, पण पुरेसं बोलली नाहींस. तूं पुढं आलीस पण पुरेसं पुढं आली नाहींस. तूं विसरलीस पण पुरेसं विसरली नाहींस. अनोळखी उतावळीनें तूं माझ्याबरोबर त्या झाडाखालीं आलीस, व जाणारा तोल जाऊं देण्याऐवजीं ऐन सीमेवरहि तो तूं संभाळत बसलीस. तुझ्या अमर्यादेनं मलाहि अमर्याद केलं असतं, पण तुझ्या सावधतेनं मलाहि सावध ठेवलं. व हृदयाच्या नशेनं माझी बुद्धी गुंगण्या ऐवजीं बुद्धीच्या खुणेवर माझं हृदय चालूं लागलं.

घड्याळानें एक तास गेलेला दाखविला. तुझे डोळे माझ्यावर लागले होते. तुझ्या चेहेऱ्यावरची प्रत्येक छटा, तुझ्या पोषाखाची प्रत्येक घडी, आजहि मला आठवते. मधून मधून आपण बोलत होतों. मधून मधून आपण हंसत होतों व क्षणभरहि दृष्टी न चळवितां आपण एकमेकांकडे पहात होतों. आज, ह्या दुपारीं, ह्या फुलांनीं लदलेल्या काळसर हिरव्या

झाडाखालीं, वाऱ्याचे झोत खात आपण दोघे—केवळ आपण दोघे परस्परांच्या अगदीं निकट येऊन उभे आहोत, साऱ्या जगानें आपल्या एकांताला वाव करून दिला आहे, सारे जग अगदीं स्तब्ध आहे, व आपणा दोघांच्याच संलग्न मनांनीं व बुद्धीनें एक स्वतंत्र असं जग उत्पन्न केलं आहे. ह्याची मला तेव्हांहि जाणीव होती.

डोक्यावरचं झाड आपल्या अनेक हातांनीं आपणाला उत्तेजन देत होतं. मधूनच आपल्या अंगावर पानें व फुलें गळत होतीं. हिरवळीचा चौफेर विस्तार सूर्यप्रकाशांत न्हाऊन निघाला होता. तरीहि हवे ते शब्द हटून बसले व कांहीं काळ मी पुन्हां स्तब्ध झालो.

" बोलणं कां थांबवलंत ? " तूं विचारलंस.

" मीच तर बोलत आहें. बोलून बोलून माझ्या तोंडाला कोरड पडली. " मी म्हणालो.

" पाणी आणून देऊं ? "

" आणून द्या ! "

—आणि नंतर मी सारखा पाणी पिऊं लागलो. दर पंधरा मिनिटांनी तूं कांचेच्या फुलदार पेल्यांत पाणी घेऊन तुझ्या खोलींतून त्या झाडाखालीं येत होतीस. वसतिगृहांतील मुलींचे विस्फारित डोळे तुझ्याकडे पहात होते. घड्याळाचे कांटे पुढें सरकत गेले, आणखी एक तास लोटला, तरीहि मी पाणी मागतच होतो. तरीहि शब्द सुचत नव्हते. तरीहि तहान भागत नव्हती. माझ्यासाठीं तुला गांठता येण्याजोग्या मर्यादेची शेवटची सीमा तूं गांठली होतीस. आतांपर्यंत शांत असलेलं जग जागं होऊं लागलं होतं, व पहात होतं. तूं पाण्याचे पेले आणित होतीस—!

अखेर तुझ्या अखंड स्मिताला मळूलपणा आला. रागावल्यावर किंवा रडकुंडीला आल्यावर कुंकवाच्या टिकलीशेजारीं तुझ्या कपाळावर जशी आठी पडत असे तशी आठी आतां तिथं दिसूं लागली. तरी आठी पाहतांच एका दिशेनं प्रवास करीत जाणारं माझं मनहि तोंड वळवून थबकलं, व मागं पाहूं लागलं.

एका मानीव व्यक्तीत्त्वाचा अस्पष्ट गोडवा सोडला, तर तूं खरोखरच सुंदर नव्हतीस. तुरळकपणेंच कां होईना, पण लोक तुझ्या विषयीहि कुजबुजले होते. कुणास ठाऊक—एखाद्या डोहाप्रमाणें सखोल असलेल्या तुझ्या निःस्तब्ध गांभीर्यांत किती अज्ञात छटा दडून बसल्या होत्या !

अजूनहि वारा वहात होता, अजूनहि हिरवळ तळपत होती, अजूनहि ते गुबगुबीत झाड डोलत होतं. पण मनांची दिशा आतां पालटली. एक संपूर्ण स्वप्न विरूं लागलं. त्या भावसृष्टीपासून दूर सरून निःशब्द झालेलं जग पुन्हां कोलाहल करूं लागलं. कुठें तरी चारचे ठोके पडले व आपण परस्परांचा निरोप घेतला. तुझ्या चेहेऱ्यावरची अस्वस्थता नाहींशी झाली होती, व तुझें थंड मर्यादशील गांभिर्य पुन्हां तेंच परिचित स्मित करूं लागलं होतं. एक संबंध विश्व वितळून गेलं, तरी उपचारांच्या सर्व सीमा संभाळून तूं माझा निरोप घेतलास ! ह्यापुढं आपले मार्ग कधींहि एकत्र येणार नव्हते ! ह्यापुढं मी तुझ्या दारावर कधींकाळीं आलों, तर एक परका म्हणून येईन. एक परका, म्हणूनच तूं माझ्यासाठीं दार उघडशील. आपण कधीं भेटलों, तर आयुष्याच्या सुखदुःखांशीं ज्याचा संबंध नाहीं अशा परक्याला भेटावं तसंच आपण भेटूं व तसाच आपण एकमेकांचा निरोप घेऊं !

तरीहि ही गोष्ट खरी आहे, कीं असाहि एक दिवस येऊन गेला कीं जेव्हां अगदीं समीप व अगदीं समोरासमोर येऊन कांहीं काळ आपण एकत्र उभे होतो. वारा झोके घेत असतां, हिरवळ तळपत असतां व ते झाड डुलत असतां, आपलीं मनें व आपली शरीरें परस्परांच्या अगदीं समीप येऊन गेलीं. सारं जग तेव्हां मुकाट होऊन मागें सरलं, व तुझ्या माझ्या वसतीच्या त्या अस्फुट विश्वांत आपण केवळ परस्परांविषयींच विचार केला. त्या दिवशीं लहरी घेणाऱ्या त्या वाऱ्याशीं, त्या सूर्यप्रकाशाशीं व त्या वृक्षाशीं केवळ तुझा आणि माझाच संबंध आहे. तुझें आणि माझंच तें विश्व होतें, तेथें दुसऱ्या कुणासहि जागा नव्हती, व असणें शक्य नाहीं. आपण कायमचे दुरावलो, तरी त्या स्मृतींच्या सृष्टींत मात्र आपण एकत्रच राहूं. ती सृष्टी अस्पर्श आहे, अगदीं अस्पर्श आहे. आयुष्यांत उलथापालथ झाली असली, तरी त्या जगाचा कणहि आपणास बदलता येणार नाहीं.

× × ×

आज कितीतरी वर्षांनंतर अपरिचित वाटणाऱ्या त्या परिचित रस्त्यानें मी गेलों व तें झाड पाहिलें. ह्या झाडाखालीं परस्परांस भेटावयास उत्सुक झालेल्या मित्राऐवजीं द्वंद्वाच्या पवित्र्यांत सिद्ध असणाऱ्या सावध योध्यांप्रमाणें आपण भेटलों, व घाव न देतां व घाव न घेतां परस्परांपासून दूर झालों.

आज आयुष्याचे वेगळे जोडीदार आपण निवडले आहेत. परस्परांच्या उष्ण श्वासांचा शिरशिरी आणणारा स्पर्श परस्परास व्हावा, इतक्या निकट येऊन गेल्यावर आतां आपल्या आयुष्यांचे मार्ग इतके दूर फांकले आहेत कीं संसाराच्या मुशाफिरींत पुन्हां आपली भेट होणं नाहीं. तूं आपल्या जोडीदाराला सुखी केले असशील व सुखांत असशील. मलाहि आज त्या गेलेल्या दिवसाविषयीं कसलंहि दुःख नाही, कसलीहि वेदना नाहीं. फक्त एका स्पष्ट जाणीवेनें व तीव्र कुतुहलानें आज तुला येवढंच विचारावेसं वाटतं कीं,—तांबड्या फुलांनीं डंवरलेलं तें झाड, ती उन्हांत लखलखणारी हिरवळ, ते वाऱ्याचे झोत, व अनेक शक्यता पोटीं घेऊन आलेला आणि गेलेला तो दिवस् ह्याची तुला कधीं तरी आठवण होते कां ?

अनुक्रमणिका








डोंगराच्या छातीवर—कड्यापाशीं दाट झाडी
मधें घुंगट घेऊन—पहुडली दरेवाडी.
दरेवाडीचा पाटील—जशी पोलादाची कांब
उंच कपाळाच्या खालीं—दिसे डोळ्यांमधें तांब.
दाट, राठ ओठांवरी—लोंबे मिशांचा झुंबका
बारा गांव, बारा शीव—त्याच्या नांवाचा दबका.
बारा नवसांनीं झाली—बाळा पाटलाला लेक
अचपळ मुलुखाची—जशी बरचीची फेंक.
तळपते, फोफावते—वर चंद्राची कोर
तशी दिसामाशीं वाढे—बाळा पाटलाची पोर.
अंगापिंडानें दांडगा—जसा सागाचा सोडगा
चव्हाणांच्या पडळींत—आत्याबाईचा पोरगा.
घर मोलाचें, तोलाचें—नाहीं पदराचा वांधा
पोर झाली उफाड्याची—बाई सोयरीक सांधा !
आलें सारें गणगोत—टिळा लाविला कपाळीं
तीथ ठरे अष्टमीची—नेशिवली साडीचोळी.
आलं थाटानं वऱ्हाड—काय तरी बाई तोरा !
घोडं किती दामटीशी—अरे चव्हाणाच्या पोरा ?
खुंट केळीचा आणवा—बांधा आंब्याच्या डहाळ्या
बसे वऱ्हाड जेवाया—वाढा पुरणाच्या पोळ्या.
ताड ताड वाजे ताशा—निघे सनईचा सूर
हळदीनें पालटला—नव्या नवरीचा नूर.
गाल नवरीचे झाले—लाल अक्षदा लागून
लेक बाळा पाटलाची—झाली चव्हाणाची सून.
बाळा पाटलांनीं केला—गांवजेवणाचा थाट
वाढवादुनी मोडलें—गांवकऱ्यांचे पेकाट.
ताडताड वाजे ताशा—निघे सनईचा सूर
उरकून झालझेंडा—झाले पाटील निसूर.
लेक लाडकी, लाडकी,—माया दाटे उदरांत
उसासून निरवली—चव्हाणाच्या पदरांत !



# आधारवड



•• तेव्हांपासून आधारवड हें नांव मात्र मला अतिशय आवडतं. त्या शब्दाच्या उच्चाराबरोबरच कुठल्या तरी भीषण रम्य कल्पनागुंफेंत माझं मन प्रवेश करतं आणि मग....

: लेखक :

**मनोहर महादेव केळकर**

पुण्याच्या रत्नाकर मासिकानं १९३२ सालीं **तात्यांच्या** षष्ठ्यब्दपूर्ती समारंभानिमित्त केळकर—अंक प्रसिद्ध केला होता. त्यांत तात्यांच्या **अंधार वड** या कादंबरीचं पहिलं पान छापलेलं आहे. तें पान मला अतिशय आवडलं ती कादंबरी अजून अपुरीच आहे. पण तेव्हांपासून अंधार वड हें नांव मात्र मला अतिशय आवडतं. त्या शब्दाच्या उच्चाराबरोबरच कुठल्या तरी भीषण रम्य कल्पना-गुंफेंत माझं मन प्रवेश करतं. आणि मग तो शब्दच मी मनोमय आळवीत बसतो. आमच्या कौटुंबिक जीवनांतील तात्यांच्या स्थानाबद्दल विचार करतांना माझ्या मनांत वटवृक्षाचीच कल्पना येतें. पण ती अंधार वडाची मात्र नव्हे— पण **आधार वडाची** आणि ते नांवही मला मनापासून आवडतं. प्रचंड वृक्षाच्या छायेखालीं इतर लहान झाडें खुरटतात असें म्हणतात. पण आमच्या केळकरांच्या कुटुंबांत तात्यांच्या कीर्तीविस्तारानं इतर कुणाचेही यशोमार्ग कुंठित झाले नाहींत. उलट वडाच्या पारंब्या जमीनींत शिराव्यांत आणि त्यांनीं मूळ धरतांच त्यांतूनच नवा वृक्ष फोफावावा तसंच झालेलं आहे. आणि या नव्या झाडाला जर कांहीं मिळालं असेल तर तो या आधार वडाचा जीवनरसच.

आमच्या आजीआजोबांनीं अत्यंत कष्टाचा आणि काटकसरीचा पण तितकाच समाधानाचा आणि नेकीचा संसार करून आपले तीन मुलगे वाढवले. ते चांगलें निघतील एवढीच फार तर त्यांची अपेक्षा असेल. पण संसाराच्या या डावाचं आपलं दान आपल्याला इतकं चांगलं पडलं असेल अशी मात्र त्यांना कल्पनाही नसेल.

सगळीं जणं पूर्ण मार्गाला लागेपर्यंत **अप्पासाहेबांनीं** संसाराचा बोजा संभाळला. पण त्याचा सगळ्यांनीं सदुपयोगच केला. आमच्या आजीनें तर केळकरांचं घराणं थोर लौकिकाला चढलेलं आपल्या ह्यातींत बघितलें.

लेखन—भाषण—संभाषण—यांतील कुशलता हें तर केळकरांच्या सगळ्या लौकिकाचें आदि कारण. माझे थोरले चुलते नाना **येतिहास-संग्रह** नांवाच्या एका मासिकाचं संपादन करीत आणि ते अकालीं निधन न पावते तर साहित्यक्षेत्रांत त्यांनींही उत्तम लौकिक मिळवला असता. माझी **आई** गुजराथेंत जन्मली आणि थोडं फार तेथेंच शिकली. पण केळकरांच्या घरांत पाऊल टाकतांच मराठींतील पहिली स्त्री नाटककार कथालेखिका आणि व्याख्याती असा तिनें लौकिक मिळवला. आणि **तात्यांचं नांव** म्हणजे तर आमच्या कुटुंबाचा हुकुमाचा एक्काच. तात्यांनीं लिहीलेलं वाङ्मय जितकं विपुल तितकंच गुणांनींही श्रेष्ठ आहे. आणि पुढल्या काळांत ज्यावेळीं आजच्या राजकारणाचाही विसर पडलेला असेल त्यावेळींही मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत तात्यांचं स्थान अढळ राहील.

'श्रीधर मला अनेक वेळां म्हणतो कीं आपल्या केळकर कुटुंबियांच्या बोटांतून रक्ताऐवजीं शाईच वहात असली पाहिजे कारण त्या शिवाय कांहीं आपल्या घरांतल्या इतक्या जणांना लिहायचा नाद लागला नसता.' आमच्या तात्यांनीं इतकं वीस हजार पानं वाङ्मय लिहिलं ना तरी ते म्हणतात कीं रोज एक पान रोजनिशी लिहायची मला संवय असती तर अजून दहा हजार पानं वाचण्याजोगा मजकूर माझ्या हातून लिहून झाला असतां. कारण रोज असे अनेक विचार डोक्यांत येतात कीं त्यांतून एक पान मजकूर सहज लिहून व्हावा. आणि हा लिहीण्याचा आग्रह ते इतरांनाही करतात. 'अमका तमका गृहस्थ किती विद्वान आहे, काय सुरेख व्याख्यानं देतो.' असं म्हटलं म्हणजे ते म्हणतात, 'त्यानं कांहीं लिहीलं आहे कां? त्याच्या विद्वत्तेचा जगाला कांहीं उपयोग होणार आहे कां? लिहायचं मनांत आणलं तर अगदीं सामान्य माणसाला देखील उत्तम आत्मचरित्र लिहितां येईल आणि वाचकांनाहीं तें आवडेल. कारण प्रत्येकाच्या आयुष्यांत कितीतरी घडामोडी आणि प्रसंग येऊन गेलेलें असतात. मनांत साठलेलं लिहून काढयची बुद्धी मात्र पाहिजे.'

'प्रसंगीं अखंडीत वाचीत जावें' हा समर्थांचा उपदेश मनापासून कोणी आचरिला असेल तर तात्यांनींच. कुठल्याही कठीण प्रश्नांची चटकन् उकल करणारी तीक्ष्ण बुद्धि, रसिकता

अनुक्रमणिका

आणि सूक्ष्म विनोददृष्टि यामुळें कुठलाही विषय तात्या जितक्या लवकर समजून घेतात तितक्याच लवकर विशदही करून सांगतात. एकदां देवघरांत मी संध्या करायला बसलो होतो. ताईंनीं मला सांगितलं 'हातांतलं घड्याळ तेवढं बाहेर काढून ठेव हो. याला चामड्याचा पट्टा आहे ना?' मी उलट म्हटलं, तुम्हाला हरिणाजीन, व्याघ्राजीन ही चालतात, तें नाहीं वाटतं कातडं?' तात्या जवळच उभे होते. ते हंसत म्हणाले, 'अरे असा प्रत्येक नियम घासायला लागलं तर आपल्यालाच बाहेर रहावं लागेल कारण आपल्या अंगावर देखील कातडंच आहे. तेव्हां असं कीं ज्याच्या त्याच्यांत देवघर त्याचे नियम वाद न घालतां पाळावे.'

'**हास्य-विनोद-मीमांसा**' या ग्रंथाच्या लेखनाचें काम सुरूं होतें तेव्हां तर घरांत मोठी मौज असे. त्यांतल्या तात्त्विक विवेचनाचें दृष्टीनें तात्यांचें अनेक ग्रंथांचें परिशीलन चालूंच होतें पण एरवीही अनेक विनोदी प्रसंग, चुटके कोट्या वगैरेंचा पंचनामा सारखा सुरूच असे. आतां स्वतः तात्यांनाच या गोष्टींत गोडी असल्यानें आम्हीं मुलं नवीन नवीन कोट्या, चुटके वगैरे ऐकलेल्या अगर वाचलेल्या जेवतांना सांगत असूं. मग त्यावर प्रतिकोट्या झडत आणि हंशा होत असे. त्यावेळीं ज्ञानप्रकाशाचा वातमीदार घरीं असता तर रोज त्याला कॉलम-भर मजकूर 'कंसांत हंशा' घालण्याकरतां मिळाला असता. Tragic या शब्दाला एकदां प्रतिशब्द **खेदक** असा कुणी सुचवला तेव्हां साहजिकच Comic ला **मोदक** असा शब्द दुसऱ्यानें सांगितला. त्यावर तात्यांनीं मग मोदक शब्द चूक नाहीं पण योग्यही नाहीं तर प्रमोदक म्हणावें असा निर्णय दिला.

"मोदक" वरून आणखी एक गोष्ट आठवली. बापूजी अणे त्यावेळीं घरीं पाहुणे होते. गणेश चतुर्थीचा दिवस असावा म्हणून मोदक केलें होते. आम्हीं जेवायला बसलो आणि जम्नादास मेहता आले. त्यांना तात्यांनीं विचारलें, "जेवायचें आहे कां?" ते नको म्हणाले. त्यावर बापूजी म्हणाले, 'पहा बरं, आम्ही काय खातों आहोंत हें मागाहून कळलं म्हणजे पस्तावाल.' त्यावर त्यांच्या पानांतील मोदकांकडे पाहून जम्नादास म्हणाले, 'But the external evidence is not very convincing.' त्यावर तात्या म्हणाले, 'The external evidence might be misleading and if you want to do justice you have to look to the internal evidence and that you can't know unless you do justice to the dish itself.'

तात्यांच्या सहवासांत असतांना त्यांच्या स्वभावाचे आणखी देखील एक दोन पैलू मला बघायला मिळाले. टाईम्सच्या एका युरोपीयन बातमीदारानं त्यांची मुलाखत घेतली आणि त्यांतील फक्त आपल्याला साईस्कर अशी अर्धीच मुलाखत छापली. पुनः चार दिवसांनीं कांहीं कारणाकरतां तो आला. तात्यांनीं त्याला या हातचलाखीचा खुलासा विचारला तेव्हां आपल्याच गुर्मीत, "मी तुमच्या म्हणण्याला 'टाईम्स' मधून प्रसिद्धी दिली हीच विशेष गोष्ट आहे, जागा होती तेवढा भाग मी घातला." असें तो म्हणाला, त्यावरोबर 'मला प्रसिद्धी देण्याकरतां माझी स्वतःची दोन पत्रें आहेत. मला टाईम्सची गरज नाहीं. तूं येथून चालता हो. ज्या दिवशीं तूं चूक दुरुस्त करशील त्या दिवशीं परत माझ्याकडे ये.' असें सांगून तात्यांनीं त्याला बाहेरचा रस्ता दाखवला. तो मनुष्यही चूक उमगला. त्यानें योग्य ती दुरुस्ती करतांच त्याला उलट चहाला थांबवून घेऊन तात्यांनीं आपल्या मनाचा सरळपणाही दाखवला.

बापूजी अणे आणि तात्या यांचा स्नेह जवळून पाहायला मिळणें हीही एक आमच्या भाग्याची गोष्ट आहे. बापूजी तर आम्हाला घरच्यापैकींच एक वाटतात. १९३३ सालीं ते कॉंग्रेसचे प्रेसिडेंट असतांना त्यांचा मुक्काम, गांधीजींच्या पुण्यांतील वास्तव्यामुळें, दोन तीन महिने आमचेकडेच होता. तेव्हांपासून आतांपर्यंत मी पहात आलों आहे कीं राजकीय मतभेदामुळें त्यांच्या परस्परांविषयींच्या स्नेहादरांत थोडें सुद्धां अंतर पडलेलें नाहीं. या स्नेहाचा उल्लेख नुकताच बापूजींनीं मोठ्या कौतुकानें एका व्याख्यानांत केला होता. त्यावेळीं मतभेद आणि स्नेह याबद्दल तात्या म्हणालें, 'आमचा स्नेह हा अभ्रकाच्या पातळ पडद्या-प्रमाणें आहे. त्यामुळें दोघांचे मतभेद कितीही तीव्र असले तरीं अभ्रकांतून ज्याप्रमाणें विजेचा प्रवाह जाऊं शकत नाहीं त्या-प्रमाणें परस्परांच्या विचाराचें अंतर जरी त्या पडद्यांतून दिसत असलें तरी त्यांचा एकमेकांला धक्का लागत नाहीं.' बापूजी स्नानसंध्याशील असे कडवे ब्राम्हण, तात्या त्या मानानें सुधारक. तरीही तात्या हिंदुसभेचा पाठपुरावा करणारे तर बापूजी कॉंग्रेचा पाठपुरावा करणारे, असे अनेक विरोध आणि विरोधाभास असूनही या दोघांचा स्नेह मात्र अकृत्रिम असावा हेहीं कौतुकाचेंच नाही काय?

तात्या एरवीं अगदीं संथ आणि शांत पण माझ्या लहानपणीं मी एकदां त्यांच्या डोळ्यांत अश्रु उभे केले होते. ती गोष्टही योगायोगानेंच घडली. आज एकोणीस वर्षें झाली त्या गोष्टीला पण मला तो दिवस अजून स्पष्ट आठवतो. उन्हाळ्याच्या सुटींत 'पुण्याच्या घरीं' राहायला जायचा पायंडा मी त्याच वर्षी पासून पाडला होता. पुण्याला रहायला जायची ओढ मला दुसऱ्या कारणानें असे. तें म्हणजे माझी आजी. ती त्यावेळीं पुण्याच्या घरीं असे. आणि साऱ्या बालपणच्या आयुष्यांत मी जर कोणावर मनापासून भक्ति ठेवली असेल तर ती आजीवर. आणि तिची माझ्यावरची मायाही तशीच अलोट आणि,









तीय होती. तिचं चित्र आक्कानं 'आई' या हंसऱ्या निर्माल्यांत उत्तम रेखाटलं आहे हें खरं. पण कुठल्याहि चांगल्या शब्दांनीं वर्णन करण्यापलीकडचं तिचं कर्तृत्व आणि माया होती. आमच्या दोन्ही घरचा एक नाजूक पण बळकट दुवा म्हणजे आमची आजी. आणि तिची सगळ्या घरांत माझ्यावर माया म्हणून मीही घरांतला कौतुकाचा विषय होतो.

जसजसे सुटीचे दिवस संपत आले व धुळ्याला परत जायचा दिवस जवळ येत चालला तसा मी रोज आजीला म्हणे, 'आजी, आतां तुमच्याजवळ रहायचा एक दिवस कमी झाला. आतां तीनच दिवस उरले........आतां....दोनच दिवस उरले. आणि आणि मग जसा जायचा दिवस आला तसा मी मनांत अगदीं गडबडून गेलों. सकाळीं उठल्यापासून जेवण होईपर्यंत मी कसा तरी वेळ काढला. जेवण करून कपडे घातले. बाहेर टांगा आला. आणि मी घरच्या पद्धतीप्रमाणें वडील मंडळींना नमस्कार केला. त्यांत फक्त आजीला वगळलं. आजी दारांत उभी होती. शेवटीं तिला नमस्कार करायला आलो मात्र आणि मनाचा बांध फुटला. व्यायशी वर्षांची माझी आजी ऐवढी करारी, मनानं खंबीर पण जवळ गेल्याबरोबर लहान मुलाप्रमाणेंच रडूं लागली. आमचे तात्या संथ, कित्येक खरोखरीच मोठे दुःखाचे प्रसंग त्यांनीं शांत मनानें सोसलले, पण या प्रसंगीं त्यांचेही डोळे भरून आले.

योगायोग असा कीं मी सहज म्हटलेले शब्द खरे झाले. आजीच्या सहवासांतले 'फक्त दोन दिवस उरले आतां एकच उरला' म्हणून उच्चारलेले शब्द खरे झाले. मी धुळ्याला गेलो आणि तीनच महिन्यांनी आजी स्वर्गवासी झाली.

पण तो क्षण तात्याही विसरले नव्हते म्हणूनच पुढें प्रत्येक सुटींत आजी नव्हती तरी 'पुण्याच्या घरीं' जायची माझी ओढ कायमच राहिली.

आपलं घर सगळ्यांना उघडं असावं, कुणालाही आपली भेट घेतां यावी, कुणाचंही होईल तें काम आपल्या हातून पार पडावं अशाच वृत्तींत तात्या व्यक्ति आणि संस्था यांशी वागत आले. या कामीं मतभेद त्यांच्या कधींही आड आले नाहींत. उलट अनेक वेळां असं घडलं कीं ज्यांनीं त्यांचा हेवा, द्वेष अगर मत्सर केला त्यांचं बरं करायची वेळ येतांच जवळच्यापेक्षां त्यांचंच त्यांच्या हातून अधिक बरं घडलं आणि म्हणून मी अनेक वेळां त्यांना म्हणतोही कीं 'तात्या, तुमचं शत्रुत्व पत्करलं तरच एकाद्याचं काम चटकन् होतं!' पण तें कसंही असो; त्यांच्या जीवनाचं मोल आजच्या राजकारणांत कांहींही ठरो, आणि उद्यांच्या वाङ्मयांत कांहींही मोजलं जावो, आम्हां केळकर कुटुंबांतील मंडळींना तात्यांचं नांव हा एक जोडणारा धागा वाटतो. आमची आजी ही आमच्या घरगुति जीवनांत एकत्व राखणारी शक्ति, एक आधार, अशी आम्हाला वाटत असे तसे आमचे तात्या आमच्या कौटुंबिक जीवनांतील एक दुवा आणि सामाजिक जीवनांतील मोठा आधार वाटतात आणि म्हणूनच मी त्यांना ज्या वटवृक्षाची उपमा दिली त्याचं नांव **आधार वड!**

---

[ पान ३९ वरुन चालू ]

होत काय ? वच्चंमजी, पुन्हां वागेंत पाऊल तर टाका वरं. नाहीं एका तंगड्याच्या चार तंगड्या केल्या तर नांवाची गोदीच नाहीं—"

त्या कार्टीच्या एक झणझणित थोवाडींत भडकवण्याकरतां माझे हात परवानगीची वाट पहात होते. परंतु मी विवेक केला अन् म्हणालों—" गोदे, तूं जपून बोलत जा हं. मी एकदां खवळलों म्हणजे मग आपला विचार बघ. मुलगी म्हणून गय करीत आलों आहे याचा फार फायदा घेऊं नकोस—"

" अरे जा ! मुलगा म्हणून मीही पण तुझी इतके दिवस गय केली आहे. पण आतां मात्र सावध रहा. मला उगीच हट्टाला पेटवूं नकोस—" गोदा तावातावानें म्हणाली.

आणि त्या कार्टीनें त्या दिवशीं आम्हांला चांगलेच तोंडघशीं पाडलें. चहाडखोर साऱ्या मुलखाची. आम्हांला तिनें ऐन मुद्देमालानिशीं पकडून दिलें. आमच्या वंधूचा राग तो, मग काय विचारतां ! वंधूच्या गुरासारख्या बडवण्याला मी डरलों नाहीं. मधून मधून मार बसल्यानें मुलांची प्रकृति निकोप राहते अशीच माझी समजूत होती. परंतु सतत दोन वर्षें ज्या ठिकाणीं मी अनियंत्रित पुढारीपण गाजवलें त्या ठिकाणीं माझी नाचक्की एका मुलीनें उडवावी हें सहन करणें मला कठीण होतें. यावर एकच तोड होती. सार्वजनिक रीत्या गोदाची जिरवायची अन् आपलें पुढारीपण ताबून सुलाखून घ्यायचें. चारचौघांत तिची फटफजिती उडविल्याशिवाय अन् तिच्या नाकातोंडांत शरणागताचें मीठ कोंवल्याशिवाय माझी धडगत नव्हती. नाहीं तर उघडउघड दोन पक्ष होणार. गोदाच्या बाजूला जाऊन मिळण्याविषयीं वरीच भेकड मुलें तळमळत असल्याचें मला स्पष्ट दिसत होतें. त्यांच्यावर जरब बसवायची म्हणजे तिची उघड नाचक्की घडवून आणायला पाहिजे होती.

—आणि दैवानें खैर केली व आठ दिवसांनीच योग जुळून आला. माझे वंधु कांहीं कामानिमित्त एकदोन दिवसाच्या रजेवर पुण्याला गेले होते. गोदाचे वडील स्वतःचें काम सांभाळून, माझ्या बंधूचेंहि काम पहाण्यांत अडकून पडले होते. दुपारची वेळ होती. मोठ्या माणसांची हरकत निघण्याचें कारण दिसत नव्हते. तोंडावर सौजन्याचा दिमाख आणून मी गोदाला म्हटलें—, " चल, आपण सूरपारंव्या खेळूं—"

माझ्या मनांतील कपट न ओळखून गोदानें परकराचा काचा मारीत घराबाहेर पाऊल टाकलें. पांच पंधरा मुलें मी जमा केलीं. आणि सुमारे अर्धा पाऊण तास आम्ही खूप खेळलों. आणि शेवटीं गोदाला खिजवण्यासाठीं हळूंच म्हणालों, " किती झालं तरी पुरूष ते पुरूषच—"

"का ? पुरुषांना काय बैलासारखीं दोन शिंगं असतात वाटतं ! गाढवासारखे लांब कान असतात वाटतं—" गोदा म्हणाली.

"शिव्या दिल्यानें तुझी बाजू सिद्ध होते वाटतं ! चार उड्या मारल्या नाहीं तर गाजरासारखी लाल भडक पडली आहेस." मी खवचटपणानें म्हणालों.

"ती गोरी आहे म्हणून—" एकजण गोदाची बाजू सावरीत म्हणाला. मी त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून गोदाला म्हटलें, "माझी खात्री आहे कीं यावेळीं त्या समोरच्या सिग्नलपर्यंत पळून यायची धमक तुझ्या अंगांत मुळींच नाहीं"

"तूं काय मला शेणाची बाहुली समजतोस काय ? चल, आपली दोघांची शर्यत. जो मागे राहील त्यानं मूठभर माती खाल्ली पाहिजे. आहे कबूल !" गोदा ताडकन् उठून म्हणाली. शर्यतीचा विडा डावलणें मला शक्य नव्हतें. मी खूप दमलों होतों तरी तिचें आव्हान स्वीकारण्यावाचून गत्यंतर नव्हतें. तरी पण तिला दाबून टाकण्याच्या इराद्यानें गाल फुगवून म्हणालों, "हॅंः ! सिग्नलपर्यंतच ? त्या समोरच्या टेकडीला वळसा घालून येण्याची तयारी असेल तर आपण तयार आहों—"

"उगाच ऐट दाखवूं नकोस. माती खायला लागेल. चल ऊठ, पाहूं—" गोदा मला बखोटीला धरून उठवीत म्हणाली.

आतां माघार घेणें शक्यच नव्हतें. एक, दोन, तीन म्हटल्या-बरोबर ती शर्यत सुटली. समोरच्या टेकडीला वळसा घालून येणें म्हणजे बरोबर तीन मैलांचा गरका होता. आणि अर्धा पाऊण तास खेळल्यावर माझ्या आवांक्या बाहेरची ती गोष्ट होती. गोदालाही पण ती शर्यत पुरी करतां येणार नाहीं ही मला खात्री होती. काट्याकुट्यांतून, दगड धोंडे तुडवीत तीन साडे-तीन मैल पळून येणें ही गोष्ट तोंडची नव्हती. परंतु आवेशाच्या भरांत ती आपत्ती आम्ही आपल्यावर ओढवून घेतली होती. दैवावर भरंवसा ठेवून मी डोळे मिटून धावूं लागलों. दोन तीन ठिकाणीं मी ठेंचाळलों. दोन्ही गुडघे फोडून घेतले—व शर्य-तीचा नाद सोडून अर्ध्या वाटेंतूनच माघारीं चालत आलों. परंतु गोदा धावतच होती.

अर्ध्या पाऊण तासानें गोदा धावत आली. दांतावर दांत ठेवून गोदानें शर्यत जिंकली होती. परकर तीनचार ठिकाणीं फाटलेला होता. तिचे दोन्ही गुडघे रक्तानें व मातीनें माखले होते, तोंड घामानें लेथाडलेलें होतें. ती धापा टाकीत होती—परंतु विजयाच्या आनंदानें ती बेहोष झालेली होती. आतां कबूल करायला हरकत नाहीं पण त्या वेळचें तिचें तें रूप पाहून वयाच्या दहाव्या वर्षी माझ्या डोक्यांत कसलीतरी एक



(सुप्त) आशा क्षणभरच चमकून गेली. परंतु दुसऱ्याच क्षणीं मी स्वतःला सावरून धरलें. शत्रूच्या विजयाबद्दल आपुलकी बाळगणें हें नामर्दपणाचें द्योतक आहे ! परंतु गोदाला तोंड दाखविण्याची सोय नसल्यामुळें मी तिच्या आणि भोंवतालीं मजा बघण्यासाठीं गोळा झालेल्या मुलांच्या चिडवण्याकडे दुर्लक्ष करून पराभूत मनानें घरांत निघून गेलों.)

गोदाशीं उघड सामना देणें अशक्य होतें हें मला स्पष्ट कळून चुकलें. धाडस, पराक्रम यांत तो आपल्याला हार जाणें शक्य नाहीं हें उघड दिसत होतें. परंतु तिला अजिबात मोकळी सोडणें हेंही युक्त नव्हतें. तिची खोडकी तर जिरवायचीच—पण ती कोणत्या गनिमी काव्यानें ? दोन दिवस मी खूप विचार केला—

परंतु तिसऱ्याच दिवशीं गोदाच्या आईचें देहावसान झालें.

गोदा मला पुन्हां दिसली नाहीं. सगळ्याच गोष्टी घाईघाईनें घडून आल्या. आईच्या मृत्यूनंतर पंधरा दिवसांनीं गोदा वडिलांबरोबर पुण्याला निघून गेली. आणि एक महिन्यानंतर गोदाचे वडील अदमासें वीस वर्षे वयाच्या नवविवाहित पत्नीला घेऊन परत आले. गोदा त्यांच्याबरोबर आली नाहीं. पुण्याला मावशीकडे तिला ठेवण्यांत आली. आणि—आणि—हो ! कबूल करतों. मला अतिशय वाईट वाटलें ! गोदाच्या सध्यांच्या परिस्थितीची मला पूर्णपणें जाणीव असणें शक्य नव्हतें. तरीपण एका विजयी वीरावर हे प्रसंग कोसळावेत हें मला बरोबर वाटलें नाहीं. गोदा निघून गेल्यावर मला तिच्याविषयीं एकाएकी अतिशय सहानुभूति वाटूं लागली. सूडाचे विचार मनांत बाळगल्याबद्दल मला खेद वाटूं लागला—. परंतु तिची क्षमा मागण्याची मला संधि मिळूं शकली नाहीं.

—आणि बरोब्बर पंधरा वर्षांनीं तिची कालच गाठ पडली.

लक्ष्मीरोडनें मी सायकलीवरून येत होतों. कोपऱ्यावर एक टांगा समोरून जात होता. त्याला वाट देण्यासाठीं मी जरा बाजूला सायकल वळवली आणि—"बापू—" म्हणून टांग्या-तल्या बाईनें मला हाक मारलेली मी ऐकली. इतक्या परिचित-पणानें मला कोणी हटकलें म्हणून मी आश्चर्यानें त्या थांबलेल्या टांग्याकडे पाहूं लागलों. सुमारे पंचवीस तीस वर्षे वयाची बाई चार निस्तेज चेहऱ्याच्या मुलांना संभाळून बसलेली मला दिसली. एका तान्ह्या मुलाला तिनें मांडीवर घेतलें होतें. दोन वाढत्या वयाचीं मुलें तिच्या दोन्ही बाजूस कोंबण्यांत आलेली होतीं. व एक सात आठ वर्षांचा हडकुळा पोरगा पुढच्या बाजूस बसलेला होता. त्या बाईची दशा उडालेली स्पष्ट दिसत होती. दोन्ही गालांच्या वाट्या झालेल्या, कपाळावर कुंकूं नस-लेले, फाटके, मळके आणि विटके वस्त्र नेसलेलें तें दैन्यवाणें ध्यान मी ओळखूं शकलों नाहीं. "मी डिकसळच्या देशपांडे

**अंबर ज्युवेलरी** मोहक बनावटीच्या अनेक तऱ्हांमध्ये मिळते. ती उंची दर्जाची असल्याच्या गॅरंटीने विकली जाते व तिचा मूळचा रंग व तेज १० वर्षेपर्यंत टिकते. ती अशा प्रकारें घडविली जाते, की तिच्यावर ॲसिडचा परिणाम होत नाहीं अगर हवेंतील बदलामुळे ती काळी पडत नाहीं. अल्पांश किंमतींत खऱ्या सोन्याचें सौख्य अंबर ज्युवेलरी देते. तिच्यावर खऱ्या सोन्याचें जाड अिलेक्ट्रो-प्लेटिंग केलें असल्याने वापरांत ती खऱ्या सोन्यासारखीच असते. सोन्याचा भाव भलताच कडाडल्याने तर अंबर ज्युवेलरी अत्यावश्यक झाली आहे.

## किरकोळ किंमती

| | रु. | आ. | | रु. | आ. |
|---|---|---|---|---|---|
| १ गळ्यांतील दुहेरी सांखळी २२ | ८ | ८ | १८ खऱ्या कल्चर मोत्याची कुडी जोड | २० | ८ |
| २ चपला हार दुहेरी | ८ | ८ | १९ फॅन्सी बांगड्या जोडी | ३ | ८ |
| " " तिहेरी | ११ | ८ | २० पाटली जोडी | १० | ८ |
| " चार पदरी | १३ | ८ | २१ फॅन्सी रिस्टवॉच चेन | ८ | ८ |
| ३ गोल मण्यांची माळ | १३ | ८ | २२ तीन खड्यांची आंगठी | ७ | ८ |
| ४ फॅन्सी हार | १६ | ८ | २३ खड्याची आंगठी | ५ | ८ |
| इअरिंग जोडी:— | | | २४ इमिटेशन कल्चर मोत्यांची नथ | ७ | ८ |
| ५ स्वस्तिक डिझाइन | ५ | ० | २५ फॅन्सी सांखळी लॉकेटसह | ७ | १२ |
| ६ चंद्रकोर डिझाइन | ६ | ० | २६ कफ बटणें जोडी | ५ | ४ |
| ७ फिलग्री डिझाइन | ६ | ० | २७ फॅन्सी बांगड्या जोडी | ३ | ८ |
| ८ " " | ९ | ८ | २८ फॅन्सी तोडे जोड | १३ | ८ |
| ९ दिल्ली डिझाइनची खड्याची | १२ | ८ | २९ आंगठी | ४ | ८ |
| १० सूर्यफूल डिझाइन | ६ | ० | ३० सात खड्यांची आंगठी | १० | ८ |
| ११ ७ खड्यांची कुडी | १२ | ८ | ३१ फॅन्सी रिस्ट वॉच चेन | ८ | ८ |
| १२ कमळ डिझाइन | ५ | ० | ३२ गुलाब डिझाइनचें फूल | ६ | ८ |
| १३ फिलग्री डिझाइन | ५ | ४ | ३३ फॅन्सी गळ्यांतील सांखळी | ७ | १२ |
| १४ " " | ६ | ० | ३४ चार शर्ट बटनांचा सेट | ५ | ४ |
| १५ " | ९ | ८ | | | |
| १६ | ७ | ८ | | | |
| १७ " | ४ | ८ | | | |

एजन्ट्स पाहिजेत. आमचा ३०० नाविण्यपूर्ण डिझाइनचा कॅटलॉग मोफत मिळेल

कायम चकाकीची

# अम्बर ज्युवेलरी

बी. ओ. अंबर अँड सन
१५७ गिरगांव रोड मुंबई ४

अनुक्रमणिका

मास्तरांची गोदा—मला ओळखलं नाहींस ?" त्या बाईनें हे शब्द तोंडा वाटें काढतांच माझ्या सगळ्या आठवणी खडबडून जाग्या झाल्या—.

"कोण ? तुम्ही गोदूताई ? अन् अशा—" मी पुढें काय बोलावें तें न सुचल्यामुळें एकदम गप्प झालों.

"सारं कांहीं सांगतें. तुला वेळ असेल तर चल माझ्याबरोबर. कसब्यांत मी राहात असते—"

वाटेनें फारसें न बोलतां मी तिच्या बिऱ्हाडीं पोहोंचलों.

आणि वाड्यांत शिरतांना मला एकदम कसेसेंच झालें. कसव्यांतलीं घरें राजवाड्यासारखी असतील अशी माझी मुळींच कल्पना नव्हती. परंतु माणसें त्या ठिकाणीं राहातात म्हणजे अगदींच गुरांचे गोठे नसतील एवढी मात्र अपेक्षा होती. परंतु तो अंधेरा वाडा पाहतांच माझ्या मनांत एकदम शिसारी उत्पन्न झाली. चार पोरांचें लटांबर संभाळीत गोदानें मला एका लांबच-लांब बोळकंडींतून वाड्याच्या मागच्या बाजूस नेलें. ढेकणांप्रमाणें माणसांनीं बुजबुजलेला तो वाडा पाहून मला अतिशय वाईट वाटलें. गोदूनें खोलीचें कुलूप काढलें—व तिनें पुढें केलेल्या एका फाटक्या चटईवर अंधारांत बसून राहिलों. वाड्यांतील सर्व लोकांची धुणीभांडी करण्याची मोरी शेजारीच बाहेरच्या बाजूस होती. त्याला लागूनच एका बाजूस दोन म्हशी बांधण्यांत आलेल्या होत्या व पलीकडच्या बाजूस दोन शौचकूप—! छे ! कानाभोंवती गुणगुणाऱ्या डांसाला हातानें वारीत मी अर्धवट उठून म्हणालों,—"गोदूताई, मी उद्यां आलों तर चालेल का ? जरा गडबडींत आहे म्हणून—"

"बैस रे ! पुरुषासारखा पुरुष तूं अन् असा डरतोस काय ? आज दहा वर्षें लग्न झाल्यापासून याच दीड खणाच्या गोठांत मी राहत आलें आहे. मी घाबरलें नाहीं. अन् पांच मिनिटं येऊन झाली नाहीं तर लगेच उठलास. बैस पाहूं. थांब थोडा चहा करतें—" गोदू चुलींत लांकडें ढोसून म्हणाली.

"कशाला चहाचा त्रास करून घेतां ? गोदूताई, खरंच मी उद्यां आलों तर नाहीं का चालायचं ?" अगतिकपणानें मी म्हणालों.

"वेडा आहेस ! पंधरा वर्षांनीं भेटलेल्या माणसांना तसं सोडायचं नसतं ! आतां हा गुळाचा चहा देतें तो ढोस अन् खुशाल तोंड काळं कर. तुला तसा सोडीन म्हणतोस होय ? आपल्या लहानपणच्या दोस्तीणीचं हें दरिद्री वैभव तर एकदां डोळ्याखालून घालशील कीं नाहीं ? साखऱ्या नाहीं म्हणून गुळाचा चहा. धान्य आणायला पैसे नाहींत म्हणून एक वेळ जेवण. नेसायला धड वस्त्र नाहीं म्हणून ही जुनीं दोन पातळं एकालाएक शिवून घेतलेली. लाकूडवाल्याचं देणं, वाण्याचं देणं गवळ्याचं देणं—अन् घरवाल्याशीं रोज धिंगामस्ती. शिवाय वर उरावर हे चार राजपुत्र आहेतच. आहे कीं नाहीं मी खरोखरीची राणी चंद्रावती ?—"





अनुक्रमणिका

"गोदूताई, तुम्हीं असं बोलूं लागलांत म्हणजे मी काय बोलावं तेंच समजत नाहीं—" ओशाळपणानें मी कसेंबसें म्हणालों.

"आधीं तूं हा नसता अहो जाहोचा मंत्र सोडून दे पाहूं. निर्लज्जा, मगापासून पाहतें आहें गोदूताई, गोदूताई ! पंचवीसाव्या वर्षीं मी काय आजीबाई झालें वाटतं ? आपलं पूर्वीसारखं गोदा म्हण. गोदीटले म्हटलंस तरी चालेल—नव्हे, मला आनंदच वाटेल."

"पण गोदूताई—चुकलों. गोदे, मला सगळी हकीकत सांग एकदां. ही अशी तुझी दशा कशी झाली—?"

गोदीनें मला गुळाचा चहा बळेंबळें प्यायला लावला आणि सगळी रडकथा ऐकायला लावली.

थोडक्यांत तिच्या आयुष्याची माती झाल्याचें मला स्पष्ट कळून चुकलें. सावत्र आईचें व गोदाचें मुळींच पटलें नाहीं.

"कसें पटणार ?" गोदा सांगूं लागली, "सावत्र आया सवतीच्या पोरांच्या खस्ता खाण्यासाठीं घरांत येत नसतात. त्यांना छळायाचें सुख उपभोगण्यासाठींच त्या घरांत पाऊल टाकतात. माझे वडील पार बदलून गेले. नवीन जमान्यांत माझी धडगत लागेलसें दिसेना. मी दोन वर्षांनीं मावशीच्या घरींच कायमची राहूं लागलें. वयाच्या पंधराव्या वर्षीं मावशीनें पसंत केलेल्या एका चाळीशी उलटून गेलेल्या खोकडाच्या गळ्यांत माळ घालून मोकळी झालें. वडील किंवा मातोश्री यापैकीं कोणीही माझ्या लग्नाला आले नाहींं. मावशीनेंच माझें कन्यादान केलें. कापडाच्या दुकानांत पंचवीस रुपयांवर माझें सौभाग्य नोकरीला होतें. प्रथम सुरवातीस जरा बरें होतें. गरीबी होतीच पण इतकी दुर्दशा उडत नसे. चार मुलं मला झालेली तुला दिसत आहे. दारिद्र्यानं अन् पोरांच्या लेंढरानं माझी ही दशा झाली. एक एक दोन दोन डिग्री ताप अंगावर काढण्याची महिना महिना मला आतां संवय झाली आहे. तशांत मागच्या वर्षी माझं म्हातारं सौभाग्य एकाएकीं मावळलें. लढाईमुळें खर्च बेसुमार वाढला अन् घरांत महिन्याला तीस रुपयाच्यावर एक दिडकी येईल तर शपथ. ही स्थिति मागच्या श्रावण महिन्यापर्यंत होती. त्या नंतर तर आकाशच कोसळल्यासारखं झालं आहे. काय करावं हेंच सुचत नाहीं—"

"पण तुझ्या वडिलांना कांहीं माहीत नाहीं ? किती झालं तरी त्यांची तूं मुलगी आहेस—" मी मध्येंच म्हणालों.

"पण आतां त्यांना आणखी सहा जण मुलगे आहेत कीं, त्यांची काय वाट ? अन् बापू, त्यांनी बायकोच्या नादांत माझं नांव आपण होऊन टाकलं आहे तर त्यांच्या पुढें दांत विचकणं मला तरी बरं दिसेल का ? जीव गेला तर धर्मार्थ मला जाळलं जाईल पण पुन्हां मी त्यांच्या दारांत पाऊल टाकणार नाहीं. आत्तां टांग्यांतून एका मिशनऱ्याकडे गेलें होतें—"

"काय ?" मी थावरून बोललों.

"घाबरूं नकोस. पोरांना धर्म मोडायला लावणं मला शक्य नाहीं. तें पाप माझ्या हातून कदापिही होणार नाहीं. पण एक विचार आला होता कीं निदान गोळाभर अन्न अन् अब्रू झाकण्या पुरतं वस्त्र त्यांना तरी मिळूं दे. कुणाच्या का घरीं वाढेनांत- –उद्यां मोठे झाल्यावर काय करतील ते करतील—पण आज त्यांना जगवणं हें तर आपलं कर्तव्य आहे नं !. गरिबांचा सूड देव असा काढीत असतो. गरिबांचं एक कार्टं एकाद्या रोगानें मरेल तर शपथ. हाडाचे सापळे होतील त्याचे पण जगतील—" गोदेच्या आवाजांतील खिन्नपणा झाकण्यासारखा नव्हता.

"असं तुला बोलवतं तरी कसं ? तुझींच मुलं आहते तीं—" मी म्हणालों.

"माझी मुलं आहेत म्हणूनच माझ्या आतड्याला पीळ पडून मी हें बोलतें आहें. तुला गरिबांचीं सुखं कळायचीं नाहींत, बापू ! तुला खोटें वाटेल परंतु लढाईच्या धामधुमींत आमच्या घरावर बॉंब पडून आमचा सत्यानाश होऊं दे म्हणून मी देवाला रोज नवस करीत होतें. पण आमच्या नशिबांत तेंही सुख लिहिलं नव्हतं. रोज जगांत इतकी लक्षावधि माणसं मारलीं जात असतां आम्ही मात्र खड्यासारखे वगळले गेलों. लढाई थांबली आहे. आतां तीही आशा नाहींशी झाली–"

"गोदा, हें बोलणं तुला शोभत नाहीं. माणुसकी सोडून तूं बोलते आहेस—" तिला धीर देण्यासाठीं म्हणून मी म्हणालों. परंतु यावर ती एकदम उसळेल असें मात्र मला मुळींच वाटलें नाहीं. खालचा ओठ वरच्या दांतांनीं जोरानें चावून ती म्हणाली—, "माणुसकीच्या गप्पा माझ्यापुढें मारूं नकोस. माणुसकीच्या थापा सर्वच जण मारीत असतात—पण बापू, हें प्रश्न साध्या माणुसकीनें सुटतील असं तुला खरोखरी वाटतं? माणसांत जर माणुसकीचा लवलेश शिल्लक असतां तर मोठ्या नांवाखालीं, गोड तत्त्वांच्या आड दडून माणसांनी माणसाला मारण्याचं हें जें सत्र आरंभलं आहे याचा अर्थ कसा लावायचा? माणुसकीचें थोतांड दुसऱ्याच्या डोळ्यांत धूळ फेकण्यासाठीं कावेबाज लोकांनी निर्माण केलें आहे. फार कशाला? तुला माणुसकी दाखवावीशी वाटते नं—? ही चारी पोरं तुझ्या हवाली करतें—जा त्यांना घेऊन. त्यांचे आईबाप तूंच हो—"

येथवर मजल आल्यावर पुढें बोलणें मला अशक्य होऊन बसलें. दुसऱ्या दिवशीं परत येण्याचें वचन देऊन मी आपली कशीबशी सुटका करून घेतली.—रात्रभर माझ्या डोक्यांत विचाराचें काहूर माजून राहिलें होतें. पत्नीला मी यासंबंधीं अवाक्षरानें बोललों नाहीं, कारण तिच्या ज्ञानाची कुवत मी पूर्णपणें जाणून होतों. गोदीच्या एकंदर परिस्थितीची मला कींव येत होत होती. पण चेष्टेनें म्हणून मुलांना पोसण्याचें तिनें टाकलेलें आव्हान स्वीकारणें मला शक्य नव्हतें. मागें एकदां तिचें शर्यतीचें आव्हान मी स्वीकारलें होतें त्याचें काय तीन तेरा झाले ते मी विसरलों नव्हतों. पुन्हां हात दाखवून घेण्याची माझी तयारी नव्हती. मग गोदीच्या संकटाची वाट काय? त्यांतून तिची सुटका होणें शक्यच नाहीं काय?

माणुसकीच्या गप्पा सर्व जग लांब जीभ काढून बोलत असतें, आणि त्याच वेळीं आपल्याला अनिष्ट वाटणाऱ्या माणसाच्या नरडीला नख लावीत असतें. माणसाच्या जगांत माणुसकीची कोणालाच पर्वा नाहीं. आणि ती कदर ज्या थोड्यांना वाटत असेल त्यांचें ऐकून घ्यायला कोणाला इच्छा आणि वेळ आहे? आणि खरोखरीच हे प्रश्न साध्या माणुसकीच्या लंब्याचवड्या बातांनीं कधींतरी सुटतील काय? गोदीच्या प्राप्तपरिस्थितिविषयीं अत्यंत सहानुभूति वाटत असून सुद्धां मी लाचार होतों. गोदीच्या सबंध आयुष्याची माती झालेली मी पहात होतों. पण तसं पाहिलं तर माझ्या आयुष्याचें तरी काय एवढें मोठेंसें सोनें झालें होतें? थोरल्या बंधूच्या कृपाछत्राचा आधार तुटल्यावर मी सुद्धां वाऱ्यावर वहात चाललों होतों. विधवा वहिनी आणि तिचीं दोन मुलें मी सांभाळीत होतों. लष्करी गरजेसाठीं निर्माण करण्यांत आलेल्या दरमहा ९० रुपये किंमतीच्या हंगामी नोकरीचा मी धनी होतों. गरज संपल्यावर मला केव्हां लाथ मारण्यांत येईल याचा भरंवसा नव्हता. माणुसकी म्हणून मला जगवण्यांत येत नव्हतें हें उघड होतें. अशा परिस्थितींत मी तरी काय करूं शकणार होतों?

एकदम मी भानावर आलों. अंधार दाटत चालला होता. आणि लवकर घरीं परतण्याविषयीं मला बजावण्यांत आलें होतें. घरीं गेल्यावर प्रथम चारदोन वाक्सुमनांचा वर्षाव होणार हें निश्चित. विचारासरशीं मी जागचा उठून रस्त्याला लागलों. दुष्ट विचार मनांत आला. गोदूला आपल्या घरचा पत्ता आपण दिला नव्हता. तिला या पुढें न भेटण्याचा कोडगा विचार मी कायम करून टाकला.

मी तरी काय करूं? जगांत इतर अन्याय काय थोडे आहेत? मातींतून सोनें निर्माण करण्याची खुळी आशा उरशीं कवटाळून धरण्यांत काय अर्थ आहे? लक्षावधि माणसें एका बाँबच्या तडाक्यासरशी जगाच्या पांठीवरून कायमचीं पुरली गेलीं म्हणून युद्धांचे खेळ या पुढें बंद पडतील ही आशा खुळचटपणाची आहे. माणुसकीचा तोंडानें जप करीत, हातांतील शस्त्रानें माणसचा कोथळा बाहेर काढण्याचा खेळ जगाच्या अंतापर्यंत चालू राहणारा आहे. ज्यानें त्यानें आपआपल्या पुरतें व्हावें हाच जगाचा नियम दिसतो आहे, त्याला अपवाद होण्याची वेडी आशा मी कशाला धरूं? लक्षावधि माणसें मेलीं त्याप्रमाणें उद्यां कदाचित् गोदीही मरेल, तिचीं मुलंही तडफडून मरतील--आणि मी तरी थोडाच अमर आहे? कशाला मी काळजी करूं?

---

लेखकः—प्रो. ज. नी. कर्वे, M. Sc.

# सर्पमणि



**•• सर्पमणि हा मनुष्याच्या कल्पनाशक्तीनें निर्माण केलेला आहे. लेखकानें स्वतः सात-आठ नागांच्या डोक्याचें अत्यंत काळजीपूर्वक विच्छेदन केलेलें आहे पण एकाहि नागाच्या डोक्यांत अशा प्रकारचा मणि आढळून आला नाहीं....!**

• कांहीं वर्षांपूर्वी घडलेली ती गोष्ट आजहि मला डोळ्यांसमोर दिसत आहे. आमच्या येथें एक गारुडी आला व तो परसांत असलेल्या विहिरीकडे बोट दाखवून म्हणाला, "या विहिरीच्या आसपास माजलेल्या झुडपांत नाग आहे तो काढून न्यायची मला परवानगी द्या. नाग अगदीं अस्सल काळा आहे." ही परवानगी आम्हीं त्याला लगेच दिली हें सांगायला नकोच. तो विहिरीच्या जवळ जाऊन बसला व आपल्या पोतडींतून पुंगी काढून ती वाजवायला त्यानें सुरवात केली. आम्ही वरीच मंडळी तो काय करतो हें पहाण्याकरितां मोठ्या कुतूहलानें त्याच्यापासून थोड्या अंतरावर उभे राहिलों. सरासरी अर्धा तास तेथें बसून त्यानें पुंगी वाजविली असेल नसेल तोंच विहिरीपासच्या झुडपांतून वारभर लांबीचा एक काळा नाग बाहेर पडला व गारुड्याच्या रोखानें पुढें येऊं लागला. तो बराच पुढें आल्यावर त्यानें पुंगी वाजविणें बंद केलें व पुढें जाऊन अत्यंत चपळाईनें डोक्याच्या (फणीच्या) मागें त्यानें त्या नागाला घट्ट पकडलें. त्याबरोबर नागानें त्याच्या हाताला करकचून दोन तीन विळखे घातले व त्याच्या डाव्या हाताला मनगटाच्या मागें तो चावला. गारुड्यानें त्या नागावरची आपली पकड सैल न करतां एका काठीनें त्याचे विळखे काढले व आपल्या जवळच्या एका रिकाम्या पेटाऱ्यांत त्याला कोंबला. नागाला बंदिस्त केल्यावर त्यानें आपल्या पोतडींतून काळसर रंगाची दगडासारखी दिसणारी एक बोराएवढी ओबडधोबड वस्तु काढली व तिनें साप ज्या ठिकाणीं चावला होता त्याचे पुढें एक व मागें एक अशा हाता भोंवतीं दोन रेघा काढल्या. या दोन रेघांच्या मधली जागा त्यानें त्या वस्तूनें खूप जोरानें कांहीं वेळ घांसली व नंतर जखमेवर ती वस्तु जोरानें दाबून धरली. हा प्रकार सुमारें पाऊण तास चालला होता. हें झाल्यावर सापाच्या विषापासून आतां आपल्याला कांहीं धोका नाहीं असें गारुड्यानें आम्हाला सांगितलें. हातावर घासलेली वस्तु काय आहे याची चौकशी करतां नागाच्या डोक्यांतला मणि आहे व कोणत्याहि सापाची विषबाधा नाहींशी करण्याचा गुण त्यांत आहे असें त्यानें आम्हाला सांगितलें. गारुडी तो मणि विकीत असेल तर पहावें असें वाटून माझ्या आजोबांनीं त्याला तसें विचारलें पण तो मणि विकायला तयार होईना. शेवटीं दोनशें रुपयांना तो मणि विकायला कबूल झाला पण सौदा न पटल्यामुळें तो गारुडी निघून गेला.

सर्पमण्याबद्दल माझ्या मनांत त्या दिवसापासून जी जिज्ञासा उत्पन्न झाली ती आज देखील कायम आहे. सर्पमणि सापाच्या डोक्यांत कोणत्या ठिकाणीं असतो, तो कसा काढतात, काढण्याचें काम कोण करतात वगैरे माहिती मिळविण्याचा मी प्रयत्न केला पण समाधानकारक माहिती मिळाली नाहीं. शक्य तर मणि कसा काढतात तें पहावें म्हणून प्रयत्न केले पण त्यांतहि निराशाच झाली. पुस्तकांतून व ऐकून जी कांहीं माहिती या विषयासंबंधानें मिळाली ती वाचकांस मनोरंजक वाटेल म्हणून या लेखांत देत आहे.

सर्पमण्याच्या अस्तित्वाविषयींची समजूत फार प्राचीन काळापासून चालत आलेली असून ती अमुकच एका देशांत रूढ होती किंवा आहे असें नाहीं. पृथ्वीच्या पाठीवरी बहुतेक देशांत ही समजूत रूढ होती व तिनें लोकांच्या मनाची पकड घेतली होती. विशेषतः ज्या देशांत नागपूजा प्रचलित होती त्या देशांतील लोकांच्या मनावर या समजुतीचा पगडा फार होता. हिंदुस्थान व इतर पौर्वात्य देशांत तर तो आजहि बऱ्याच प्रमाणांत कायम आहे. पूर्व गोलार्धांतील चीन पासून पश्चिम

[अनुक्रमणिका](#)

गोलार्धांतील पेरूपर्यंत कोणताहि देश घ्या, त्यांत केव्हां ना केव्हां तरी नागपूजा ही अस्तित्वांत होतीच.

आपल्या पुराणांतून, कथांतून, काव्यांतून ' फणारत्ना ' संबंधीं अनेक ठिकाणीं उल्लेख व वर्णनें आढळतात. पाताळलोक हा पृथ्वीच्या खालीं असल्यामुळें त्या लोकांत सूर्यप्रकाश पोंहचत नाहीं. या विभागाचा स्वामी जो शेष त्याला एक हजार डोकीं असून प्रत्येक डोक्यावर एक दीप्तिमान् मणि आहे व या हजार मण्यांमुळें पाताळलोक प्रकाशित होतो असें वर्णन पुष्कळांच्या वाचनांत आलें असेल. कथा सरित्सागरांत एके ठिकाणीं ( लंबक ९ तरंग ९६ ) " नागं फणारत्नप्रभाजालजटिलं ददर्श...." असें कर्कोटक नागाचें वर्णन आलेलें आहे. असे अनेक दाखले देतां येतील. आमचे शिल्पशास्त्रज्ञ व मूर्तिकार यांच्या नजरेंतूनहि हा सर्पमणि सुटलेला नाहीं. ज्या ज्या ठिकाणीं शिल्पकारांनीं नाग दाखविलेला आहे त्या त्या ठिकाणीं नागाच्या डोक्यावर प्रकाशकिरणांनीं युक्त असा मणि दाखवायला ते विसरलेले नाहींत. जुनीं देवळें आणि लेणीं यांतील खोदकाम जर आपण लक्ष्यपूर्वक पाहिलें तर पुष्कळ ठिकाणीं शेषशायी विष्णूची मूर्ति खोदलेली आपल्याला आढळून येते. देवगड येथील गुप्तकालीन देवालयांत शेषशायी विष्णूची एक फार सुंदर मूर्ति कोरलेली आहे. या मूर्तीतील शेषाला फक्त सातच डोकीं असून प्रत्येक डोक्याची फणा पसरलेली आहे. या फणांचें छत्र विष्णूच्या डोक्यावर धरलेलें आहे. पण आपल्या दृष्टीनें या मूर्तीमधील महत्त्वाची गोष्ट म्हणजे या सातहि डोक्यांवर एक एक अत्यंत देदीप्यमान मणि दाखविलेला आहे.

बुद्धकालीन शिल्पकलेंतहि आपल्याला हेंच आढळून येतें. अनेक लेण्यांमधून नागाचें छत्र डोक्यावर असलेले बौद्ध साधू दाखविलेले आहेत. बहुतेक ठिकाणीं या नागांच्या डोक्यावर तेजस्वी मणि कोरलेला आढळून येतो.

हिंदुस्थानांत नाग हा सर्वसाधारणपणें पवित्र मानला गेला आहे, व नागपूजा कमी अधिक प्रमाणांत सार्वत्रिक आहे. पण दक्षिण हिंदुस्थानाइतकें तिचें वेड दुसरीकडे कोठेंहि आढळत नाहीं. दक्षिण हिंदुस्थानांतील कोणत्याहि खेड्यांत अगर गावांत शिरतांना वेशीतच नाग कोरलेल्या शिला ठेवलेल्या आढळून येतात. अमंगलाचें निवारण करण्याकरितां म्हणूनच त्यांचा उपयोग केलेला असतो. या शिलांवर कोरलेल्या नागाच्या डोक्यावर देखील एक टेंगळाप्रमाणें हा मणि दाखविलेला असतो

सर्पमण्याच्या अस्तित्वा विषयींची ही समजूत फक्त हिंदुस्थानांतच रूढ नसून इतर देशांतहि ती आहे हें वर सांगितलेंच आहे. अमेरिकेंतील रेड इंडियन लोकांत अशाच तऱ्हेच्या समजुती होत्या. अमेरिकेंत " रॅटल स्नेक " ( खरखर आवाज करणारा साप ) नांवाचा एका जातीचा विषारी साप आहे. या सापाची हे लोक पूजा करीत असत. या सापांचा एक राजा असून तो आपल्या कुटुंबियांसकट एका अज्ञात दरींत रहातो. राजघराण्यांतील प्रत्येक व्यक्तीच्या डोक्यावर एक तेजस्वी मणि असून या मण्याच्या अंगीं अनेक अद्भुत गुण आहेत अशी रेड इंडियनांची समजूत होती. दक्षिण अमेरिकेंतील पेरू नांवाच्या देशांत एक तऱ्हेचा साप आढळतो. या सापाची एक जात फक्त रात्रींच्या वेळींच बाहेर पडणारी आहे असा तेथील लोकांचा समज आहे या रात्रिंचर सापाला हे लोक " कार्बक्युलो " असें म्हणतात. या लोकांची आणखी अशीहि समजुत आहे कीं कार्बंक्युलोचा जर कोणी पाठलाग करूं लागला तर त्याच्या डोक्यावर एकदम एक मणि दिसूं लागतो व त्याच्या प्रकाशानें पाठलाग करणाऱ्याचे डोळे दिपतात आणि पाठलाग करणें अशक्य होतें.

इजिप्त आणि आफ्रिकेंतील कांहीं देशांतील लोकहि नाग आणि घोणस या दोन तऱ्हेच्या सापांच्या डोक्यांत तेजस्वी मणि असतो असें मानीत. युरोपखंडांतील देशहि या समजुतीच्या तडाख्यांतून सुटलेले नाहींत. पौर्वात्य देशांतील लोकांच्या मनांत सापाच्या डोक्यांत मणि असतो एवढीच कल्पना बद्धमूल झालेली होती. पण युरोपखंडांतील देशांत तर याच्या भरीला बेडकाच्या ( Toad ) डोक्यांतहि अशाच तऱ्हेचा मणि असतो अशी समजूत रूढ होती. याचें प्रत्यंतर शेक्सपिअरच्या " As you like it " या नाटकांतील खालीं दिलेल्या ओळींत पहावयास सांपडतें.

"Sweet are the uses of advesrsity
Which like the toad ugly and venomous
Wears yet a precious jewel in its head."

हिंदुस्थानाच्या शेजारीं असलेल्या सिंहलद्वीपांतील लोक सर्पमण्याचें अस्तित्व मानणारेच आहेत पण त्यांच्या मतें हा मणि नागाच्या घशांत असतो.

सर्पमण्याच्या अंगीं अनेक अद्भुत गुण आहेत असा लोकांचा समज आहे. प्रकाश देणें हा त्यापैकीं एक होय. हा मणि ज्याच्याजवळ असतो त्याला धनप्राप्ति होते. विशेषतः गुप्तधनाचा शोध या मण्यामुळें लागतो अशी समजूत आहे. अनेक मौल्यवान धातु व रत्नें भूगर्भांत सापडतात व सापहि जमिनींतच राहतात यामुळें सापांना पुरून ठेवलेल्या संपत्तीची माहिती असते व तोच गुण मण्यांतहि उतरलेला असतो ही कार्यकारण मीमांसा या दुसऱ्या गुणाच्या बुडाशीं असणें संभवनीय आहे. श्री शिवाजी महाराजांच्या विषयीं ऐकलेल्या एका दंतकथेंत देखील सर्पमण्याचा संबंध आलेला आहे. शिवाजी महाराजांचा खजिना एकदां जवळ जवळ रिकामा झालेला



होता व मोंगलांशीं लढण्याकरितां त्यांना धनाची अत्यंत जरूर होती. त्यांनी मनोभावानें देवी भवानीची प्रार्थना केली व ते झोंपले. प्रहर रात्रीनंतर ते जागे झाले तों त्यांना डोक्यावर तेजःपुंज मणि असलेला एक नाग आपल्या पाठीमागें येण्याविषयीं खुणावत असलेला दिसला. महाराज त्याच्या पाठीमागें गेले. बरेंच अंतर तोडल्यावर नाग एके ठिकाणीं थांबला व थोड्या वेळानें निघून गेला. दुसऱ्या दिवशीं नाग थांबला होता त्या ठिकाणीं खणल्यावर महाराजांना अगणित संपत्ति सांपडली.

सर्पमण्याच्या अंगाचा तिसरा गुण म्हणजे मनुष्याला त्याच्या सहाय्यानें अदृश्य होतां येते हा होय. या समजुतीच्या बुडाशीं काय कारण असावें हें समजणें कठीण आहे. कदाचित् कल्पनेच्या स्वैर संचाराखेरीज दुसरें कांहीं नसेलहि. या मण्याचा चौथा गुण म्हणजे विषबाधेपासून संरक्षण. सर्पदंशामुळें झालेल्या विषबाधेपासूनच नव्हे तर इतर विषांपासूनें मनुष्याचा बचाव करण्याचें सामर्थ्य यांत आहे अशी समजुत आहे. या मण्याच्या अंगीं आणखी एक फार मोठा गुण असल्याबद्दल लोकांचा दृढ विश्वास होता व तो म्हणजे मेलेल्या माणसाला जिवंत करणें हा होय. अर्जुनाचा मुलगा बभ्रुवाहन यानें पांडवांनीं आरंभिलेल्या यज्ञाचा घोडा धरून ठेवला तेव्हां प्रत्यक्ष अर्जुनाला त्याच्याशीं लढावें लागलें. या युद्धांत बभ्रुवाहनाचे हातून अर्जुन मारला गेला. अर्जुनाची नागपत्नी उलूपी हिला हें वर्तमान कळल्यावर तिनें नागमणि आणून बभ्रुवाहनाला दिला व त्याच्या सहाय्यानें त्यानें अर्जुनास जिवंत केलें. ही महाभारतांतील कथा बहुतेकांनीं वाचली असेलच. हल्लींच्या काळीं नागमण्यानें मेलेला मनुष्य जिवंत झाल्याचें ऐकिवांत नाहीं.

सर्पमणि मिळविण्याचें काम अत्यंत जोखमीचें व फार अवघड अशी समजूत होती, व त्या करितां अनेक नियम व बंधनें पाळावीं लागत. ख्रिस्ती शकाच्या सुरूवातीला अपोलोनियस नांवाचा एक प्रवासी हिंदुस्थानांत आला होता. हिंदुस्थानांतील सापांच्या विषयीं त्यानें लिहिलेली माहिती फार मनोरंजक व अद्भुत आहे. मणी काढण्याकरितां "नाग" कसे धरतात त्याची हकीकत त्यानें खालील प्रमाणें दिली आहे. "नाग धरणारा मनुष्य आपल्या बरोबर एक रेशमी वस्त्र नेतो व तें नागाच्या वारूळा समोर अंथरतो. या रेशमी वस्त्रांत कलावतूनें कांहीं मंत्राचे शब्द विणलेले असतात व त्यांच्या मुळें झोंप येते. नाग धरणारा नंतर कांहीं मंत्र म्हणून नागाला बाहेर काढतो. व तो बाहेर आल्यावर मोठ्या चपळाईनें त्याच्या अंगावर तें रेशमी वस्त्र

[ पान १७३ वर चालू ]










( पान ८३ वरून चालू )

[ शेखर जातो. विश्राम वासंतीच्या तजवीरी-कडे पाहून नमस्कार करतो व लगेच तोंडांत मारून घेतो–“ या तजवीरी मागच्या देशभक्ताला नमस्कार केला मी ! ” इतक्यांत रेवाशंकर आणि चंद्रशेखर येतात. ]

विश्राम:—या–या–धोंडोपंत—आणि मग हे व्हिजिटिंग कार्ड कुणाचं ?

रे. शंकर:—माझंच ! आज आठ दहा दिवस झाले–मी आपलं नांव बदललं आहे !

विश्राम:—स्वत:च नांव बदललंत ? आणि या वयांत ? कुणाच्या मांडीवर दत्तक गेलांत कीं काय ?

रे. शंकर:—जीवनाचा रागरंग बदलतांच त्याला अनुरुप नांवही बदलायला नको कां ? माझी प्रियपत्नि रेवा हिनं आज अनेक दिवस माझ्यामागे एकसारखे टुमणें लावलं होतं कीं तिला तिच्या मैत्रिणींना “ धोंडो चिमणाजी ” या खऱ्या नांवानं ओळख करून द्यायला शरमल्या सारखं वाटतं अगदीं–म्हटलं इच्छा क्षुल्लक आहे–रेवा म्हणत होती–माझं आणि वडिलांच नांव अशीं दोन्ही नावें बदला–पण मी साफ सांगितलं कीं कांहीं झालं तरी मी माझ्या वडिलांच नांव बदलणार नाहीं ! पण गेल्या आठ दिवसांपासून हा धोंडो चिमणाजी आतां रेवा शंकर चिमणाजी झाला आहे !

चंद्रशेखरला हंसणें आवरत नाहीं– चंद्रशेखरला हंसतांना पाहून रेवाशंकर कावरा बावरा होतो, ]

रे. शंकर:—विश्राम, माझ्या लक्षांत आलं पण मला तुझ्याशीं खूप खाजगी बोलायचं आहे–तेव्हां आपण इथें दोघंच असलेलें बरं. [ विश्राम–शेखरला आंत जाण्याची खूण करतो]

शेखर—बरं आहे ! आपल्या इच्छे करितां धोंडो चिमणाजी–नव्हे नव्हे रेवाशंकर चिमणाजी ! [ शेखर हंसत हंसत आंत निघून जातो–रेवाशंकर शांतपणानें कोट टोपी काढून ठेवतो–तेवढ्यांत विश्राम टेबलावर पत्त्याचा पेशन्सचा डाव मांडतो–रेवाशंकर विश्रामच्या समोरच्या खुर्चीवर बसतो व आपल्या केंसावर लाडीकपणानें हात फिरवीत विचारतो ]

रे. शंकर:—खरंच विश्राम, नांव बदलण्यांत माझं चुकलं कारे कांहीं ?

विश्राम:—[ हातांतील पत्त्याकडे पहात ] रेवाशंकर चिमणाजी–रेवाशंकर चिमणाजी–नांव फारच चांगलं आहे ! आज मी तुम्हांला मुद्दाम बोलावलं होतं–पण मला वाटतं आपण थोडे लौकर आलात नाहीं ? माझी कांहीं हरकत नाहीं त्याला–तोंपर्यंत आपण पत्त्याचा डाव टाकूं एखादा [ विश्राम पत्ते वाटतो. रेवा शंकर त्याच्या वाटणीला आलेले पत्ते उलटे मांडून ठेवतो.

रे. शंकर:—मला तुमच्याशीं जरा खाजगी बोलायचं आहे.

विश्राम:—तुमच्या पत्निबद्दल ?

रे. शंकर:—( आश्चर्यानें ) तुम्ही कसं काय ओळखलं तें ?

विश्राम:—माझ्याही मनांत सध्या तेच विचार घोळत आहेत म्हणून ! माझी बायको आज घर सोडून जाणार आहे !

रे. शंकर:—ओऽ ! मग तुमच्याजवळ अगदीं मोकळ्या मनानं बोलायला कांहींच हरकत नाहीं. बरं आपली बायको घर सोडून जाणार–आनंद आहे ! पण कारण ?

विश्राम:—तिला माझ्या इथल्या सुखी आयुष्याचा कंटाळा आला आहे ! तुतीच्या पानांत जसे रेशमाचे किडे सांभाळतात तसे वडिलोपार्जित इस्टेस्टीच्या तुतीच्या पानांत मजेनें चालणारे आम्हां नवराबायकोचे रेशमी किड्यासारखे आयुष्य—तिला कंटाळा आला आहे ! आज दहा वर्षें झालीं आमच्या लग्नाला ! आज दहावर्षें आम्ही नवराबायको एकमेकांवर सारखं प्रेम करतो आहोत. त्या अतिपरिचयामुळें आतां आमच्या नवराबायको-च्या प्रेमाला सापमुंगसाच्या लढाईचे स्वरूप आलं आहे !

रे. शंकर:—आमच्याकडे अजून काय चाललं आहे याचा मला अंदाज लागत नाहीं ! पण नुसतं ‘ ह्यांत काय आहे–त्यांत काय आहे ? ’ या तिच्या उद्गारानींच मी गांगरून गेलो आहे ! थोडी गंमत सांगतो तुला—‘ आमक्याची बायको पळून गेली ! ” –मग तिचा कांहींतरी मानसिक छळ झाला असेल–गेली असेल पळून ! त्यांत काय झालं ?–साहित्य संमेलनाच्या अध्यक्षानीं भरसंमेलनांत ‘ रास–क्रीडा ’ केली हिचं म्हणणं ‘ मग त्यांत काय झालं ? इतकं मॉरेल करेज आतांपर्यंत कुणी दाखविलं होतं ? ’ ‘अमक्या विदुषीला लग्नाआधीं दोन मुलं झालीं.’ हिचं म्हणणं, होणारच—कुमारी मातांचा प्राब्लेम ! पहिली पत्नि हयात असतांना अमक्यांनीं दुसरी पत्नि केली—आमच्या हिचं म्हणणं–मग त्यांत काय आहे–असं कांहीं केल्याशिवाय समाज जागा आहे का झोंपला आहे तेंच कळत नाहीं ! थोडक्यांत सांगायचं म्हणजे शृंगारक्रीडा करतां करतां तोंडांतील तांबुल रसाच्या चुळा टाकाव्यात त्याप्रमाणें देशभक्तिच्या आणि वाङ्मयाच्या चार चुळा टाकणाऱ्या नागकन्या आणि त्यांचं कौतुक करणारे अजगर–भयंकर वास्तवादी ! वाङ्मयांतल्या या विचारांच्या ‘ मॉर्बिडीटीज ’ या अन्तर्भेदी विचाराच्या ‘ सारमेय संहिता ’ या विषयीं माझ्या पत्नीला भयंकर आवड निर्माण झाली आहे ! आणि तिच्या या पुरोगामी विचार क्रांतीमुळें माझी एकुलती एक मुलगी ‘ चपला ’ हिच्या आयुष्याचं मातेरं होईल कीं काय अशी मला धास्ती वाटते आहे !

विश्राम:—रेवाशंकर—आज तुम्हीं मला आश्चर्याचा धक्का दिलात ! मी समजत होतो तुमच्यासारखा माणूस संसारांत सुखी—

रे. शंकर:—माझा तुमच्याबद्दलही तोच गैरसमज होता ! असो. माझ्या धंद्यामुळेंमला घरांत लक्ष द्यायला वेळ होत नाहीं—नंतर मला चाहूल लागली कीं आमच्या घरांत सिनेमा नट नटी यांची भयंकर रहदारी सुरू झाली असून–माझी मुलगी हल्लीं कविता करते—आणि कांहीं ललित वाङ्मयही लिहिते म्हणे—त्यामुळें खोट्या स्तुती-पाठकांचे आमच्या घरीं सांजसकाळ थव्यांच्या थवे लोटत असतात ! ज्यांना सभ्य म्हणण्याचीही पंचाईत ते आमच्या पत्नीला पुरोगामी वाटतात !

विश्राम:–पण यांतून अद्याप कांहीं एखादी प्रत्यक्ष वावटळ निर्माण झालेली नाहीं ना ?

अनुक्रमणिका

रे. शंकर:—होय झाली आहे बाबा! आमच्या घरीं येणाऱ्या अशा एका खोट्या सभ्य माणसाला—मी परवां बाहेरच्या बाहेर हांकून लावला. त्यामुळें आमच्या घरांत सध्या फार मोठं वादळ माजलं आहे! "तुम्ही असा पुन्हा कुणाचा अपमान केलांत तर मी माझ्या मुलीला घेऊन घर सोडून जाईन—" अशी माझ्या पत्नीनें मला परवा नोकराचाकरा देखत धमकी दिली! विश्राम, त्या दिवसांपासून मी सामाजिक अब्रुच्या भीतीनें धास्तावल्यासारखा झालो आहे! आणि त्यांतच आज तुमची चिठ्ठी आली मा. दुष्यंत आणि प्रो. कांबळे (गोंधळून) येणार आहेत तेव्हां सहकुटुंब या म्हणून—[खिसा चाचपीत] आँ चिठ्ठी घरीं टेबलावरच राहिली वाटतं?—त्या महामायेच्या दृष्टीस पडली—तर ती धांवत येईल इकडे!

विश्राम:—रेवा शंकर, तुमची कल्पना शक्तिही फारच तल्लख दिसते! तुमची पत्नि आणि मुलगी इकडे आली तर बिघडलं कुठे? तुमची पत्नि लगेच कांहीं प्रो. कांबळ्याबरोबर पळून जाणार नाहीं!

रे. शंकर:—विश्राम, मला खरोखरच तशी धास्ती वाटते! या नवीन अस्तव्यस्त विचारानें अवखळ झालेली—पूर्वी मला एक शब्दही उलट न बोलणारी माझी एक काळची प्रिय पत्नि रेवती आता बेमुर्वतखोरपणानें गड्या चाकरादेखत मला उलट उत्तरे देऊं लागली आहे! आता स्वतःची अब्रु आपली आपल्यालाच सांभाळायला पाहिजे याची मला पूर्ण जाणीव झाली आहे. म्हणून हे सर्व आमच्या घरीं चालणारे प्रकार मी हंसण्यावारी नेतो—पण हंसतांना माझ्या छातीत काय कळ निघते म्हणतां! केवळ चिडीनंच बोलायचं झालं तर रेवतीची मी आशाच सोडली आहे! पण माझी चपला—रस्त्यानें झेंडा सत्याग्रहाकरितां तरूण तरुणी रस्त्यानें जातांना पाहून त्यांत माझी चपला कुठे दिसते आहे का हे मी आशेनें पाहात असे—पण माझी ती आशा कधींच पुरी झाली नाहीं—आणि निराशेनं घरीं यावं तर नाचाचे घुंगुरु वाजतांना ऐकू यावेत! आणि माझ्या चपलेला माझ्यापेक्षां तिच्या आईचाच ओढा जास्त आहे!

विश्राम:—रेवा शंकर, तुमची ही अपत्यस्नेहाची तडफड मला कमालीची आकर्षक वाटते! पण मी अद्याप बाप झालेलों नाहीं!

रे. शंकर:—थांब, विश्राम, मी एकदां घरी जाऊन येतों. तुमच्या आमंत्रणाची चिठ्ठी बहुतेक माझ्या टेबलावरच राहिली आहे. [जाऊ लागतो—तोंच घंटा वाजते]

विश्राम:—रेवा शंकर—जातांच आहांत तर कोण आलं असेल त्यांना आंत पाठवून द्या—सध्यां आमच्याकडे नोकर आणि धनि मीच आहे! [रेवा शंकर नुसते मानेनेंच 'हो' म्हणतो व जातो. विश्राम "कळा या लागल्या जीवा। मला की ईश्वरा ठाव्या!" हे काव्य चरण म्हणत टेबलावरची पत्रे उचलून ठेवतो आणि सहज आपला चेहरा आरशांत पहात उभा राहतो तोंच रेवती व रेवा शंकर प्रवेश करतात.]

रे. शंकर:—[उसनें हंसून] विश्राम याला म्हणतात योगायोग! तुम्हाला आतांच सांगून निघालो होतो ना की आज रेवतीला इथे येणे फार आवडेल म्हणून—आणि मी तिला तुझें आमंत्रण सांगायलाच विसरलो होतो—पण नंतर विचार केला की—हेलपाटा पडला तरी हरकत नाहीं—मी जातो आणि रेवतीला आणि चपलेला घेऊन येतो—म्हणून घरीं निघालो होतो—तों तूंच आलीस—माझा हेलपटा वाचला (मोठ्यांदा हंसतो. रेवती लाजल्यासारखी होते. विश्राम सगळ्यांना बसायला सांगतो—रेवती रेवा शंकर समोरासमोरच्या खुर्च्यांवर बसतात इतक्यांत खालीं मोटारीचा हार्न ऐकायला येतो)

विश्राम:—येस्. मास्टर दुष्यंत आणि प्रो. कांबळे आले वाटतं? आला हं मी (जातो) [रेवती—रेवाशंकर सभ्यपणानें हंसत हंसत नमस्कार करते—रेवाशंकरला नुसताच हंसतो—चपला दोघांकडेही पहात आईच्या कानाशीं लागते. रेवती उत्तर म्हणून चपलेच्या कांनात कांहींतरी सांगते. चपला रेवा शंकरकडे गंभीरपणानें पहात धरांत निघून जाते. विश्राम—मा. दुष्यंत आणि प्रो. कांबळे प्रवेश करतात. प्रो. कांबळ्यांच्या तोंडात पाईप असतो. विश्राम मा. दुष्यंतांना आदरानें बसवितो. प्रो. कांबळे एकाद्या कवीसारखा सगळीकडे पहात रेवतीजवळ येतो—संभावितपणें कृत्रिम हंसतो—रेवती त्याच्या हंसण्याला साथ देते.]

प्रो. कांबळे:—मे आय स्मोक विथ युअर परमिशन?

रेवती:—(हंसत हंसत) नो! इफ् यू डोन्ट माईन्ड!

[प्रो. कांबळे आदर दाखवीत मान हलवितो व पाईप विझवतो आणि मा. दुष्यता शेजारी येऊन बसतो.]

विश्राम:—दुष्यंत—माझ्या साध्या कार्डाच्या निमंत्रणावरून आपण स्मरण ठेवून इतके अगत्यानें याल—अशी माझी कल्पना नव्हती. वास्तविक काम माझं होतं—मी आपल्याला येऊन भेटायला पाहिजे होतं.

दुष्यंत:—आणि मी येऊन भेटलो म्हणून मला कुठें कमीपणा आला त्यांत? विश्राम—आपण दोघेही लहानपणचे मित्र आहोंत. [प्रो. कांबळे पुन्हा पाईप पेटवतात.]

विश्राम:—आपणाला पुष्कळ व्याप आहेत मी आपला फार वेळ घेऊ इच्छित नाहीं! माझा एक आतेभाऊ आहे—जमिनिची चांगलीं मशागत झाली म्हणजे जसं चांगलं पीक येतं तसं बऱ्या वाईट अनुभवांनीं त्याचं वैयक्तिक आयुष्य इतकं नांगरून निघालं आहे की आज तो बिचारा कोणचंही व्यसन किंवा नाद न करतां अन्नाला महाग झाला आहे! त्याला अद्यापपर्यंत कुठें प्रसिद्धी मिळाली नाहीं—पण तो एक चांगल्यापैकीं लेखक होणार आहे! त्यांनीं खूप खूप लिहिलं आहे—पण अद्याप त्यांनीं ते कुठे प्रसिद्धीला पाठवलं नाहीं म्हणूनच प्रसिद्ध झालेलं नाहीं. तेव्हां त्याचं एक कथानक आपण आपल्या कंपनीकरितां विकत घ्यावं अशी माझी इच्छा आहे. हें पहा हस्तलिखित —"लोक-दर्शन" म्हणून ही कथा आहे. ही कथा असामान्य आहे असें माझं मत आहे. मी हाक मारतों हं त्याला—चंद्रशेखर—




## प्रकाशित

**कादंबऱ्या**

१ **आभाळाची सावली**
( द. र. कवठेकर )....किं ८ रु.
२ **साजणी**
( ना. ह. आपटे ) ५ रु.
३ **चंदनवाडी**
( ग. त्र्यं. माडखोलकर. ) ६॥ रु.
४ **हिरवा चांफा**
( वि. स. खांडेकर ) ५ रु.
५ **दोन ध्रुव**
( „ ) ५ रु.
६ **पहिलें प्रेम** ( „ ) ३ रु.
७ **क्रौंचवध** ( „ ) ५ रु.
८ **पांढरे ढग** ( „ ) ४। रु.
९ **जळलेला मोहर** ( „ ) ३ रु.



**आगामी**
संध्या—साने गुरुजी
वटपत्रें—वि. स. खांडेकर
गुजाताई—ना. धों. ताम्हणकर
आत्मचरित्र—कृष्णा हाथीसिंग

**वैचारिक**

१ **आगरकर-व्यक्ति व विचार**
( वि. स. खांडेकर )....किं ३॥ रु.
२ **मराठीचा नाट्यसंसार** ( „ ) ३ रु.
३ **भक्ति-कुसुमें** ( काका कालेलकर ३ रु.
४ **वर्धाशिक्षण योजना**
( संपादक : आचार्य भागवत ) ४। रु.
५ **आपलें आर्थिक नियोजन**
( ह. रा. महाजनी ५ रु.
६ **मंगलधाम**
( गो. ग. तळवलकर ) ३॥ रु.
७ **सौंदर्यशोध आणि आनंदबोध**
( रा. श्री. जोग ) ८ रु.
८ **गोड निबंध भाग १. २. ३**
( साने गुरुजी ) प्रत्येकी ३ रु.

**देशमुख आणि कंपनी—पुणे २.**

**मुंबई एजंटः—महाराष्ट्र ग्रंथ-भांडार,** गिरगांव, मुंबई ४ **पुणे एजंट—संदेश एजन्सी,** अप्पा बळवंत चौक, पुणे.

अनुक्रमणिका







[ चंद्रशेखर येतो, सगळ्यांना नमस्कार करून बसतो. ]

प्रो. कांबळे:—आपलं—कांहीं वाङ्मय अद्याप प्रसिद्ध झालेलं नाहीं वाटतं ?

शेखर:—नाहीं—मी अद्याप कुठें पाठविलेलंच नाही !

दुष्यंत:—पण आपण आमच्या या प्रो. कांबळ्यांचं कांहीं वाङ्मय वाचलं असेलच ?

शेखर:—नाहीं !

दुष्यंत:—म्हणजे आश्चर्यच आहे ! बरं आपले मराठीतील आवडते लेखक ?

शेखर:—माफ करा. या प्रश्नाचं माझं उत्तर आपल्याला आवडेल असं मला वाटत नाहीं !

दुष्यंत:—तरीही ऐकायची आमची इच्छा आहे. आपली हरकत नसेल तर—

शेखर:—मला मराठीतील नव्या पिढीचे लेखक—म्हणजे चिंध्याच्या बाहुल्या तयार करणारे जिनगर वाटतात ! पांचट शृंगाराला प्रतिष्ठा यावी म्हणून त्या पांचटपणाला राजकारणाची कल्हई करणारे लोकप्रिय कल्हईवाले वाटतात ! इकडची तिकडची विचारांची मोडतोड विकीत गल्लीगल्लीनें हिंडणारे 'टाळा चावी' वाले वाटतात ! स्पष्टोक्तीची माफी करा. मी मनापासून आदर फक्त सानेगुरुजींच्या वाङ्मयाबद्दलच दाखवूं शकतो. त्यांच्या वाङ्मयांतील दोष माहीत असूनही !

विश्राम:—बरं, दुष्यंत—पण सध्या आपल्याला नव्या कथानकाची जरुरी आहे कां ? दुष्यंत—खरं सांगू—मराठींतील प्रत्येक नामांकित लेखकांचं एक एक हस्तलिखित सध्यां माझ्या टेबलावर पडून आहे—आणि त्यांतलं कोणाचं घ्यावं आणि कोणाचं घेऊं नये—याच गोंधळांत मी पडलेलो आहे ! [ चंद्रशेखर हंसतो ] का आपल्याला हंसायला काय झालं ?

शेखर:—आपल्या बोलण्यावरनं सहज एक गोष्ट मला आठवली आणि हंसायला आलं !

दुष्यंत:—सांगा तर खरं—

शेखर:—नाहीं—सांगण्यासारखी नाहीं.

विश्राम:— शेखर—नाहीं पण गोष्ट सांगायला पाहिजे.

शेखर:—कांहीं दिवसांपूर्वीची गोष्ट आहे. त्या वेळीं मी श्रीमंत होतो—माझ्याकडे एक कोकणचा पाहुणा आला—आला तो अनवाणीच म्हणून मी त्याला सहानुभूतीनें चांभाराच्या दुकानांत घेऊन गेलो—तों तो कोकणी पाहुणा दुकानांतील पादत्राणाचे प्रकार पाहून यांच्या सारखाच गोंधळला—मी त्याला सांगितले सध्या पावसाळा आहे तेव्हां वहाणाच घे, जोडे आहेतच नेहमीचे ! [ रेवाशंकर रेवती जवळ जाऊन बसतो—शेखर आंत पहात ] मी जरा आंत जाऊन येतो हं !

विश्राम:—अजून व्हावा तितका संभावित झालेला नाहीं. पण दुष्यंत—आमचा शेखर वृत्तीचा फार सरळ आहे.

दुष्यंत:—खरंच फार सरळ आहे—मी कथानक घेतों यांचं पण जरा चिडवून पाहूं का भांडं किती तापतें ते ?

रे. शंकर:—का विनाकारण चांगल्या माणसाला चिडवितां ?

प्रो. कांबळे:—खेळीमेळीनें जरा गंमत करून पाहावयाला काय हरकत आहे ?

रेवती:—खरंच, काय हरकत आहे ! हल्ली पुरोगामी जगाचं सूत्रवाक्यच आहे मुळीं हंसा—आणि लठ्ठ व्हा !

रे. शंकर:—[ रेवतीस ] रेवती मला आतां पटलं तुझं म्हणणं—बरोबर आहे तुझं म्हणणं [ सगळ्यांकडे पाहून ] बरोबर आहे आपलं म्हणणं ! हंसा आणि लठ्ठ व्हा ! दुष्यंत—जरा कराच गंमत शेखरची ! कांहीं दुष्यंत, मला वाटतं परवा प्रो. कांबळ्यांनींच तुमच्याबद्दल कुठं तरी लिहिले आहे ना कीं गेल्या महायुद्धानंतर महाराष्ट्रांत जी साडे तीन रत्नें हिंदुस्थानाला लाभली त्यांत मा. दुष्यंत नंबर एकचे आहेत म्हणून ! [ चंद्रशेखर मुकाट्यानें येऊन बसतो ]

दुष्यंत:—अहो पण त्याच्यानंतर आतां दुसरं महायुद्ध झालं आणि संपलं की ! आणि प्रो. कांबळ्यांनीं सुद्धां जें लिहिलं होतंना—तें गंभीर चेष्टेनं ! अहो ती नुसती आपुलकी, जिव्हाळा—आणि जाहिरात ! आपल्या मराठींत म्हण आहेना **अहल्या द्रौपदी तारा—त्यांत आमचं मेंढरूं धरा !** आमचा प्रो. कांबळे म्हणजे फार प्रांजळ माणूस आहे—आम्ही तर त्यांचं खाजगी नांव पुरोगामी पेंद्या म्हणून ठेवलं आहे ! तुम्ही वाटेल तसली विचारांची घाण आणा—त्याला पुरोगामी विचारांचा सुगंध कसा आणावा ही कला म्हणजे आमच्या प्रो. कांबळ्यांच्या हातचा मळ आहे ! आणि आमच्या प्रो. कांबळ्यांच्या विचाराआचारांची अशी मजा आहे कीं प्रो. कांबळ्याकडे एकीकडून पाहिलं कीं तो प्राध्यापक वाटतो आणि दुसरीकडून पाहिलं तर आचार्य वाटतो !

प्रो. कांबळे:—आणि तेच खरं आहे ! स्पष्टोक्तीची माफी करा. चंद्रशेखरनी आतां जे मराठी लेखकांबद्दल सांगितले—ते अत्यंत



प्रतिगामी-सनातनी आणि बुरसलेलं असं मत आहे! जीवनाचा दृष्टिकोन विशाल असायला पाहिजे!

दुष्यंतः—स्वतःची पत्नि आजारी असतांना—आपल्या अकलेचं निरांजन पाजळून देशभक्तीचा देखावा करीत दुसऱ्याच्या पोरीवर प्रेम करणं—पुरोगामी! स्वतःची बायको घरांत ठेवून—दुसऱ्यांच्या बायकांबरोबर नाटकांत कामं करणं—पुरोगामी! आतापर्यंत अनेक विद्वानांनीं पुरोगामी वृत्तीची व्याख्या करण्याचा प्रयत्न केला—त्यांना जमलं नाहीं—पण आमच्या प्रो. कांबळ्यांनीं पुरोगामी वृत्तीची वास्तववादी आणि बिनतोड व्याख्या केली आहे! प्रो. कांबळे एकदां ऐकवा यांनां

प्रो. कांबळेः—रस्त्यांत कुठेही गाईचं शेण असूं द्या—तो शेणाचा ढीग सनातनी -आणि प्रतिगामी! पण तोच उचलून तुमच्या हातावर ठेवा—पुरोगामी!

शेखरः—कोणच्या कॉलेजांत प्रोफेसर असतां आपण?

प्रो. कांबळेः—मी एका टेलरिंग कॉलेजांत प्रोफेसर आहे! तिथल्या कटिंग अकेडमीचा मुख्य! मी लहानपणापासूनच पुरोगामी असल्यामुळें A. B. C. D. T. D. होऊनसुद्धां टेलरिंग कॉलेजांत शिकलो आणि टेलरिंग कॉलेजांत बहुधा अशिक्षित विद्यार्थी येत असल्यामुळें—आणि ते जात्याच पुरोगामी असल्यामुळें—मी म्हणजे त्यांचा 'दादाच' त्यांना भेटल्यासारखा झालों आहे! स्वतःच सांगूं नये—पण विद्यार्थ्यांत फार प्रिय—म्हणजे लोकप्रिय!

दुष्यंतः—यांच्याच टेलरिंग कॉलेजांत आमच्या अवंतिका फिल्म कंपनीचे कपडे शिवायला जात असल्यामुळें यांची आमची पहिली ओळख! पण टेलरिंग कॉलेजमध्यें राहूनसुद्धां आमच्या प्रो. कांबळ्यांनीं वाङ्मय-सेवा खूप केली आहे!

प्रो. कांबळेः—पुढे योगायोग असा आला कीं मा. दुष्यंताच्या एका चित्रपटावर चोरीचा आरोप आला—आणि त्याचवेळीं आमच्याही एका पुस्तकावर चोरीचा आरोप आला—त्यामुळें आम्हाला एकमेकांबद्दल जरा जास्त जिव्हाळा वाटायला लागला!

दुष्यंतः—पण प्रो. कांबळे, आम्हीं त्या चोरीचें फक्त दिग्दर्शन केलं होतं! आणि मी खरं सांगतो—मराठींतील लेखकांचं जे झालं आहे तेंच आमचं झालं आहे! आतांपर्यंत आम्हांला यश येत गेल्यामुळें—आणि त्याचा बोलबाला झाल्यामुळें आम्ही जे जे करूं—ते तेंच चांगलं आणि पुरोगामी असं आम्हांला वाटूं लागलं आहे! ओरिजनल पौराणिक दुष्यंत ज्याप्रमाणें म्हणतो "कीं ज्या अर्थी माझें मन शकुंतलेवर गेलं आहे—त्या अर्थी ती चांगल्या कुळांतली असलीच पाहिजे!" त्याचप्रमाणें आम्हा सर्व दिग्दर्शक दुष्यंतांनां वाटायला लागलं आहे! आतां मला तर कुठेंही एखादी चांगली कथा—कल्पना कुठें वाचनांत आली—पाहिली—कीं ती कल्पना मीच केल्यासारखी आणि लिहिल्यासारखी वाटते!

शेखरः—मी आतांपर्यंत फक्त आपली दोघांची कीर्ती ऐकून आणि वाचून होतो—पण आपील कीर्तीवर माझा फारसा विश्वास नसल्यामुळें मी सुरवातीला आपल्याबद्दल आदर दाखवूं शकलों नाहीं—याबद्दल दिलगीर आहे! पण समजा, मला तुमचीं मतं किंवा कला आवडली नाहीं तरी 'मानव्यावर' माझं खरं प्रेम असल्यामुळें मी कोणाही माणसाबद्दल अनादर दाखवूं शकत नाहीं!

प्रो. कांबळेः—पण शेखर—आपलीं मतें जरी आम्हांला सनातनी वाटत असली तरी ती प्रामाणिक असल्याबद्दलची आमची खात्री असल्यामुळें—आम्हा दोघानांहि आपल्याबद्दल आदर निर्माण झाला आहे!

दुष्यंतः—आपल्या गोष्टीचं हस्तलिखित मी अवश्य वाचून पहातो—आणि मी आशा करतो कीं मी आपल्या लेखनाला प्रकाश दाखवूं शकेन!

[ इतक्यांत आंत नाचाची पावलें ऐकूं येतात. ] हे काय, ही नाचाची पावलं कुठें ऐकूं येत आहेत?

रेवतीः—सराईत नाचणारणीची वाटतात का?

दुष्यंतः—होय तर--

रेवतीः--खरंच का? मग माझी मुलगी चपलाच आंत नाचते आहे! आपण आज इथं येणार हे कळलं होतं—तेव्हां जमलं तर माझ्या मुलीचं नृत्य आपणाला सहज दिसावं म्हणून मीच व्यवस्था केली--सर्व वेषभूषाही बरोबरच आणली होती.

[ रेवतीकडे सर्वजण आश्चर्यचकित दृष्टीनें पाहूं लागतात तोंच चपला नाचत येते—तें दृष्य पाहून रेवाशंकर डोळे मिटून



[ हारविजेस 'मॅनकॉफर' टॉनिक ]

अनुक्रमणिका

इंग्लिशइंग्लिशचे अरवर पडून रहातो. चपला कांहीं वेळ नाचून थांबते. ]

दुष्यंत:—काय प्रो. कांबळे—आपल्या पिक्चरला चालेल नाहीं ?

प्रो. कांबळे:—पिक्चरचं पुढें पाहूं—पण सध्यां कंपनींत ठेवायला काय हरकत आहे ?

चपला:—तुमची हरकत नसली तरी माझी हरकत आहे. माझं अजून शिक्षण पुरं व्हायचं आहे !

प्रो. कांबळे:—ठीक आहे—पण कंपनीत येत चला कीं मधून मधून (रेवतीस) आपणही.

दुष्यंत:—पणविश्राम—तुझ्या घरीं येऊन तुझं घर भेटलंच नाहीं ! वासंती वहिनी कुठें दिसल्या नाहींत आज ?

विश्राम:—बालमित्रा, विचारूं न येतो प्रश्न विचारलास. माझे घर रिकामे होणार आहे ! माझ्या आयुष्यांत आतां 'रिकामा वेळ' गोंधळ घालणार आहे ! माझी पत्नि कांहीं कारणाकरितां—आज माझं घर सोडून जाणार आहे !

रेवती:—काय म्हणतां काय ?

रे. शंकर:—कां हो रेवतीबाई, मी तुम्हांला विचारतो—आपल्या मुलीचं असं नाचकाम दुसऱ्याच्या घरीं आणि अगांतुकपणानें करून दाखविण्यांत आपल्याला कांहीं शरम वाटली नाहीं का ? मी तुमच्या बाबतींत कांहीं बोलायचं नाहीं असं ठरवलं आहे ! पण माझ्या मुलीच्या बाबतींत—

रेवती:—चपला ही जितकी तुमची मुलगी आहे—तितकीच ती माझीही आहे ! आणि परक्या ठिकाणीं त्रयस्थासमोर माझी 'शरम' काढण्यांत आपल्याला कांहीं लाज—पण मला तसं बोलायचं नाहीं ! स्त्रियांनां आर्थिक स्वातंत्र नसल्यामुळें—तुम्ही असा आमचा अपमान करूं शकतां—पण लक्षांत ठेवा—मी एम. ए. आहे. मनांत असेल तर मी स्वतंत्र रितीनें माझा चरितार्थ चालवूं शकेन ! पण तसं कशाला मी आतांच घरीं परत येत नाहीं !

प्रो. कांबळे:—इतका स्वतंत्रबाणा आज तुम्ही दाखविलांत—स्वातंत्र्यवृत्तीच्या या महाराष्ट्रीय स्त्रीचं मी आज जाहीर अभिनंदन करतो ! वाटल्यास आपण माझ्याही घरीं रहायला येऊं शकतां !

रे. शंकर:—अशा वेळीं अभिनंदन करून एकाद्या स्त्रीचा आपण बुद्धिभेद केला नाहींत तर मग आपण दांभिक पुरोगामी कसले ? ठीक आहे—बाळे चपले, घरीं चल.

चपला:—बाबा, आईला अशी इथे एकटी सोडून मी घरीं येणार नाहीं ! किती केलं तरी ती माझी आई आहे !

रे. शंकर:—चपले, जिला मुलं झालीं ती स्त्री खऱ्या अर्थानें आई होतेच असं नाहीं ! आईचं मोठेपण—ज्या आईकडे लोक गौरवपूर्ण भावनेनें पहातात ! चपले बाळे ' तूं असं वागूं नकोस—तुला पुढें याचा पश्चाताप होईल—माझ्याबरोबर घरीं चल. [ चपला मानेनेच नाहीं म्हणते ] ठीक आहे—चपले—माझे घर जसे माझे घर आहे तसे ते तुम्हा दोघींचेही आहे ! नीतीच्या—किर्तीच्या आणि संस्कृतीच्या माझ्या स्वतःच्या कांहीं कल्पना आहेत—घरधनी या दृष्टीनें मी त्या राखूं इच्छितो ! माझ्या सद्भावना तुमच्या दोघींच्याही पाठीशीं नेहमी राहतील ! आपण विचारांती ठरविलेंत तर माझ्या घरीं—आपण आपल्या घरीं—आज—उद्यां—कालांतरानें केंव्हांही येऊं शकतां !

[ रेवाशंकर कांहींतरी आवेगानें एकदम निघून जातो—वासंती प्रवेश करते. ]

चपला:—( रेवतीस ) आई, मग आज आपण कुठे ग रहायचं ?

वासंती:—रेवतीबाई—वाटल्यास आपण इथेंही राहूं शकतां.

रेवती:—काय बोलतां हे वासंतीबाई ?

वासंती:—रेवतीबाई—

रेवती:—या प्रसंगावरून आपण माझ्यावर कांहीं विचारांचे शरसंधान करणार आहांत काय ? तर मग-मी स्वच्छ सांगते—मी कले करितां संसार सोडायला तयार झालें आहे !

वासंती:—देव तुमचे कल्याण करो ! पण मी आज आपणाला येवढेच सांगते कीं कलाविलास—प्लेटानिक लव्ह—बौद्धिक भूक—प्रियशिष्या म्हणून विचारांची विल्हर खुळं पिकवून समाजांत कांहीं काळ सन्मानानें वावरणारे भोंदु—त्यांचा दंभस्फोट होतांच अखेर शेवटी मुंडावळ्या बांधून समाजाला शरणच गेले आहेत ! पालक म्हणविणारे संभावित अखेर मालकच ठरले आहेत ! रिकाम्या वेळाची करमणूक म्हणून समाजानें कांहीं व्यक्तींचा गुरु बाळसंतोष थोडा वेळ चालूं दिला तरी अखेर शेवटीं त्यांची नस हातीं येतांच ते सुंदोपसुंद अखेर शेवटीं तिरस्काराच्या आणि अवहेलनेच्याच गर्तेंत धूळ खात पडले आहेत !

रेवती:—पण आपल्या बद्दलही मी कांहीं ऐकलं तें खरं का ? नाहींतरी हा मेला समाज वाटेल त्या बद्दल वाटेल ते बोलत असतो—तुम्हीही आज म्हणे हे घर सोडून जाणार आहांत ?

वासंती:—मी हे घर सोडून जाणार आहे —मला या सुखी संसाराचा कंटाळा आला आहे ! आयत्या आणि मिंध्या अन्नाचा वीट आला आहे ! आणि या सुशिक्षित आयुष्याभोंवती चारित्र्यहीन कलावाल्यांचा जो गोंधळ चालला आहे—रेवतीबाई—आपले सरकार जसे 'राजद्रोहाकडे' डोळ्यांत तेल घालून पहाते त्याप्रमाणें सरकार जर 'लोकद्रोहाकडे' डोळ्यांत तेल घालून पाहील तर आजचे बहुतेक कलावाले कलावंत तुरुंगांत खडी फोडतांनां दिसतील ! कलेकरितां कलावाले कंगाल कांहींही बरळोत खरें सुख त्यागांत आहे ! श्रमांत आहे ! मित्रहो नमस्ते ! [ वासंती निघून जाते, विश्रामने वासंतीची भिंतीवर लावलेली तसबीर गळून खालीं पडते—त्याच्या मागच्या स्वातंत्र्यवीर वासुदेव बळवंताच्या तसबीरीकडे सगळ्यांचे लक्ष जाते. ]

---

तोंड मिटून जांभई देणें याला सभ्यता म्हणतात !

( पान १६२ वरून )

टाकतो. वस्त्रांत विणलेल्या जादूच्या शब्दामुळें नागाला गाढ झोप लागते. इतकें झाल्यावर नाग धरणारा त्या सापाचें डोकें कापून घेऊन त्यांतून मणि काढून घेतो. या मण्याच्या अंगीं अनेक अद्भुत गुण असतात असें म्हणतात."

इतके अमोलिक गुण असलेला सर्पमणि आपल्याजवळ असावा असें प्रत्येकाला वाटल्यास त्यांत आश्चर्य कसलें ? अर्थातच सर्पमण्यांना मागणी वाढली व मागणीच्या पाठोपाठ पुरवठ्याचाहि प्रश्न आलाच. भोळ्या लोकांच्या अंधश्रद्धेचा फायदा घेणारे शहाणे लोकहि जगांत असतातच. पौर्वात्य आणि पाश्चात्य देशांतून हळूहळू सर्पमण्यांचा व्यापार सुरू झाला. हा व्यापार साधारणपणें ख्रिस्ती शकाच्या पहिल्या शतकापासून सुरूं झालेला होता याबद्दल दाखले आढळतात. पण हिंदुस्थानांत फार प्राचीन काळापासून तो सुरू असला पाहिजे यांत शंका नाहीं. आशिया मायनरच्या जवळ भूमध्य समुद्रांत असलेल्या सायप्रस व त्याच्या जवळच्या दुसऱ्या लहान बेटांत रहाणाऱ्या ज्यू लोकांनीं सर्पमणि तयार करून पाश्चात्य व मध्यपूर्वेतील देशांना विकून मुबलक संपत्ति मिळविली. लोक हे मणी कोंदणांत बनवून ताइताप्रमाणें गळ्यांत किंवा दंडावर बांधीत असत. हिंदुस्थानांतून सर्पमणी आफ्रिकेंत विक्रीकरितां पाठविले जात व तेथें बोअर लोक वाटेल ती किंमत देऊन ते विकत घेत.

सर्पमणी निरनिराळ्या प्रकारचे व आकाराचे आढळतात. कांहीं अर्धवट जळलेल्या हाडांच्या तुकड्यांसारखे दिसणारे पण पॉलिश केलेले असतात; कांहीं खडूच्या तुकड्याप्रमाणें दिसणारें असून त्यांच्या सछिद्रतेमुळें द्रव पदार्थ शोषून घेणारे असावेसे वाटतात; कांहीं अतिशय चकाकणारे काळ्यारंगाचे पावट्या एवढे असतात तर कांहीं फिक्कट पिंवळ्या रंगाचे व अर्धवट पारदर्शक असतात.

सर्पदंशाच्या जखमेवर सर्पमणि दाबून चिकटवला तर तो सगळें विष शोषून घेऊन आपोआप गळून पडतो व दंश झालेला मनुष्य बरा होतो असें म्हणतात. सर इमर्सन टेनंट यानें सिलोनबद्दल लिहिलेल्या आपल्या पुस्तकांत प्रत्यक्ष पाहिलेल्या दोन प्रसंगांची नोंद केलेली आहे. नाग धरण्याचा प्रयत्न करीत असतां एका तामीळ मजुराला तो चावला. त्याच्या मित्रानें आपल्या कंबरेला खोचलेले दोन सर्पमणि काढून जखमेवर बसविले. तीन चार मिनिटांनीं हे दोन्ही मणी गळून पडले व तो मजूर बरा होऊन आपल्या घरीं गेला. हे मणी बदामा एवढे व काळ्या रंगाचे होते. दुसरें उदाहरणहि नाग चावलेला मनुष्य अशाच तऱ्हेनें बरा झाल्याबद्दलचें आहे.

सर्पमणि हा मनुष्याच्या कल्पनाशक्तीनें निर्माण केलेला आहे असें म्हणावयास कांहींच हरकत नाहीं. लेखकानें स्वतः सात आठ नागांच्या डोक्याचें अत्यंत काळजीपूर्वक विच्छेदन केलेलें आहे. पण एकाहि नागाच्या डोक्यांत त्याला कोणत्याहि प्रकारचा मणि आढळून आला नाहीं. विषबाधा नाहींशी करण्याकरितां सर्पमणि म्हणून जी वस्तु वापरतात तिच्या अंगीं विष शोषून घेण्याचा गुण कितपत आहे याबद्दलहि शंका घेण्यास बरीच जागा आहे. सर्पदंशाबरोबर मनुष्याच्या अंगांत शिरणाऱ्या विषाचें प्रमाण, त्याचें तावडतोब रक्तांत मिसळणें व सर्पमण्याचा आकार या गोष्टी जर विचारांत घेतल्या तर आपल्याला असें दिसून येईल कीं सर्पाच्या अंगीं जरी द्रवपदार्थ शोषून घेण्याची शक्ति असली तरी रक्तांत मिसळलेलें सर्व विष शोषलें जाणें शक्य नाहीं. अनेक शास्त्रज्ञांनीं अत्यंत काटेकोरपणानें प्रयोग करून सर्पमण्याचें या दृष्टीनें परीक्षण केलेलें आहे. या प्रत्येक प्रयोगांत सर्पमण्याच्या अंगीं असा गुण नसल्याचें सिद्ध झालेलें आहे. सर्पमण्याच्या अंगीं चिकटवलेले इतर गुण मनुष्याच्या कल्पनाशक्तीनें निर्माण केलेले आहेत एवढें सांगितलें म्हणजे पुरे.

( पान १०९ वरून )

पुढचा शॉट काय सांगायचा ?—हार्डीचा कोजप घ्यायचा कीं लॉरेलचा घ्यायचा ?—की बीरबल बादशाहाचा ?—कीं गलीव्हर किझोटचा ? कीं चार्ली-मांचूसेनचा ?

जमलेल्या लोकांना छान उलगडा पडेल असें तुक्या बोलला. तें त्यांना पटलेंच पण व्यवहार पंडितांच्या तांड्यालाहि पटलें !

लोकांनीं त्यांच्यावर उधळलेलीं वाक्पुष्पें स्वीकारीत त्यांनी तुक्याची समजूत केली आणि त्यास खाऊ करतां म्हणून आणखी पांच रुपये दिले. त्यानें उपकाराचा बोजा व्यवहारपंडितांच्या डोक्यावर चढवीत चढवीत बैलाकडे मोर्चा वळविला !—महादेवाचें दर्शन करतांना, त्या आधीं नंदीची खुशामत करण्याची प्रथा सर्वांच्या परिचयाची आहेच. तुक्यानें डिट्टो तसे केलें !–त्याचा बैल नव्या उत्साहानें तात्काळ उठला !

आतां झपाट्यानें अंधार पडूं लागला होता. त्यांत तुक्या छकड्यासह लुप्त झाला !—व्यवहारपंडितांना तिकडे पाहात पहाटेच्या गाडीची वाट पाहात बसण्यापेक्षां दुसरा कोणताच मार्ग नव्हता !

( सर्व हक्क लेखकाकडे )



अनुक्रमणिका

# अप्-टु-डेट

कपड्यांचा षोक पुरविण्यासाठीं आपले
कपडे नेहमीं आमचे कडून
शिवून घ्या—

★ उत्कृष्ट शिलाई—
★ मनपसंत काम—
★ उत्कृष्ट कोटिंग, सूटिंग, शर्टिंग—

आजच येऊन
आपली ऑर्डर
नोंदवा—






**बाबूभाई जगजीवनदास**
हरकिसनदास हॉस्पिटल समोर, न्यू चर्नीरोड मुंबई

# कसोटीस उतरून लोकादरास पात्र झालेला "ईस्टर्न"

चा माल वापरण्यांत प्रत्येकजण
अभिमान मानतो—



तुम्हांस आवडतील असे शूज,
निरनिराळ्या तऱ्हा,
सुबक आणि टिकाऊ—



तसेंच सर्व
तऱ्हेचे लेदर
गुड्स—

होल्डॉल्स–सूट केसीस—
यांची खरेदी आमचेकडे करा !



## ईस्टर्न लेदर वर्क्स

कॉर्नर ऑफ सँढर्स्ट रोड, आणि
गिरगांव बॅक रोड, मुंबई नं. ४

रा. प्र. कानिटकर
एम्. ए.




आज दुसरें जागतिक महायुद्ध समाप्त झालें आहे व त्यामुळें जगावर आलेलें भयंकर अरिष्ट टळलें आहे, ही गोष्ट सुटकेचा निःश्वास टाकण्याइतकी समाधानकारक असली तरी तिचे परिणाम किती दूरवर पोंचले असतील यांची सध्यां कल्पनाही करतां येणार नाहीं. महायुद्धामुळें जशीं जागतिक मूल्यें बदललीं आहेत त्याप्रमाणें जनतेच्या विचारसृष्टींतही क्रांति घडून आली आहे. युद्ध व साहित्य यांचा निकटचा संबंध आहे. संग्राम कालांतच खऱ्या कलेची किंवा उच्च साहित्याची निर्मिती होते, इतकेंच नव्हे तर क्रांतिकारक विचारांचे तेजस्वी स्फुल्लिंग युद्धकाळांतच प्रज्वलित होतात, असे सर्वमान्य सिद्धांत आहेत. या दृष्टीनें प्रस्तुत महायुद्धामुळें जगाच्या आर्थिक, नैतिक किंवा राजकीय क्षेत्रांत कितीही स्थित्यंतरें घडून आलीं असलीं तरी त्याचे जे वैचारिक परिणाम झाले ते जास्त महत्वाचे आणि शाश्वत स्वरुपाचे होत. तसेंच युद्धविरोध, जागतिक शांतता, मानवसंहाराचे आधुनिक शोध, हुकुमशाही विरुद्ध लोकशाही, इत्यादि बाबतींत जगाच्या विचारांत युद्धानें कोणती क्रांति केली याचाही शोध घेतला पाहिजे. युद्धकालीन साहित्याचा परामर्श घेतांना ही भूमिका विसरून चालणार नाहीं. महायुद्धाच्या शेवटच्या वर्षांतील मराठी साहित्याचा व एकंदर वाङ्मयीन विचारप्रवाहांचा धांवता आढावा घेण्याचें प्रस्तुत लेखांत जें योजिलें तें याच दृष्टिकोणानें होय. ‘लेखण्या मोडा व बंदुका घ्या’ या राणाभीमदेवी आदेशाचाही युद्धकालीन साहित्यावर काय परिणाम झाला आहे हें पहाणेंही मनोरंजक होईल.

प्रस्तुत लेखांत गेल्या शारदीय वर्षांतील मराठी साहित्याचें समालोचन करण्याचें योजिलें आहे. गेल्या दिवाळीपासून चालू दिवाळीपर्यंत जें वर्ष झालें त्याला “शारदीय वर्ष’ अशी यथार्थ संज्ञा देण्यास हरकत नाहीं. राज्यकारभाराचें जसें ‘आर्थिक वर्ष’ किंवा वाणिज्य-व्यवसायिकांचें ‘व्यापारी वर्ष’ त्याप्रमाणें साहित्यकांचें कालमापन ‘शारदीय वर्ष’ या नात्यानें होणें विशेष समुचित ठरेल. साहित्याचा वर्षारंभ चैत्रांत किंवा वसंतांत होत नसून वर्षाऋतूनंतर येणाऱ्या शरद् ऋतूंत होतो. म्हणूनच शारदा ही साहित्याची अधिष्ठात्री देवता मानली आहे.

या शारदीय वर्षांत प्रसिद्ध झालेल्या मराठी वाङ्मयाचा जसा परामर्श घेतला जाणार आहे त्याप्रमाणें या काळांत गाजलेलीं सभासंमेलनें व वादसंवाद, यांचाही यथावकाश समाचार घेण्याचा मानस आहे. हा धांवता आढावा वाचकवर्गास उपयुक्त होईल अशी आशा आहे. यांत प्रत्येक पुस्तकाचा निर्देश केला जाईलच असें नाहीं. पण गाजलेलें साहित्य शक्यतों अधिक प्रमाणांत विचारांत घेतले जाईल एवढी ग्वाही देण्यास हरकत नाहीं.

या कालखंडांतील मराठी साहित्याचा स्थूलमानानें विचार केला तर पहिल्यादर्जाच्या, प्रथितयशी साहित्यकांचें स्वतंत्र असें एकही पुस्तक प्रसिद्ध झालेलें नाहीं असें दिसून येईल. त्यांचीं जीं पुस्तकें प्रकाशित झालीं तीं भाषांतरित किंवा पुनर्मुद्रित तरी होतीं अगर पूर्वप्रकाशित साहित्याचें संकलन अशा स्वरूपाची तरी होतीं. ज्यांच्या लघुकथा किंवा लेख संग्रहरूपानें प्रसिद्ध झाले त्यांत या संग्रहासाठीं मुद्दाम लिहिलेल्या प्रस्तावनांखेरीज स्वतंत्र किंवा नवें असें कांहीं लिहिण्यांत आलेलें दिसत नाहीं. या काळांत संकलनात्मक वाङ्मयाला तेजी आली होती, याचें सर्वांत मोठें प्रसंतर म्हणजे ‘मराठी वाङ्मय सूची’ (दाते) हा ग्रंथ होय. कांहीं लेखकांनीं आपलें साहित्य अगदीं नवें गरमागरम आहे, असें वाचकांना भासविण्यासाठीं (किंवा अन्य प्रमाणिक हेतूनें असेल) आपल्या पुस्तकांचें नवें नामकरण केलेलें आढळतें. त्याप्रमाणें कांहीं भाषांतरजीवी कादंबरीकारांनीं आपलें साहित्य आपल्या स्वतःच्याच स्वयंभू प्रतिभेचें फळ आहे असें दर्शविण्यासाठीं मूळ ग्रंथकर्त्यांचा उल्लेख करण्याचें मोठ्या सफाईनें टाळलें होतें. आणि

त्याच्याच उलट कांहीं भाषांतरकर्त्यांनीं राजरोस परकीय भाषेतील कादंबऱ्यांना मराठी पेहराव चढवितांना आपण स्वतंत्र लेखकापेक्षां मराठी भाषेची अधिक सेवा करीत आहों असा अट्टाहास बाळगण्याचें व्रत सुरू केलेलें दिसत होतें. याशिवाय युद्ध-कालीन महागाई व मुद्रणावरील निर्बन्ध यामुळें तिसऱ्या प्रतीच्या लेखकांचा भाव वाढण्यास मदत झाली होती. व आपण आतां साहित्य-सम्राटापेक्षांही मोठ्या दर्जाचे लेखक झालों असा अहंभाव या महायुद्धानें त्यांच्या मनांत उत्पन्न केला होता. अर्थात् याला कारण त्यांच्या लेखनाचा दर्जा वाढला असें नव्हे तर महागाईमुळें पुस्तकांच्या किंमतींत भरमसाट वाढ झाली हें होय. प्रकाशकांनीं आपल्या प्रकाशनांच्या किंमती ज्या अमर्याद वाढविल्या त्यांत त्यांचा हेतु केवळ नफेबाजीचाच होता असा आरोप करणें अन्यायाचें होईल. आपण ज्या ग्रंथकारांचीं पुस्तकें प्रसिद्ध करीत आहों त्या ग्रंथकारांना मराठी साहित्याच्या क्षेत्रांत श्रेष्ठ दर्जा लाभावा कमी किंमतीमुळें त्यांची किंमत कमी होऊं नये, याच प्रामाणिक हेतूनें प्रकाशकांनीं पुस्तकांच्या किंमती भरमसाट वाढविल्या असल्या पाहिजेत.

मराठी वाङ्मयांत यापूर्वीं कधीं आली नसेल एवढी प्रचंड लाट बालवाङ्मयाच्या क्षेत्रांत यंदा आली. महागाईमुळें किंवा अन्य कारणां-मुळें मोठ्यांच्या पुस्तकांना मंदी आल्यामुळें कीं काय, मुलांमुलींसाठीं इतकीं पुस्तकें निघाली कीं मराठींत बालवाङ्मय कमी आहे असें म्हणण्याची आतां कोणाची छाती होणार नाहीं. लहानमोठ्या लेखकांनीं इतकें विविध-प्रकारचें मध्यम व निकृष्ट बालवाङ्मय निर्माण केलें आहे कीं तें पाहिलें असतां छातीच दडपून जाईल. साने गुरुजी, ना. धों. ताम्हनकर, चोरघडे, सौ. मालतीबाई दांडेकर, ना. ह. आपटे, इत्यादि कांहीं लेखकांचींच पुस्तकें नांव घेण्यासारखी आहेत. मुंबईचे ढवळे, कर्नाटक इत्यादि प्रसिद्ध प्रकाशकां-प्रमाणें पुण्याच्या अनाथविद्यार्थीगृहानें विद्या-र्थ्यांना थोडक्यांत सामान्य ज्ञान देण्यासाठीं 'स्वाध्याय माला' सुरू केली आहे.

'गांधीसाहित्य' व 'कॉंग्रेस प्रकाशन' या दोन प्रमुख पुस्तकमाला या वर्षीं सुरू झाल्या व बहुजन वाचकांना महात्मा गांधी व कॉंग्रेस यांची विचारसरणी सुगम रीतीनें कळविण्याची मोठी सोय झाली. गांधी-साहित्य मालेंत आतांपर्यंत अखंड भारत, अहिंसा दर्शन, गांधीजीच कां, गांधीवादावरील आक्षेप व त्यांचीं उत्तरें इत्यादि पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत. कॉंग्रेस प्रकाशनाची भूमिका थोडी निराळी आहे. राष्ट्रीय सभेनें सुरू केलेल्या सर्व प्रकारच्या विधायक व राजकीय कार्य-क्रमाची थोडक्यांत व सुसंगत माहिती देण्या-साठीं ही माला निघाली आहे. तिच्यातर्फे महायुद्ध आणि राष्ट्रसभा (जावडेकर) हिंदी संस्थानांचा प्रश्न (लड्डे), अस्पृश्यतानिवारण (आप्पासाहेब पटवर्धन), हिंदी स्त्रियांचें जीवन, खादी इत्यादि पुस्तकें प्रकाशित झालीं आहेत. गांधी-जीना पत्रव्यवहार व 'गांधीजींच्या सहवासांत एक आठवडा हीं दोन' अनुवादित पुस्तकें ही या राष्ट्रीय वाङ्मयांत सहज समा-विष्ट होण्यासारखीं आहेत. कॉंग्रेसला प्रति-स्पर्धी म्हणून नव्हे तर हिंदु सभेचा दृष्टिकोण स्वतंत्रपणें मांडण्यासाठीं अजून एकही माला सुरू झालेली नसली तरी हिंदूंचा विश्वविजयी इतिहास (डॉ. सावरकर) व 'अखंड भारतच कां' या दोन पुस्तकांचा निर्देश करण्यासारखा आहे. याशिवाय इतर राजकीय वाङ्मयांत कायदेमंडळांतील पांच वर्षें (न. वि. गाडगीळ,) सभाशास्त्र, दुसरी आघाडी, आपलें आर्थिक नियोजन (ह. रा. महाजनी) या पुस्तकांचा समावेश केला पाहिजे. गाडगीळ हे राजकीय पुढारी असूनही उत्कृष्ट ललित साहित्यिक असूं शकतात, हें कायदेमंडळावरील पुस्तकानें निर्विवाद रीतीनें सिद्ध होते. अ. ज. करंदीकर यांनीं आपल्या 'अग्रणी' दैनिकांतल्याच लेखांचा संग्रह करून 'दुसरी आघाडी' उघडली आहे. हेच करंदीकर एके काळीं केसरी कचेरींतले परराष्ट्रीय राजकारणाचे तज्ज्ञ समजले जात असें म्हणतात. पण करंदीकरांनीं लिहिलेल्या लेखांवरून व त्यांनीं केलेल्या भाकितांवरून त्यांना अतज्ज्ञ म्हण-ण्याचा एखाद्याला मोह होणें साहाजिक आहे.

ललित वाङ्मयाच्या दालनांत आघाडीचे वीर बहुशः अभावानेंच चमकले आहेत. प्रो. फडक्यांच्या अखेरचें बंड व बस नं. १२ या

कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या आहेत. 'अखेरच्या बंडांत' बालगंधर्वांचेंच चरित्र जवळजवळ कादंबरीरुपानें रेखाटलें असल्यामुळें हें पुस्तक वाचतांना चरित्र व कादंबरी होन्ही एकाच वेळीं वाचण्याचा लाभ होईल. ना. ह. आपटे यांनीं लिहिलेली साजणी कादंबरी त्यांच्या 'सुगरिणीचा संसार' व 'गृहसौख्य' या सांच्यांत बसणारी असली तरी तिची रचना विशेष कलापूर्ण आहे. वोकीलांनीं १४ एप्रिल ही घटनाप्रधान कादंबरी लिहून आपण चित्रपटकथेला साजेलशी कादंबरी लिहूं शकतो हें सिद्ध केलें आहे. साखरगोटी (रामतनय) व जंगलांतील छाया (मिसे) या ग्रामीण व प्रादेशिक जीवनांचीं चित्रें रेखाटणाऱ्या कादंबऱ्या आहेत तर हडप, माडखोलकर व शं. बा. शास्त्री यांनीं ८ ऑगस्टच्या चळवळीवर आधारलेल्या कादंबऱ्या लिहिल्या आहेत. यांपैकीं प्रमद्वरा व अमावास्या या जप्त झाल्या असल्यामुळें त्यांतील चित्रणाची वाचकांना निराळी कल्पना देण्याचें कारण नाहीं. नवा नमुना (नेरूरकर), मीलन (कंटक), तोंडमिळवणी (वरेरकर), दोन घडींचा डाव (लीला देशमुख), उत्पात (वी. रघुनाथ), नाकेबंदी (विद्वांस), गनिमी कावा (नाडकर्णी) या उल्लेखनीय कादंबऱ्यांपैकीं शेवटच्या पुस्तकानें मराठी विनोदी वाङ्मयांत लक्षणीय भर घातली आहे.

कादंबरी किंवा लघुकथा या सदरांत यंदाच्या वर्षीं खांडेकर माडखोलकर प्रभृतींचीं नांवें चमकत नाहींत. खांडेकरांच्या बऱ्याचशा पुस्तकांना या वर्षीं पुनर्मुद्रणाचा बहर आला असें म्हटल्यास चालेल. घरब्याबाहेर, हिरवा-चांफा, दोन ध्रुव, सूर्यकमळें, फुलें आणि दगड, स्त्री आणि पुरुष इत्यादि कितीतरी पुस्तकांची दुसरी आवृत्ति निघाली आहे. त्यांचें 'सुवर्णकण' हें रूपक कथांचें एकच पुस्तक त्यांच्याखातीं जमा झालें आहे. खांडेकरांच्या खालोखाल पुनर्मुद्रणाचा मान ना. ह. आपटे व साने गुरूजी यांनीं मिळविला आहे. गृहसौख्य, सुगरिणीचा संसार' सुखाचा मूलमंत्र, न पटणारी गोष्ट, संसारांत पडण्यापूर्वी, ऐरणीवर या पुस्तकांपैकीं कांहींची दुसरी आवृत्ति आहे तर गृहसौख्याची आठवी आहे.—'संसार' व 'मूलमंत्र' यांना सहाव्या संस्करणाचा लाभ झालेला आहे. 'आम्ही आहों माणसें' ही जुनीच लेखमाला टाकटीक करून पुस्तकरूपानें वाचकांना त्यांनीं सादर केली आहे. त्यांत मानसशास्त्रीय दृष्टीनें मनुष्यस्वभावाचें मार्मिक पृथक्करण केलें आहे. साने गुरूजींच्या अनेक पुस्तकांपैकीं तीन मुलें, भारतीय संस्कृति, सोन्या मारुति इत्यादि पुस्तकें दुसऱ्यांदा प्रकाशित होत आहेत.

या शारदीय वर्षांत विशेष लक्षणीय असे कथासंग्रह फार थोडे आहेत. पण त्यांत प्रचलित युद्धकालीन किंवा जागतिक परिस्थितीचें प्रतिबिंब पडलेले क्वचित्च आढळतें. बहुतेक कथाकादंबऱ्या सनातन मनुष्यस्वभावांतील शाश्वत भावनाविकारांवर आधारलेल्या आहेत. त्यांत नजरबंदी (वांदेकर) सारखें

एकादेंच पुस्तक असें आढळेल कीं जें प्रचलित, दररोजच्या विषयांनीं आकंठ भरलेलें आहे. प्रस्थान ( चोरघडे ) महाश्वेता ( र. गो. सरदेसाई ), कृष्णकमळीची वेल ( पाध्ये ), सुगंध ( ठोकळ ) धोतऱ्याचे कळे ( ओक ) व आमचे हे ( ताम्हनकर ) या कथासंग्रहांचा प्रातिनिधिक म्हणून नामनिर्देश करणें सुयोग्य होईल. याच सदरांत अनंत काळचे प्रवासी ( अ. ह. जोशी ) या अभिनव धर्तीच्या पुस्तकाचा समावेष केला पाहिजे.

खरें काव्य अलीकडे दुर्मिळच आहे आणि राजकवि यशवंतासारखे सुप्रतिष्ठित कवि आपला प्रांत सोडून लघुनिबंधाकडे वळल्यामुळें काव्य-देवतेच्या मंदिरांत जवळ जवळ अंधारच आहे. नाहीं म्हणावयाला मधुपर्क ( लाड ) व उज्ज्वला ( निकुंब ) या दोन ज्योती त्यांत तेवत आहेत.

गेल्या वर्षी कै. आगरकर व कै. वा. म. जोशी यांच्या पुण्यतिथींच्या निमित्तानें आगरकरांची ओळख ( गोखले ) व वामन मल्हार वाङ्मय दर्शन ( वा. ल. कुळकर्णी ) हीं दोन अभ्यासपूर्ण पुस्तकें बाहेर पडलीं. आगरकरांचीं दोन तीन चरित्रें यापूर्वी प्रसिद्ध झालीं असलीं तरी आगरकरांचे व्यक्तित्व या पुस्तकांत अधिक चांगल्या रीतीनें रंगविलें आहे. प्रो. वा. ल. कुळकर्णी यांचा टीकाप्रबंध बऱ्याच अंशीं चिकित्सक स्वरूपाचा आहे. तथापि प्रो. वा. म. जोशी यांच्याबद्दल त्यांनीं जीं अतिशयोक्तिपूर्ण भक्तिभावाचीं विधानें केलीं आहेत त्यामुळें त्याला थोडें गौणत्व आलें आहे, हें वामनरावांच्या भक्तांना सुद्धां मान्य करावें लागेल. गेलीं दोन वर्षे वादांत पडलेलें शि. ल. करंदीकर यांचें सावरकर चरित्र यंदा मुंबई विद्यापीठानें बक्षीसाहि ठरविलें व त्याला तर्खडे पारितोषिक बहाल केलें. दक्षिण महाराष्ट्र साहित्य संमेलनानेंही या पुस्तकाचा योग्य गौरव करून त्याला पहिलें बक्षीस दिलें. चरित्रवाङ्मयांत या पुस्तकानें महत्वाचें काम संपादन केलें आहे, यांत शंका नाहीं. दुर्वा आणि फुलें ( प्र. के. अत्रे ) यांतील स्वभावचित्रें प्रत्यक्ष व्यक्ति डोळ्यांसमोर उभी करतात. त्यांत क्वचित् अतिरंजन असलें तरी कला व लालित्य यांचा त्यांत मधुर संगम झालेला आढळतो.

टीका-प्रबंध-साहित्य या सदरांत काका कालेलकर, विनोबा, भावे, आचार्य भागवत व क्षीरसागर यांनीं महत्वाची भर घातलेली दिसून येईल. कालेलकरांच्या गुजराती लेखांचे अनुवाद पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाले आहेत. त्यांत काकांचे विचार असले तरी त्यांची शैली नसल्यामुळें कालेलकरांच्या अस्सल वाङ्मयांत त्यांची गणना करतां येणार नाहीं. असल्या छायात्मक साहित्यामुळें मराठी वाङ्मयांत नवीन पुस्तकांची भर पडत असली तरी त्याचा दर्जा वाढत नाहीं. भक्तिकुसुमें हें काकांचें प्रवासवर्णनात्मक पुस्तक अस्सल स्वरूपाचें असल्यामुळें वाचतांना कसें उच्च वातावरणांत विहार केल्यासारखें वाटतें. विनोबा भावे किंवा आचार्य भागवत यांचीं पुस्तकें वाचतांना तोच सुखद अनुभव येतो. आपण कुठल्यातरी अत्यंत पवित्र, शुद्ध अशा अतिमानुष सृष्टींत तरंगत आहों, या क्षुद्र संसारी जीवनापासून सर्वस्वीं अलिप्त अशा अध्यात्म लोकांत आपण वावरत आहों असें वाटूं लागतें. विनोबा भावे हे एक प्रकारें जीवनमुक्त असल्यासारखे असल्यामुळें त्यांनीं केलेल्या साहित्याच्या व्याख्या सर्वसाधारण सुशिक्षितांस सुद्धां पटणार नाहींत. तीच गोष्ट भागवतांची. ते अध्यात्मिक जीवनवादी व श्रद्धामय विचारवंत असल्यामुळें त्यांचीं साहित्याचीं मूल्यें कलावादी साहित्यिकांना कधींही मान्य होणारीं नाहींत. जीवन आणि साहित्य व चौफुला या त्यांच्या दोन पुस्तकांत त्यांचें तत्त्वज्ञान ग्रथित झालेलें आढळून येईल. साहित्याचा ध्रुवतारा ( रा. शं. वाळिंबे ) व मराठी साहित्य ( १९१४ ते १९४४ ) या साहित्यविषयक पुस्तकांपैकीं पहिल्यांत साहित्याचें कार्य, ध्येय व प्रणाली ग्रथित करण्यांत आली असून दुसऱ्यांत गेल्या तीस वर्षांतील साहित्याचें विभागशः समालोचन करण्यांत आलें आहे. सुवर्णतुलेंत ( प्रो. क्षीरसागर ) कांहीं व्यक्तिचित्रें असलीं तरी त्याचें स्वरुप साहित्यविषयक आहे महात्माजींसंबंधीं क्षीरसागरांनीं जें लिहिलें



आहे त्यांत त्यांची मार्मिक अभ्यासशीलता तर व्यक्त होतेंच, शिवाय त्यावरून त्यांची उच्च अभिरुचि दिसून येते.

भाषांतरित वाङ्मयाच्या बाबतींत मुंबईच्या लोकप्रकाशन संस्थेनें चालविलेलें कार्य जसें नमुनेदार आहे तसें अनुकरणीय ही आहे. श्रावणांतील खेडें, व्होल्गा ते गंगा, हिंवाळ्यांतील इंद्रधनुष्य या कादंबऱ्यांमुळें मराठीची साहित्यसंपदा निःसंशय समृद्ध झाली आहे. गेल्या वर्षी 'आई' या नांवाच्या दोन अनुवादित कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या. एक पर्ल बकच्या कादंबरीचे भाषांतर असून दुसरें गॉर्कीचें आहे. या दोहोंत तुलना करावयाची म्हटल्यास सातोस्करांची 'आई' मराठी वाचकांस अधिक जवळची वाटेल. 'छायानट' व 'धर्मयुद्ध' हे गुजरातीचे अनुवाद आणि द्राक्षांच्या देशांत हें पोर्तुगीजचे भाषांतर उल्लेखनीय आहे.

याशिवाय आणखी किती तरी विविध विषयांवर लहानमोठीं पुस्तकें लिहिलेलीं आढळतील. त्यांचा निर्देश कोठवर करावा? तथापि त्यांतल्या त्यांत महत्वाचीं पुस्तकें म्हणून सुधारणा, सुख, सदाचार ( न. चिं. केळकर ), स्वप्नसाक्षात्कार ( दुर्गाबाई जोशी ), आई, बाप व मुलें ( भागवत ), हिंदु कायद्यांत स्त्रियांचें स्थान ( गजेंद्रगडकर ), नाशीकचीं द्राक्षें ( डॉ. अष्टपुत्रे ), संपत्तीयोग ( अवचट ), मराठी नाट्यसृष्टि ( दांडेकर ), सेवाधर्म ( पटवर्धन ) इत्यादिकांचा नामोल्लेख करावयास हरकत नाहीं.

गेल्या वर्षांतल्याच नव्हे तर महायुद्ध सुरू झाल्यापासूनच्या मराठी पुस्तकांचें सूक्ष्मपणें सिंहावलोकन केल्यास एक गोष्ट ठळकपणें नजरेंत भरल्याशिवाय रहाणार नाहीं. चालू महायुद्ध, बंगालचा दुष्काळ, ८ ऑगस्टची चळवळ, फ्रान्सचें पतन, स्टॅलिनग्राडचा वेढा, हिटलरशाहीचा अस्त, मार्शल टिटोचें गनिमी सैन्य, बॉम्बहल्ल्यांत सांपडलेली जनता यासारख्या घटनांचा उपयोग कोणत्याही मराठी कथाकादंबरींत केलेला आढळत नाहीं. मराठी लेखक कूपमंडूक वृत्तीचे व प्रत्यक्ष

जीवनापासून अलिप्त असल्यामुळें त्यांच्या लेखनांत विशाल, व्यापक जागतिक दृष्टीचा बहुतेक अभावच असतो. जर्मनींतील ज्यूंच्या प्रश्नावर आधारलेली 'रणांगण' सारखी एखा-दीच कादंबरी अपवाद ठरूं शकेल. जागतिक विचारप्रवाहांचे धक्के हिंदी राष्ट्राला आतां जोरजोरानें बसूं लागले आहेत व सबंध जग युद्धपरिणामामुळें हादरत आहे. अशावेळीं मराठी ललित लेखक पूर्वीप्रमाणेंच दीर्घ सुषु-प्तावस्थेंत पडून रहाणार कीं काय? त्यांना जागृति कधीं येणार?

× × ×

या कालांत एक मध्यवर्ती साहित्यसंमेलन व दोन प्रांतिक संमेलनें झालीं. यांपैकीं धुळ्याचें २९ वें महाराष्ट्र साहित्यसंमेलन इतकें गाजलें कीं संमेलनापूर्वीं एक महिना आणि संमेलन उलटल्यानंतर दोन महिने त्याचें कवित्व चालूं राहिलें. आणि याचें श्रेय दोघां माजी साहित्यसंमेलनाध्यक्षांना व त्यांच्या मुखपत्रांना द्यावें लागेल.

धुळें संमेलनांतील नवयुग-प्रकरण वजा केल्यास बाकीचें अधिवेशनही नेहमींच्या गांभीर्याला व प्रतिष्ठेला साजेसें झालें असें म्हणतां येणार नाहीं. मामा वरेरकर यांचें अध्यक्ष होण्याचे बरेंच वर्षांचे मनोरथ या संमेलनांत सिद्धीस गेले, तथापि संमेलन प्रसंगीं किंवा तदनंतर मामानीं कांहीं भरीव कामगिरी केल्याचा दाखला नाहीं. मामांचें अध्यक्षीय भाषण त्यांच्या विशिष्ट विचार-प्रणालीला व वृत्तीला शोभण्यासारखें असलें तरी संमेलनाच्या इतमामाला तें साजेसें झालें नाहीं याबद्दल मात्र सर्वांचें मतैक्य झालें असेल. मामानीं आपल्या भाषणांत कामकरी साहित्यिकांबद्दल जो जिव्हाळा व्यक्त केला त्यावरून साहित्योपजीवी लेखकांबद्दल वरेर-करांना केवढी पोटतिडीक आहे याचा प्रत्यय आला. साहित्य हें विशिष्ट वर्गापुरतें मर्यादित असतां कामा नये, तें खरोखर उपयुक्त व प्रभावशाली व्हावयाचें असेल तर तें लोका-भिमुख झालें पाहिजे, असें वरेरकरांनीं आपल्या भाषणांत सांगितलें. सामुदायिक जीवनाच्या प्रचंड शक्तीला त्यांनीं आवाहन केलें असून बहुजनांच्या प्रचारकी वाङ्मयाचा त्यांनीं जोरदारपणें पुरस्कार केला. तथापि वाङ्मयीन दृष्ट्या हें भाषण सामान्य प्रतीचेंच ठरेल. या संमेलनांत संमेलन व परिषद यांची एकात्मता घडवून आणण्याचा ठराव मंजूर झाला, पण स्वतःला परिषदेचे रक्षक म्हणविणाऱ्या मिरासदारांनीं कंपूशाही करून तो ठराव खुंटीला टांगून ठेवण्याचें पुण्य संपादन केलें. मिरासदारांच्या या कारवायांमुळें मामांनीं सभासद वाढविण्याचें केलेलें कार्य निष्फळ ठरत आहे, याची जाणीव परिषदेच्या बहुसंख्य सभासदांना कोणीतरी करून द्याव-यास पाहिजे. मामा वरेरकरांनीं परिषदेच्या प्रचाराचें कार्य मोठ्या धडाडीनें चालविलें त्याबद्दल त्यांचें अभिनंदन करावयास हवें.

मुंबई उपनगर साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनीं आपल्या





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

भाषणांत साहित्य आणि विचारसंग्राम यांचा परस्परावलंबी संबंध दाखविला असून सामाजिक संक्रमणाच्या किंवा राजकीय संघर्षांच्या काळांतच उच्च वाङ्मय किंवा श्रेष्ठ कला निर्माण होऊं शकतें असा सिद्धांत प्रतिपादन केला. औरंगाबाद येथें जे निजामप्रांतीय साहित्यसंमेलन भरलें त्याला प्रारंभी कित्येक महिने परवानगीच मिळत नव्हती. यावरून मराठवाड्यांत मराठीची कशी गळेचेपी चालली आहे, मराठीच्या आदिपीठांत मराठीला किती हीनदीन स्थितीला पोंचविलीं जात आहे याचें प्रत्यंतर येतें. संमेलनाध्यक्ष ग. त्र्यं. माडखोलकर यांनीं आपल्या अध्यक्षीय वक्तव्यांत मराठवाड्यांतील मराठीचीं दुःखें विस्तारशः वर्णन करून भाषावार प्रांतरचना झाल्याशिवाय परकी भाषेची कुरघोडी थांबवितां येणार नाहीं हें निःसंदिग्धपणें कथन केलें.

गेल्या वर्षांत जे दोनतीन वाद माजले व ज्यामुळें बरीच खळबळ उडाली त्यांत 'नारायणराव पेशव्यांचा खून कीं आत्महत्या' या पुस्कावरून सुरू झालेल्या वादाला अग्रस्थान द्यावें लागेल. हें १३४२ पानाचें पुस्तक बेळगांवचे पां. गो. रानडे यांनीं लिहिलें असून तें दोन खंडांत प्रसिद्ध केलें आहे.

प्रो. न. र. फाटक यांनीं प्रस्तुत पुस्तकाची इतिहासदृष्ट्या छाननी करण्यासाठीं मुंबईच्या 'नवाकाळ' पत्रांत लागोपाठ २१ लेख लिहून त्याचें विनतोड पुराव्यानिशीं जें खंडन केलें तें पुष्कळांनीं पाहिलें असेलच. याशिवाय प्रस्तुत ग्रंथाचें सत्यस्वरूप उघडकीस आणण्यासाठीं पुणें येथें 'नाना फडणीस व्याख्यान सप्ताह' साजरा करण्यांत आला. या मालेंत प्रो. फाटक, पोतदार ओतुरकर कृ. पां. कुलकर्णी चिं. ग. कर्वे, न. चिं. केळकर इत्यादि इतिहासज्ञांनीं भाग घेऊन रानड्यांच्या ग्रंथाचें अचूक विश्लेषण केलें

साहित्यांतील नवी बुवाबाजी असा विषय घेऊन प्रो. फडक्यांनीं पुण्याच्या वसंत व्याख्यान मालेंत जें वक्तव्य केलें त्यामुळें वृत्तपत्रांना वादाचा नवीन विषय मिळाला. देशभक्त साहित्यिकांच्या पुस्तकांचें मूल्यमापन त्यांच्या देशभक्तीच्या कसोटीवर न करतां साहित्याच्या दृष्टीनें केलें पाहिजे ही फडक्यांची मूळ भूमिका. या भूमिकेवरून त्यांनीं साने गुरुजी, काका कालेलकर, आचार्य भागवत प्रभृति लेखकांवर बुवाबाजी चालविल्याचा आरोप करून लेखकानें काय लिहिलें आहे तें न पहातां कसें लिहिलें आहे तें पहावें असें प्रतिपादन केलें.

गेल्या वर्षांतील तिसरा महत्वाचा वाद य. गो. जोशांनीं लिहिल्या 'विद्वान भाडयानें देणें आहेत !' या उपहासकथेवरून सुरू झाला. महाभारतांतील एक कूटप्रश्न सोडविण्याच्या पांघरुणाखालीं नटीची जाहिरात करण्याची युक्ति एका जाहिरात-एजंटानें काढली होती आणि नवल हें कीं साहित्य-सम्राटांसारखे लोकही त्या युक्तीला बळी पडले पण अखेर या विद्वानांना आपल्या भाडोत्रीपणाची जाणीव झाल्यामुळें हा वाद संपुष्टांत आला.

येणेंप्रमाणें गेल्या शारदीय वर्षांतील मराठी वाङ्मयाचा स्थूल आढावा घेतां येईल. फार खोल पाण्यांत न शिरतां तो सखोल करण्याचा प्रयत्न केला आहे.

---

कोणतीहि खलनायकाची भूमिका जितकी शोभणार नाहीं इतकी त्यांना शोभणारी भूमिका खाडीलकरांनीं कीचकवध नाटकांत त्यांच्यासाठीं निर्माण केली. भागवतांना कीचकाची 'भूमिका' अशी करावीच लागत नव्हती. भागवतांच्या स्नायूंत व हाडांत कीचक होता. त्यांच्या स्वभावधर्माचा खाडीलकरांनीं जास्तींत ज्यास्त उपयोग केला. त्रिंबकराव प्रधान भीम-बल्लव आणि माधवराव टिपणीस सैरंध्री या भूमिका अनुक्रमें करीत असत. यशवंतराव टिपणीस कंकभटाची भूमिका करीत असत. प्रथम भट आणि नंतर दाते कीचकाच्या पत्नीचें काम करीत असत. यशवंतराव टिपणीस नेहमीं नायकाचीं कामें करीत. कांचनगडच्या मोहनेंत प्रताप-रावाचें काम करणारे टिपणीस कंकभटाचें काम करतांना जेव्हां दिसले तेव्हां प्रेक्षकांना अचंबा वाटला. कंकभटाची भूमिका म्हणजे मवाळ पक्षावर रूपक होतें असें म्हटलें तरी चालेल. लोकांना अप्रिय अशी ती भूमिका पण ती चांगली वठली तर लोकांना प्रिय असणाऱ्या भूमिकांचें यश सिद्ध होणार. टिपणीस कंकभटाची भूमिका आश्चर्यकारक परिणामपूर्ण करून दाखवीत.

कीचकवध नाटक म्हणजे अव्याहत हालचाल. प्रेक्षकांवर जी सुरुवातीला पकड बसावयाची त्या पकडींतून प्रेक्षक मिनिटभर मोकळे होत नसत. अंकांच्या मध्यें हल्लींच्या नाट्यप्रयोगांतल्या मध्यंतराएवढें त्या कालांत मध्यंतर नसे. जें मध्यंतर असे त्यांत-सुद्धां हल्लींप्रमाणें सर्व लोक बाहेर पडत नसत. मी तर प्रयोगाच्या सुरुवातीच्या आधीं पाऊणतास जाऊन बसावयाचा तो नाटक संपल्यावर बाहेर पडावयाचा. बाहेर लोक गेले तरी सुद्धां त्यांच्या तोंडीं नाटकांतलाच विषय असावयाचा. नटांच्या वाक्यांची एकमेकांवर जशी प्रतिक्रिया चालावयाची तशीच नटवर्ग आणि प्रेक्षक वर्ग यांचीहि एकमेकांवर संवादी प्रतिक्रिया चालावयाची. चमत्कृतीमागें चमत्कृती, एकापेक्षां एक चढणारा प्रवेश, प्रेक्षकांत निर्माण होणारा आवेश, अखेरीस कीचकाचा वध करण्यास कंकभट (धर्म) परवानगी देतो त्यावेळीं प्रेक्षक-वर्गांत स्पष्ट दिसणारें समाधान—आज मी कसें वर्णन करूं हेंच समजत नाहीं. संगीत नाटकाचा पुनः पुनः प्रयोग पहाणारे लोक हजारांनीं होते. आणि निदान पांच प्रयोग पाहीपर्यंत कीचकवधांतलें नाविन्य नष्ट होत नसे.

कीचकवध नाटकाचा त्यावेळीं प्रयोग करणारा नटवर्ग समर्थ होता. कीचकवधाच्या मर्दुमकीचें नाटक करावयास तसाच मर्द नटवर्ग पाहिजे. हल्लीं कीचकवध नाटक पाहणाऱ्या लोकांना

(पान १८७ पहा)

# महायुद्धाची सहा भेसूर वर्षे


—: लेखक :—
श्री. दत्तात्रय वासुदेव केळकर
(दुय्यम संपादक, 'फिनॅन्शिअल न्यूज,' मुंबई)


. संपलें एकदांचें दुसरें जागतिक महायुद्ध. या महायुद्धांत मेलीं युरोपीय व अतिपूर्वेकडील राष्ट्रें—पण प्रेतयात्रा निघाली हिंदुस्थानची !

'सहा वर्षांचा युद्धप्रयत्न' हे शब्द हिंदुस्थानची कागदी श्रीमंती, रयतेची आर्थिक गांजणूक, उपासमार, घाम, रक्त व बंगालांतील लक्षावधि लोकांचा मृत्यु यांचें वर्णन करावयास पुरेसे आहेत.

या महायुद्धांत हिंदुस्थानला "पूर्वेकडील प्रमुख पुरवठाकेंद्र" असा बडा किताब व दर्जा दोस्त राष्ट्रांनीं दिला. असेल नसेल तो सर्व कच्चा-पक्का माल दोस्त राष्ट्रांना, प्रसंगीं देशाची गरज व भूक बाजूला सारूनहि पुरविणें, एवढाच या नवीन दर्जाचा अर्थ होता. कापडचोपड, खनिज संपत्ति, लांकूड, शिमीट, पोलाद, अन्न इत्यादि माल आम्ही दोस्त राष्ट्रांना लागला तसा पुरविला. याशिवाय, रेल्वे-रूळ, आगगाड्या, एंजिनें, जहाजें, इमारतींचें व विमानतळांचें बांधकाम इत्यादि अनेकविध मदत आम्हीं केली ती निराळीच. जवळ जवळ १९४३ च्या मध्यापर्यंत अन्नाची निर्गत झाल्यामुळें बंगालचा दुष्काळ अधिक भेसूर होण्यास मदत झाली. आम्हीं अर्धनग्न राहण्याचें पत्करून प्रतिवर्षी ४०ते१०० कोटि वार कापड सक्तीनें परदेशीं निर्गत केलें.

हा सर्व माल फार महाग दरानें विकला गेला अशी ब्रिटनमधील कांहीं कृतघ्नांची तक्रार होती. पण ब्रिटिश पार्लमेंटानें नेमिलेल्या एका चौकशी कमिटीनेंच "हिंदुस्थानानें अंतर्गत व अंतरराष्ट्रीय किमतींपेक्षां स्वस्त दरानें ब्रिटनला व अन्य दोस्त राष्ट्रांना पुरवठा केला" असा निर्वाळा दिला आहे. या मालपुरवठ्यांच प्रचंड प्रमाण व त्यामुळें रयतेस भोंवलेली दामदुप्पट महागाई लक्ष्यांत घेतां हिंदुस्थानचा युद्धविषयक त्याग किती मोठा आहे याची कोणालाहि कल्पना येईल.

या मालपुरवठ्याची किंमत हिंदुस्थानला मिळाली पण ती रुपयांचे स्वरूपांत मिळाली नाहीं, पौंडांचे स्वरुपांत मिळाली. ब्रिटननें हिंदुस्थानचा युद्धखर्च कांहीं प्रमाणांत सोसला. पण त्याबाबतचें बिल रुपयांचें स्वरूपांत चुकतें झालें नाहीं. ब्रिटननें आम्हांला पौंड दिलें. अमेरिकेनें आपल्या खर्चाचे मोबदल्यांत 'डॉलर' दिले. पण ब्रिटननें ते साम्राज्याच्या 'डॉलर-गंगाजळीं' त जमा करून तेवढ्या किंमतीचे पौंड हिंदुस्थानच्या जमेला टाकले. परिणाम असा झाला कीं युद्धाचे सुरुवातीला हिंदुस्थानजवळ रु. ६९ कोटींची स्टर्लिंग शिल्लक होती ती ऑक्टोबर १९४५ पर्यंत रु. १५५८ कोटींपर्यंत वाढली ! याशिवाय सुमारें रु. ४०० कोटींचें स्टर्लिंग कर्ज फेडण्यास हिंदुस्थाननें आपला शिल्की स्टर्लिंग वापरला तो निराळाच !

वस्तुतः ब्रिटननें आपला हिंदुस्थानांतील युद्धखर्च रुपये उभे करून द्यावयास हवा होता. हिंदुस्थानांत सुमारें रु. ५०० कोटींचें ब्रिटिश भांडवल औद्योगिक कारखान्यांचे व अन्य मालमत्तेचे स्वरूपांत गुंतलेलें आहे—हे कारखाने हिंदुस्थानला मिळाले असते तर हिंदुस्थानची आर्थिक स्थिति सुधारण्यास मदत झाली असती. कानडानें ब्रिटनला कांहीं युद्धकर्ज माफ केलें खरें: पण कांहीं कर्ज दीर्घ मुदतीचें करून घेतलें व कांहीं कर्जाचे मोबदल्यांत कानडामधील कित्येक ब्रिटिश कारखाने स्वतःच्या मालकीचे करून घेतले. ऑस्ट्रेलियांतील कित्येक ब्रिटिश कारखानेहि आतां आस्ट्रेलियन मालकीचे झाले आहेत. हिंदुस्थानला ही सवलत मिळाली नाहीं. हिंदुस्थानला मिळालें फक्त 'पौंड' हीं अक्षरें लिहिलेले कागद. या कागदांमुळें हिंदुस्थानची 'ऋणको' ही संज्ञा जाऊन त्याला 'धनको' ही संज्ञा प्राप्त झाली. पूर्वी आम्ही ब्रिटनचे 'ऋणको' होतो; आतां हिंदुस्थान 'धनको' व ब्रिटन 'ऋणको' अशी अदलाबदल झाली आहे. पूर्वी 'ऋणको' म्हणून हिंदुस्थानच्या नाकधुर्‍या निघत होत्या नि ब्रिटिश भांडवलाला हिंदुस्थानांत खास हक्क व सवलती मिळत होत्या. आतां हिंदुस्थान 'धनको' झालें म्हणून त्याच्या नाकधुर्‍या निघत आहेत ! हिंदुस्थानची स्टर्लिंग-शिल्लक किती अब्जांनीं कातरावी अगर बुडवावी याचा खल सांप्रत वॉशिंग्टन येथें उघड उघड चालू आहे ! कां तर ब्रिटन जिवंत रहावें, भरभराटावें नि अखिल जगाचा व्यापार वाढावा व भरभराटावा म्हणून ! नको तें धनकोचें जिणें असें म्हणण्याची पाळी हिंदुस्थानवर आली आहे !

दोस्त राष्ट्रांनीं हिंदुस्थानांत मिळालेल्या मालाबद्दल व सेवेबद्दल जे पौंड दिले त्याचीं बिलें रुपयांचे स्वरुपांत स्वतःचे जबाबदारीवर देण्याचें वस्तुतः हिंदुस्थानच्या फडणिसानें नाकारावयास हवें होतें. पण तसें झालें नाहीं. आमूच्या ब्रिटिश फडणिसांनीं हीं बिलें देण्यासाठीं, नाशिकचें मुद्रणालय 'डबल' किंवा 'ट्रिपल शिफ्ट' नें चालविलें, त्यांनीं कोट्या-



# निवडक वाङ्मयाची या दिवाळीला भेट द्या !

**नाट्य**

छापील संसार ( शं. गो. साठे ) ८१२
मी उभा आहें ! ( प्र. के. अत्रे ) रु. १
वन्दे भारतम् (   ,,   ) रु. १
पराचा कावळा (   ,,   ) रु. १
संशयकल्लोळ ( देवल ) रु. १

**काव्य**

तो आणिक ती ( शं. गो. साठे ) रु. १
शिलङ्गण (   ,,   ) रु. १
सुधारक (माधव जूलियन) रु. २
नकुलालङ्कार (   ,,   ) रु. १
महाराष्ट्र कविपरम्परा ( यशवन्त ) ०-१३९

---

रसविमर्श ( डॉ. के. ना. वाटवे ) रसचर्चेवरील प्रबन्ध रु. ५
वृत्तें व अलंकार ( वि. म. कुलकर्णी ) विद्यार्थ्यांस अत्यंत उपयुक्त रु. ८८
प्रथमोपचार (डॉ. वि. ना. भावे ) हवाई हल्ला व तदनुषंगिक } रु.
प्रथमोपचार इंग्रजी ( ,, ,, ,, ,, ) प्रथमोपचारावर विस्तृत विवेचन } १८५

## चिंचा आणि बोरें

खुशखुशीत, चुरचुरीत विनोदी कवितांचा संग्रह

लेखक—शं. गो. साठे, पुणें.

किंमत एक रुपया

देशमुख कंपनी, पुणें यांचीं प्रकाशनें—

१ गोड निबंध ( साने गुरुजी ) भाग १, २, ३ प्रत्येकीं रु. ३
२ निवाडे भाग २ रा ( ताम्हनकर ) रु. ४
३ साजणी ( ना. ह. आपटे ) रु. ५
४ ता या भाग १ ला ( ताम्हनकर ) रु. ४
५ कालचीं स्वप्नें ( खांडेकर ) रु. ३
६ मृगजळांतील कळ्या ( खांडेकर ) रु. २॥

( ग्राहकांनीं २७८८ ची म. ऑ. केल्यास वरील ८ पुस्तकें घरपोंच पाठवूं. )

व्यापाऱ्यांस विशेष सवलत—माहिती मागवा.



सोल एजंट : **नवीन किताबखाना** संझगिरी सदन, गिरगांव, मुंबई. बुधवार चौक, पुणें शहर.



अनुक्रमणिका

वनि रुपयांच्या कागदी नोटा छापल्या नि वाढती स्टर्लिंग शिल्लक ही गंगाजळी कल्पून १ सप्टेंबर १९३९ ते १२ ऑक्टोबर १९४५ पर्यंत सुमारें रु. ९७८ कोटींच्या नव्या चलनी नोटा हिंदी रयतेचे हातीं दिल्या ! यालाच 'चलनविस्तार' अगर 'फुगावा' असें नांव आहे.

या बेछूट चलनविस्तारामुळें देशांत महागाईचा भडका उडाला. ज्याला जें मिळालें तें त्यानें सांठविलें. सरकारनें नियंत्रणें लादलीं. पण महागाईचें प्रमाण १०८ वरून २४५ पर्यंत वाढलें. कापड पांच पटीनें महागलें. सांप्रत तें अडीच तें तिप्पट महाग विकत आहे. तांदूळ तिपटी चौपटीनें महागला. अन्य अन्नांच्या किंमतीहि भलत्याच वाढल्या. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे देशांतील बहुसंख्याक रयतेला या महागाईनें 'लंकेंतील सोन्या विटांची' आठवण करून दिली. प्रत्येक वस्तूचे बाबतींत काळा बाजार निर्माण झाला.

या महागाईच्या वाहत्या गंगेंत ज्याला ज्याला जमलें त्यानें हात धुवून घेतले. श्रीमंत अधिक श्रीमंत झाले नि गरीब अधिक गरीब बनले. देशी कापडगिरण्यांनीं खोऱ्यानें पैसा ओढला. अधिकाऱ्यांनीं लांच किती खाल्ली याची मोजदाद करतांनां यमदरबारांतील अकौंटटहि वेडेपिसे होतील कीं काय अशी भीति वाटते. बंगाल्यांत १५ लक्ष माणसें उपासमारीनें मेलीं—या प्रत्येक मृत्यूमागें रु. १००० चा नफा नफेखोर तांदूळ व्यापाऱ्यांनीं केला असा अंदाज वूडहेड-कमिशननें (हें कमिशन बंगालांतील दुष्काळाची चौकशी करण्यासाठीं नेमलेलें होतें) आपल्या अहवालांत नमूद करून ठेविला आहे ! सरकारी रोख्यांच्या किंमती १०३.८ वरून ११८.४ पर्यंत महागल्या. ठरीव व्याज देणाऱ्या शेअर्सच्या किंमती ९५.८ वरून १८६.२ पर्यंत वाढल्या नि बदलतें व्याज देणाऱ्या साध्या औद्योगिक शेअर्सच्या किंमती १२२.४ वरून २१७.० पर्यंत कडाडल्या ! १९३७-३८ च्या किंमती १०० कल्पिल्या तर १९४४ अखेरपर्यंत कापडगिरण्यांचे शेअर्स ५९.४ वरून १८८.१ पर्यंत म्हणजे तिपटीनें कडाडले. कोळसाखाणीचें शेअर्स १३१.७ वरून ३१५.५ पर्यंत वाढले. पोलाद शेअर्स ३६९.५ वरून ९९९.२ पर्यंत महागले कागद कारखान्यांचे शेअर्स १७४ वरून ५०६.९ पर्यंत स्थिरावले. अजूनहि कांहीं शेअर्सच्या किमतींत वाढ होत आहे.

या भरभराटीला नि नफेबाजीला पायबंद घालण्यासाठीं सरकारनें नवे कर लादले. हिंदुस्थान सरकारच्या एकूण खर्चाच्या ६७.७ टक्के रक्कम करांचे रूपानें उभी करण्यांत आली. अमेरिका, ब्रिटन, कानडा, ऑस्ट्रेलिया यांजशीं तुलना करितां हा करांचा बोजा किती तरी अधिक आहे. कर वाढवूनहि युद्धकाळांत देशाच्या जमाखर्चाची तोंडमिळवणी होऊं शकली नाहीं नि हिंदुस्थानचें सार्वजनिक कर्ज रु. ४८५ कोटींवरून रु. १५१७ कोटींपर्यंत म्हणजे तिपटीनें वाढलें.

एवढें झालें तरी नफेबाजांचा नफा आटला नाही किंवा माहागाईचें उग्र स्वरूप मंदावलें नाहीं. नफेबाजांनीं आपला काळा नफा लपवून ठेविला नि त्याजवरील करांचा बोजा टाळला. या घटकेला काळ्या बाजाराचे सदस्य लांचलुचपतखोर अधिकारी यांचे जवळ एकूण रु. ५०० कोटींची रक्कम सांठली असली पाहिजे असा तज्ज्ञांचा अंदाज आहे. या एकाच आंकड्यावरून युद्धकाळांत रयतेची गांजणूक किती मोठ्या प्रमाणांत झाली असली पाहिजे याची कल्पना येईल.

---

( पान १८२ वरून )

त्या नाटकाच्या लोकप्रियतेचें मर्म कळत नाहीं. कसें कळणार ? लायक नटवर्गाशिवाय कोणींहि तें नाटक करूं नये एवढीच नम्र विनंति मी नटांना आणि त्यांना उचलून धरणारांना करीन. हल्लींच्या एक्सपर्टांनीं आमचीं जुनीं नाटकें बाटवूं नयेत एवढीच मेहेरबानी करावी. त्यांनीं आपलीं नव्या तंत्रानुसार लिहिलेलीं नाटकें करावीं.

कीचकवध नाटकांत प्रमुख्य पात्रें कीचक, कंकभट, भीम आणि सैरंध्री; ही कामें अनुक्रमें भागवत, टिपणीस ( यशवंतराव ), त्रिंबकराव प्रधान आणि टिपणीस (माधवराव) हे करीत असत. माधवराव टिपणीस स्वरूप सुंदर होते अशांतला प्रकार नाहीं, इतकेंच नव्हे तर त्यांची मूर्ति ठेंगणी ठुसकी नव्हती. असें असून सुद्धां त्यांचें काम कुशलपणें ते करीत असत. मेहनत केल्यानें नट काय करूं शकतो हें दाखविणारा हल्लींच्या प्रेक्षकांच्या परिचयाचा नट केशवराव दाते. पण केशवराव दाते हे ज्यांचे शिष्य झाले असे नट त्यावेळीं महाराष्ट्र नाटक मंडळींत होते. गणपतराव भागवत आणि माधवराव टिपणीस हे दोघेहि नट केवळ परिश्रमानें आपापल्या भूमिका चांगल्या वठवूं शकले. त्रिंबकराव प्रधान मात्र केवळ निसर्गदत्त सामर्थ्याच्या जोरावर आपली भूमिका हाणीत असत. त्यांची भीमाची भूमिका अतिशय लोकप्रिय होती हें, मला वाटतें, सांगितलें पाहिजे.

लोकप्रियतेंत पहिला नंबर मिळवणारी भूमिका कीचकवधांत करणारे त्रिंबकराव प्रधान भाऊबंदकींतहि तशीच लोकप्रियता भूमिका मिळवूं शकले. भाऊबंदकींत रामशास्त्री हा नायक आहे आणि तेंच काम त्रिंबकराव करीत असत. त्यांचें रामशास्त्र्याचें सोंग हुबेहुब टिळकांसारखें दिसत असे. प्रथम तर ते पगडीसुद्धां लोकमान्यांच्या पगडीच्या रंगाची घालीत असत. लोकमान्यांशीं असलेलें हें साम्य पोलिसांच्या डोळ्यावर आलें. १९१० सालीं कीचकवधावर बंदीचा हुकुम काढल्यावर भाऊबंदकीवरहि तात्पुरता रखडपट्टीचा हुकुम लागू झाला. कीचकवध आणि भाऊबंदकी हीं दोनहि नाटकें बंद झालीं असतीं म्हणजे महाराष्ट्र नाटकमंडळीचा संसारच आटपला असता. त्या मंडळीचे पुष्कळ स्नेही नेमस्त पक्षांत होते त्यांनीं खटपट करून भाऊबंदकीची ग्रहणांतून सुटका केली. ज्या कांहीं अटी पोलिसांनीं लादल्या त्यांतली एक अट अशी होती कीं रामशास्त्र्यानें पांढरी पगडी घातली पाहिजे. पगडीच्या रंगाचें सामर्थ्य किती असूं शकतें तें पहा. व्यक्तिमाहात्म्यावर नाटकाचें यश अवलंबून असतें आणि व्यक्तीचें महात्म्य यथातथ्यानें रंगभूमीवर चित्रित करण्यांत खाडीलकरांचा हातखंडा होता. या दोनहि नाटकांचें ऐतिहासिक महत्त्व असामान्य आहे. लोकांच्या मनांत जें होतें तेंच त्यांना या नाटकांत ऐकावयास मिळत असे, इतकेंच नव्हे तर जे शब्द त्यांना सुचणें शक्य नव्हतें पण जे ऐकले असतां पटतील असे शब्द त्यांना या दोनहि नाटकांत ऐकावयास मिळत होते. त्यामुळें प्रेक्षकांना स्वानुभावाचा आनंद चाखतां येत असे. प्रेक्षक हे तिऱ्हाइत म्हणून नसतच. रामशास्त्र्याला पकडण्याचा हुकूम आनंदीबाईनें केल्यावर जे शब्द रामशास्त्र्याच्या तोंडून निघतात तसले शब्द लोकमान्यांनीं न्यायकोर्टांत काढले होते. रामशास्त्र्याचें शेवटलें लांबलचक भाषण शेवटपर्यंत ऐकावयास प्रेक्षक बसत या पेक्षां प्रेक्षकनटांचा एकजीव झाल्याचा दुसरा पुरावा देण्याचें कारणच नाहीं. कांग्रेसच्या अध्यक्षाचें किंवा महात्मा गांधींचें भाषण ज्या एकतानतेनें लोक ऐकतात तितक्या एकतानतेनें तें भाषण लोक ऐकत असत. तेज, तप आणि यश यांच्या अविभाज्य त्रिवेणीसंगमाचें तें दृश्य होतें.

कीचकवधानें नाटकाच्या जगांत खाडीलकरांचें आसन स्थिर केलें. त्यानंतर वायकांचें बंड व भाऊबंदकी हीं नाटकें त्यांनीं लिहिलीं आणि हीं दोनहि नाटकें यशस्वी झालीं. भाऊबंदकी नाटकालासुद्धां 'तेजस्वी, तपस्वी व यशस्वी' हीं तीनहि विशेषणें लावतां येतील. रामशास्त्र्याच्या भूमिकेंत मंडालेच्या तुरुंगांत वास करीत असलेल्या लोकमान्य टिळकांचें दर्शन खाडीलकर देत असत.

यानंतर खाडीलकरांची तपश्चर्या ढळली. 'पंचशरें गधवरें' वश करून घेतलेल्या नाट्यकलेनें त्यांना माळ घातल्यावर ते तिचे लाड करण्यांत गुंतले. खाडीलकरांनीं ता. १२ मार्च १९११ रोजीं संगीतापुढें मान वांकवली. पहिल्या बाजीरावाचा त्या दिवशीं मृत्यु घडला आणि नानासाहेब पेशव्याचें युग सुरु झालें. खाडीलकरांनीं पैसा मिळवला, लोकप्रियताहि मिळवली. पण नंतरच्या कोणच्याहि नाटकांत नाट्यकलेला वश करण्याचें सामर्थ्य नाहीं, किंवा क्रांतिकारकताहि नाहीं.

---

अनुक्रमणिका




**• • मुसलमान हें एक निराळें राष्ट्र ठरलें; व मुसलमान राष्ट्राचें व हिंदु राष्ट्राचें कित्येक हितसंबंध विरोधी आहेत अशी कबुली चालू ४० वर्षें हिंदु पुढारीच देत आले आहेत." पाकीस्तानच्या मागणीचा मतितार्थ याप्रमाणें आहे.**

बॅ. जिन्हांची पाकिस्तानची मागणी भरमसाट नाहीं, किंबहुना गेल्या ४० वर्षांतील अगदीं पहिल्या प्रतीच्या हिंदु व मुसलमान पुढाऱ्यांच्या विचारविनिमयाचे, दीर्घदर्शीपणाचें किंवा तात्कालिक बिकट प्रश्न सोडविण्यासाठीं केलेल्या तडजोडीचें परिपक्क फल म्हणजे पाकिस्तानची हट्टाची मागणी होय. आणि या गोष्टीची जाणीव असल्यामुळें राजगोपालाचार्य, महात्माजी, भुलाभाई देसाई, हे जुनाट पुढारी या मागणीस मान तुकवीत आहेत; तर नामदार शास्त्री, सर तेजबहादुर सप्रू व मदनमोहन मालवीय हे कमीअधिक प्रमाणांत मूग गिळून राहिले आहेत. ह्या मागणीचा उगम विसाव्या शतकाच्या पहिल्या दशकांत झाला. न्यायमूर्ति बद्रुद्दीन तय्यबजी हयात असेंपर्यंत हिंदु व मुसलमान यांचें हितसंबंध वेगळे समजले जात नव्हते. मग मुसलमान हें एक निराळें राष्ट्र असल्याची कल्पनाच कोठून येणार? या शतकाच्या प्रारंभीं हिंदी लोकांस पुळपुळीत मतदानाचा हक्क देण्याची कल्पना उदार मतवादी तत्ववेत्ते लॉर्ड मोर्ले यांनीं काढली. त्यावेळीं आगाखानांनीं विभक्त मतदारसंघाचा आग्रह धरला. वस्तुतः पाहतां आगाखानी पंथ जवळ जवळ हिंदूंत जमा मानला जात होता. प्रस्तुतचे आगाखान यांचे वडील हे मार्क ट्वेन साहेबास मुम्बईच्या मुक्कामांत भेटावयास गेले होते, त्यावेळीं "तुम्हांस भेटावयास प्रत्यक्ष देव आला आहे पण तो हिंदु देव नसून देवाचा मुसलमानी अवतार आहे" अशी वर्दी दिल्याचें मार्क ट्वेन या अमेरिकन विनोदी लेखकाच्या More Trips Abroad या पुस्तकांत नमूद आहे. हल्लींचे आगाखान यांचे अनुयायी त्यांच्या या अवतारी विभूतिमत्वाची थोरवी मानतात व ती आगाखान यांनीं अमान्य केल्याचें मुळींच दिसून येत नाहीं. यामुळें कट्टर धर्मभोळ्या मुसलमानांच्या मतें आगाखान व त्यांचा संप्रदाय हिंदवाळलेला आहे. परंतु त्याच कट्टर धर्मभोळ्या मुसलमानांचा पाठराखेपणा अगदीं अद्यावत् साधनांनीं हल्लींच्या आगाखानाकडून जितका झालेला आहे, तितका दुसऱ्या कोणीहि केलेला नाहीं असें म्हणतां येईल. हिंदूंना किंवा आपणांसारख्या उदार मतवादी मुसलमान पुढाऱ्यांना मुसलमानाचा पक्षाभिनिवेश करतां येणार नाहीं याकरितां विभक्त मतदारसंघ मुसलमानांस अवश्य पाहिजे असा आग्रह आगाखान वगैरे पुढाऱ्यांनीं धरला. आपणांसारख्या उदारमतवादी मुसलमान पुढाऱ्यांना देखील धर्मभोळ्या मुसलमान बहुजन समाजाच्या प्रामाणिक धर्मभावना आकलन होत नाहींत, याकरितां त्या समाजास स्वतंत्रपणें आपले प्रतिनिधी निवडण्याची संधि मिळाली पाहिजे ह्या मुद्दयावर त्यांचा भर होता.

नवलाची गोष्ट ही कीं उदारबुद्धी मुसलमानांच्या ह्या अनुदार मागणीला नामदार गोखल्यांसारख्या उदारमतवादी हिंदु पुढाऱ्यानेंहि त्यावेळीं मान्यता दिली! हे उदार मुसलमान पुढारी आपल्या अज्ञान धर्मबांधवांच्या प्रेमानें चकले आहेत, ते दहापांच वर्षांत नीट वळणावर येतील, सध्यां त्यांच्याच कलानें घेऊं; म्हणून, हें चुकीचें तत्त्व हिंदुस्थानच्या राजकारणांत शिरूं देण्यास नामदार गोखले यांनीं सम्मति दिली. आणि मोर्ले—मिंटो सुधारणांत विसाव्या शतकाच्या पहिल्या दशकांतील मुसलमानांच्या विभक्त मतदारसंघाचा शिरकाव झाला. व तो नामदार गोखल्यांसारख्या भारतीय पुढाऱ्याच्या अनुमतीनें.

मोर्ले-मिंटो सुधारणा अगदीं क्षुद्र होत्या. या सुधारणांप्रमाणें दहापांच प्रतिनिधी निवडण्याचा हक्क अगदीं वरच्या थरांतील थोडक्याशां लोकांस मिळाला होता व तो अगदीं टाकाऊ आहे असें प्रत्यक्ष प्रतिनिधींस देखील कळत होतें. त्यानंतर पहिलें महायुद्ध सुरू झाल्यवर कायदेमंडळांत प्रतिनिधी निवडण्याचा हक्क विस्तृत होणार हें ठाम ठरलेलें होतें. त्यावेळीं हिंदी राजकारणांत शिरलेलें हें उंटाचें पिल्लू कायमचें ठाम झालें आहे असें सर्व हिंदु आणि मुसलमान पुढारी—उदार आणि अनुदार—गृहीत धरून चालले. प्रख्यात लखनौ करारा (पॅक्ट) नें मुसलमानांच्या विभक्त मतदारसंघाची मागणी मान्य धरून, अल्पसंख्य मुलमानांना किती प्रतिनिधी अधिक मिळावयाचे हें ठरविलें; म्हणजे फक्त 'वेटेज' किती

अनुक्रमणिका




**दिवाळीच्या मंगलमय दिवसांत मंगलमय बातमी—**

छाया फिल्मसचे मनोहर संगीतमय चित्र



# आला ऊदाल

: प्रोडय़ूसर—कथालेखक :

**पंडीत शिवकुमार**

विशेष माहितीसाठीं लिहा :

## आनंद कुमार

C/o छाया फिल्म्स

नायगांव क्रॉस रोड, दादर

मुंबई १४






**मुनशी प्रेमचंद**

या सुप्रसिद्ध कादंबरीकाराच्या

*“ प्रेमाश्रम ”*

या सुप्रसिद्ध कादंबरीवर आधारलेली सुंदर चित्रकथा



# जायदाद

आगामी कलाचित्र

: अनुवादक :

**पंडीत शिवकुमार**

विशेष माहितीसाठीं लिहा :

## आनंद कुमार

C/o छाया फिल्म्स

नायगांव क्रॉस रोड, दादर

मुंबई १४.



घेवयाचें याचा उहापोह केला. या लखनौ पॅक्टचें सर्व श्रेय त्यावेळीं उदारमतवादी समजले जाणारे बॅ. जिन्हा आणि कट्टर हिंदु समजले गेलेले लो. टिळक यां दोघांकडे जातें. जिन्हा व लोकमान्य या दोघांनींहि विभक्त मतदारसंघाला मुळांतच मान्यता दिली. फक्त मुसलमानांचा आग्रह किती ओढून धरावा हें जिन्हांनीं ठरविलें व त्यांचा आग्रह कितपत चालूं द्यावा हें लोकमान्यांनीं निश्चित केलें. पुढें लौकरच झालेल्या मँटिग्यू चेम्सफर्ड किंवा माँटफर्ड सुधारणेच्या कायद्यांत तें तत्त्व निगडित करण्यांत आलें. त्यावेळींहि आपल्या अज्ञ बांधवांचा नामदार आगाखान यांनीं पक्ष घेतला व गोखल्यांचे पट्टशिष्य उदारमतवादी नामदार शास्त्री यांनीं त्यास मान्यता दिली. त्यापुढची पायरी १९३५ सालच्या हिंदी रिफॉर्म अक्टची. ह्या कायद्याकरतां गोलमेज परिषद भरली होती. त्यावेळीं पहिल्यानें हिंदी कॉंग्रेसचे पुढारी तुरुंगांत असल्याकारणानें त्या परिषदेस हजर नव्हते. इतक्यांत कॉंग्रेसचे पुढारी मुक्त झाले. व कॉंग्रेसचे एकमेव प्रतिनिधी म्हणून महात्माजी विलायतेस गेले. हिंदु व मुसलमान यांच्यांतील वेटेजचा प्रश्न आणि विशेषतः विभक्त मतदारसंघाचा प्रश्न महात्माजी चुटकीसरसा सोडवितील अशी हिंदी कॉंग्रेसभक्तांना व दुसऱ्या हिंदी पक्षांना आशा वाटत होती. परंतु गांधींसकट अवघ्या गोलमेजपरिषदेस हे प्रश्न सोडवितां आले नाहींत. उलट गांधींच्या सत्याग्रहानें म्हणा किंवा दुराग्रहानें म्हणा हिंदु अस्पृश्यांचा नवीनच प्रश्न उद्भवला. आणि तोहि एका नवीन विभक्त मतदारसंघाचा व नवीन वेटेजसंबंधींचा. हे सर्व प्रश्न मजूरमंत्री मि. मॅग्डोनाल्ड यांच्या लवादावर सोपवून महात्माजींना हिंदुस्थानास परत यावें लागलें. मुसलमानांचा विभक्त मतदारसंघ व वेटेज ह्यांची मेख बळकट ठोकण्यांत आली आणि तिच्या जोडीस अस्पृश्यांच्या वेटेजसकट नवीन विभक्त मतदारसंघाचा फांस हिंदी राजकीय सुधारणांच्या गळ्यास लावण्यासाठीं तयार झाला. हें पाहून महात्माजींना अत्यंत पश्चात्ताप झाला खास! आपले प्राण पणास लावून अस्पृश्यांच्या नवीन विभक्त मतदार संघाचा फास तोडून टाकण्याचा महात्माजींनीं अत्यंत निर्धारानें प्रयत्न केला. व डॉ. आंबेडकर यांच्या हिंदु वृत्तीमुळें तो सफळ झाला, परंतु अस्पृश्यांचें वेटेज गळ्यांत पडलें व तेंहि मि. मॅक्डोनॅल्ड यांनीं देऊं केलेल्या वेटेज पलीकडे! मानापमानांतील "अंगावरचें घ्या, पेटींतलेहि घ्या, पण प्राणरक्षण करा." अशी एकंदरींत अवस्था झाली. पण ह्यावेळीं विभक्त मतदारसंघाचें विष किती जालीम आहे हें हिंदी लोकांच्या निदर्शनास आले. आपलें हिंदी बांधव आपल्याशी स्वार्थी निष्ठुरतेनें वागतील याकरितां आपणांस विभक्त मतदारसंघ पाहिजे असें म्हणणें हें देशांत दुही माजविणारें आहे ही साक्ष हिंदु पुढाऱ्यांस पटली. अगदीं निकराचा प्रयत्न करून, फार काय पण स्वतःचें प्राण देखील पणास लावून महात्मा गांधींनीं ज्याप्रमाणें अस्पृश्यांचा विभक्त मतदारसंघ नष्ट केला व त्याकरितां वेटेज देऊन स्पृश्य हिंदूंचें प्रतिनिधी कमी करण्यास मान्यता दिली; त्याप्रमाणें एकंदर हिंदुपुढाऱ्यांनीं १९३५ च्या सुधारणा कायद्यांतून विभक्त मतदारसंघाचें तत्त्व नष्ट करावयास पाहिजे होतें. तें न करतां त्या तत्त्वावरील सुधारणा प्रत्यक्ष कॉंग्रेसनें देखील मान्य केल्या व राबविल्या; व असहकारतेचें तत्व देखील सोडून दिलें. विभक्त मतदारसंघासकट सुधारणा कॉंग्रेसनें देखील मान्य केल्या त्याचाच परिणाम आज पाकिस्तानची मागणी होण्यांत झाला आहे हें नाकबूल करणें शक्य नाहीं.

हिंदु व मुसलमान यांचें शत्रुत्व किंवा निदान मतभेद तरी दूर होणें कदापि शक्य नाहीं व मुसलमानांचे राजकीय हितसंबंध राखले जाणार नाहींत यावर विभक्त मतदारसंघाचें तत्त्व आधारलेलें आहे. "हिंदुस्थान हें एकराष्ट्र मानून हिंदी मध्यवर्ती सत्तेची उभारणी करण्यांत आली तर ती मध्यवर्ती सत्ता हिंदूंची बहुसंख्या असलेल्या अविभक्त मतदारसंघाकडून होणार हें ठरल्यासारखें आहे. कोणताही प्रश्न राष्ट्रापुढें म्हणजे मध्यवर्ती कौन्सिलपुढें आला कीं त्याचा निकाल बहुसंख्य हिंदु प्रांताच्या मताप्रमाणें व्हावयाचा. प्रांतिक कौन्सिलांमध्यें मुसलमानांच्या हितसंबंधाची काळजी अविभक्त मतदारसंघांना घेतां येत नाहीं अशी कबुली नामदार गोखल्यांपासून महात्मा गांधींपर्यंत खुद्द हिंदु पुढाऱ्यांनींच आज ४० वर्षांत चार वेळां जाहीरपणें दिलेली आहे. त्यावरून **मुसलमान हें एक निराळें राष्ट्र ठरतें व मुसलमान राष्ट्राचें व हिंदु राष्ट्राचें कित्येक हितसंबंध विरोधी आहेत अशी कबुली** आज ४० वर्षें हिंदु पुढारीच देत आले आहेत."

**पाकीस्तानच्या मागणीचा मतितार्थ याप्रमाणें आहे व मुस्लीम लीगचें म्हणणें असेंच आहे.**

पाकिस्तानच्या तरफदारीचा हा कोटिक्रम किती फोल आहे हें सहज कळण्यासारखें आहे. मुसलमान पुढाऱ्यांचा स्वार्थ आणि हिंदु पुढाऱ्यांचें फाजील औदार्य यांन या कोटीक्रमाचा उगम आहे. मुसलमान अज्ञ बहुजनसमाजाच्या भावना निदान १९ व्या शतकाच्या अखेरीपर्यंत इतक्या धर्मभोळ्या किंवा धर्मवेड्या नव्हत्या; हें इतिहास सांगतो. १८५७ सालापासून—आणि त्यापूर्वीहि एकाच प्रदेशांतील हिंदु व मुसलमान हे सारख्याच



मांन.च मतें द्या.

भावनानीं प्रेरित होते व त्या भावनेंतील उत्कटता १८५७ सालच्या बंडांत सारख्याच प्रकारानें दिसून आली. १९३५ च्या कायद्यापर्यंत म्हणजे सायमन कमिशनच्या वेळींहि– सुशिक्षित व अशिक्षित–हिंदु व मुसलमान एकाच राजकीय आकांक्षेनें प्रेरित असतात हें स्पष्ट दिसलें. स्वार्थी पुढाऱ्यांनीं दावून टाकल्यामुळें गेल्या ४० वर्षांत मुसलमानांनीं राजकारणांत जरी हिंदूंइतकी उत्कटता दाखविलेली नाहीं तरी हिंदूंच्या राजकीय चळवळीस मुसलमान बहुजन समाजाकडून विरोध झालेला नाहीं. कोंकणीं मुसलमान कोंकणी हिंदूंशीं जितका समरस होतो त्याच्या शतांशानेंहि कोंकणी हिंदु व पंजाबी हिंदु किंवा कोंकणी मुसलमान व पंजाबी मुसलमान यांमध्यें आपुलकी असत नाहीं. भाषा, राहणी, किंबहुना धार्मिक रुढी या बाबतींत एकाच प्रांतांतील भिन्न धर्मीय माणसें, परप्रांतीय समानधर्मीयांपेक्षां समानभावनांनीं निगडित झालेलीं असतात. एकदां कांहीं पुढाऱ्यांमध्यें चर्चा चालली असतांना एक मुसलमान पुढारी म्हणाले, कीं, "तुम्हीं हिंदु लोक अज्ञान मुसलमानांना हिंदु करून सोडाल म्हणून आम्हांला विभक्त मतदारसंघ व पाकिस्तान पाहिजे." त्यावर एका प्रसिद्ध हिंदु पुढाऱ्यानें म्हटलें कीं, "तुम्ही वेगळें पाकिस्तान करा म्हणजे बाकीच्या हिंदुस्थानांतील एकूणएक मुसलमान हिंदु झाला असें समजा!" ह्या दोघांच्याहि म्हणण्यांत बरेंचसे तथ्य होतें. हिंदी मुसलमान कितीहि कट्टर असले तरी हिंदुस्थानाबाहेरचे मुसलमान त्यांना आपल्यापेक्षां निराळे किंबहुना हिंदवाळलेले समजतात असा अनुभव आहे; मरहूम महमद अलींना तो तुर्कस्थानांत आला. थोड्याच वर्षांपूर्वीं हिजरत करूं पाहणाऱ्या हिंदी मुसलमानांना शेजारच्या अफगाणिस्थानांतहि थारा मिळाला नाहीं. निराळें पाकिस्तान स्थापन करून आपण हिंदुस्थानांतून विभक्त झालों तर इतर मुसलमानी राष्ट्रें आपणांस जवळ करणार नाहींत हें जिन्हांच्या पाकिस्तानांतील मुसलमानांस चांगलें ठाऊक आहे. यामुळें बलुचिस्तान किंवा वायव्येकडील प्रांत, पंजाब व बंगाल या मुसलमानी बहुसंख्य प्रांतांत आणि आसाम आणि सिंध या बहुतांशीं मुसलमानी प्रातांत सुद्धां मुस्लीम लीगचें आसन डळमळीत राहतें. अज्ञान मुसलमान बहुजनसमाजाविषयीं गेल्या ८० वर्षांतील हिंदु व मुसलमान पुढाऱ्यांच्या कल्पना चुकीच्या होत्या असें आढळून येईल. वायव्येकडील प्रांतास निराळें पाकिस्तान नको असा गेल्या दहा वर्षांचा अनुभव आहे. तीच गोष्ट पंजाब व बंगाल या प्रांताची आसामसारख्या पूर्णपणें मुसलमान प्रांतास सुद्धां हिंदुस्थानापासून विभक्तपणा नको असें आढळून येतें. राहतां राहिला सिंध. या प्रांतानें सुद्धां मुस्लीम लीगशीं चुंबाचुंबी चालविल्याचें वेळोवेळीं आढळून आलेले आहे. एकदांचें पाकिस्तान घेऊन विभक्त व्हायचें असेल तर व्हा असें म्हणण्याचा वेडरपणा हिंदुसमाज व प्रतिष्ठित हिंदु पुढारी हे जर एकदां दाखवितील तर पाकिस्तानची व्याद कोणासहि नको असेंच आढळून येईल. कदाचित् भेंडीबाजार, महम्मद अली रोड किंवा रामपूर संस्थान येथील मवाली मुसलमानांना व हिंदूंना बेशिस्त वर्तन करण्याकरितां पाकिस्तान पाहिजे असेल तर नकळे. पाकिस्तानची मागणी जिन्हा जर अगदीं दिलापासून करीत असतील तर ह्या पाकिस्तानचा मोबदला म्हणून संयुक्त मतदारसंघाची मागणी हिंदूंनीं केली पाहिजे. पाकिस्तानचें अत्यल्प मोल म्हणून तरी संयुक्त मतदारसंघ अमलांत येऊं द्या. किंबहुना पाकिस्तानचा प्रश्न बाजूस ठेवून हिंदी स्वराज्यास व स्वातंत्र्यास आवश्यक असलेला संयुक्त मतदारसंघ मिळविण्यासाठीं हिंदी लोकांनीं झटण्याची वेळ आलेली आहे. पूना पॅक्टच्या वेळीं ज्याप्रमाणें महात्माजींनीं प्राण पणास लावून आपल्या चुकीची दुरुस्ती केली व अस्पृश्यांच्या विभक्त मतदारसंघाचें बीष हिंदु समाजांत किंवा राजकारणांत शिरूं दिलें नाहीं त्याप्रमाणें हिंदी राजकारणाची कळकळ धरून स्वातंत्र्य मागणाऱ्या हिंदी लोकांनी मुसलमानांच्या विभक्त मतदार संघाचें बीज राष्ट्राच्या अंगांतून काढून टाकलें पाहिजे. हिंदुस्थान अखंड ठेवण्याचा हाच एक मार्ग आहे. व या मार्गाकडे कन्हैयालाल मुनशीसारख्या अखंड हिंदुस्थानच्या चहात्यांनीं आणि हिंदी स्वातंत्र्याची मागणी करणाऱ्या पुढाऱ्यांनीं गेलीं वीस वर्षें अगदीं दुर्लक्ष करावें ही अत्यंत खेदाची गोष्ट आहे.

विभक्त मतदारसंघामुळें गेल्या २० वर्षांत तरी मुसलमान समाजाचें अकल्याण झालेलें आहे असेंच आढळून येईल. हिंदी मुसलमान पुढाऱ्यांचा राजकीय आप्पलपोटेपणा विभक्त मतदार संघामुळें बेसुमार वाढला असून त्यापायीं हे पुढारी आपल्या समाजाचें सामाजिक, आर्थिक व बौद्धिक नुकसान उघड्या डोळ्यांनीं करीत आहेत. बालविवाह, धार्मिक ट्रस्ट वगैरे बाबतींत त्यांनीं विरोधाटीचें धोरण ठेविलें असून प्रगतिपर कायदे करावयाचें असेल तर मोठ्या कष्टानें त्यांच्या विरोधास तोंड द्यावें लागतें असें आढळून येईल. गोषाची रूढी धार्मिक समजली जाते, ती स्त्रीसमाजास अखण्ड अज्ञानांत व दास्यांत ठेवितें, असें आढळून आल्यामुळें केमालपाशाच्या पुनरुज्जीवित टर्कीनें ती झुगारून दिली. इराणांत व अफगाणिस्थानांत देखील या चालीविरुद्ध चळवळी होत आहेत. परंतु आमच्या हिंदी मुसलमान समाजांत या रूढीविरुद्ध ब्र काढण्याची मुष्कील आहे. याचें कारण मुसलमानाचा विभक्त मतदारसंघ व त्याच्यायोगानें त्या समाजाच्या पुढाऱ्यांत येणारा भित्रेपणा व स्वार्थ हें होय.

पाकिस्तानच्या आधारभूत असलेल्या विभक्त मतदारसंघास अगदीं निकरानें विरोध केल्याशिवाय हें पाकिस्तानचें भूत गाडलें जाणार नाहीं. त्याकरितां वेळ पडल्यास मुसलमान अल्पसंख्य असलेल्या प्रांतांत हल्लींहून वेटेज द्यावें लागलें तरी हरकत नाहीं.

अनुक्रमणिका

# कलेपेक्षां कलावन्त श्रेष्ठ

लेखक : मेघदूत

' कला ही कलावंतापेक्षांही श्रेष्ठ आहे, ' अशी एक म्हण लॅटिन भार्षेत आहे. कलावंत कलाकृति निर्माण करतो. रसिकज्ञ तिचें रसग्रहण करतो; तिच्यावरून कलावंताची कसोटी लावतो. कौतुक कलावंताचें होतें, परंतु त्यापेक्षां जास्त त्या कलाकृतीचें होतें. ताजमहाल ज्यांनीं तयार केला त्यांना जग विसरलें, परंतु ताजमहाल मात्र अमर झाला. शहाजहान-मुमताज यांच्या अक्षय प्रेमाची स्मृति म्हणून तो चिरंतन-स्मारक ठरला ! कला ही कलावंतापेक्षांही श्रेष्ठ असल्याचें हें सर्वोत्कृष्ट उदाहरण !

आतां केव्हां केव्हां नियम अपवादानें सिद्ध होतो; तेव्हां कलेपेक्षांही कलावंत श्रेष्ठ ठरल्याचें एखादें उदाहरण घडल्यास, तसें घडूंच शकत नाहीं, असें अट्टाहासानें प्रतिपादण्यांत कांहीं विवेक आहे, असें मला वाटत नाहीं. माझ्यापुढें असें एक उदाहरण आहे, कीं जेथें कलावंत हा त्याच्या कलेपेक्षांही श्रेष्ठ ठरला आहे. व्ही. शांताराम हेच ते आपल्या कलेवर विजय मिळविणारे श्रेष्ठ कलावंत होत.

प्रभात फिल्म कंपनींत असतांना, रसिकांनीं व्ही. शांतारामांचा गौरव केला. प्रथम नांव व्ही. शांतारामचें निघालें, नंतर त्यांच्या कलाकृतीचें; म्हणजे, ' व्ही. शांताराम कृत अमृतमंथन, कुंकू, माणूस, शेजारी ' ही संज्ञा प्राप्त झाली; ' अमृतमंथन, कुंकू, माणूस, शेजारी वगैरेंचे व्ही. शांताराम ' ही नव्हे.

आणि जेव्हां व्ही. शांतारामनीं युद्धकाळांतील सर्व अडीअडचणींना निधड्या छातीनें तोंड देऊन राजकमलकलामंदिराची प्रतिष्ठापना केली, तेव्हां त्यांनीं हेंच दिग्दर्शित केलें, कीं कलावंत हा कधींही कुणाचा टिळा लावून जगत नाहीं, उसन्या ऐश्वर्यानें मिरवत नाहीं. आणि म्हणूनच त्यांच्या ' शकुंतले 'मधील भरत बाणेदारपणें म्हणतो, कीं ज्यांना स्वतःचें कर्तृत्व नसतें तींच माणसें आपल्या बापाच्या नांवानें मिरवतात. स्वतःच्या कर्तृत्वाचा हा किती प्रभावी साक्षात्कार !

तथापि आपल्या जन्मदात्या मातापित्यांची विस्मृति व्ही. शांतारामनीं होऊं दिलेली नाहीं. त्यांनीं आपल्या कंपनीला 'राज–कमल कलामंदीर' हें नांव देऊन त्यांनीं 'मातृदेवो भव पितृदेवो भव' हा वेदोक्त आचार पाळून आपल्या आर्यवंशाची, आर्यांच्या श्रेष्ठ परंपरेची प्रचीति आणून दिली. आईबापांच्या आशीर्वादाच्या वरदहस्ताशिवाय कार्यसिद्धी नाहीं म्हणून त्यांनीं प्रथम वंदन त्यांना केलें. ' कलामंदीर ' हें नांव देण्यांतही त्यांचा महाराष्ट्रीय बाणा व अभिजातपणा यांचा प्रत्यय आल्याशिवाय रहात नाहीं. त्यांनीं अमूक अमूक प्रॉडक्शन्स किंवा अमूक अमूक कंपनी अथवा फिल्मस असें विशोभित नांव दिलें नाहीं.

आणि अशा रीतीनें ' मातृदेवो भव, पितृदेवो भव ' असें वंदन केल्यावर त्यांनीं ज्याच्या नांवानें हा देश ओळखला जातो त्या भारताचें नामस्मरण केलें आणि ज्या कविकुलगुरू कालिदासानें हें नांव जींत अमर करून ठेवलें आहे ती अभिज्ञानशाकुंतल ही कलाकृति प्रथम चित्रित करण्याचा संकल्प केला. तसें करतांना त्यांनीं कविश्रेष्ठाच्या श्रेष्ठ भूमिकेचा विसर पडूं दिला नाहीं.

कालिदासानें आपल्या शकुंतलेसाठीं व्यासांच्या महाभारतांतून शकुंतलेच्या गोष्टीची निवड केली; शकुंतलेच्या चरित्राचा अनुवाद कालानुरूप केला. व्यासाची भूमिका आहे तशीच मान्य करून त्यानें आपल्या शकुंतलेची कथा सजविली नाहीं. आपणसुद्धां कालिदासाच्या पावलावर पाऊल टाकून त्याचें उदाहरण पुढें चालू ठेवून, ही कथा चित्रित करण्याबाबतची आपली पात्रता दाखवून दिली पाहिजे हें व्ही. शांतारामनीं अगदीं बरोबर हेरलें. त्यांनीं त्याप्रमाणें कार्याला सुरुवात केली.

त्यांनीं ठरविलें, कीं आजची शकुंतला ही आजच्या काळाला साजेशीच लढावू पाहिजे. स्त्री पुरुषजातीचा अन्याय इतःपर सहन करणार नाहीं; अत्यंत बिकट परिस्थितींतसुद्धां स्त्री कुणाच्या आधाराशिवाय, बाणेदारपणानें स्वतंत्र जीवन जगूं शकते; व्यक्तीचें कुलशील तिच्या कर्तृत्वाच्या आड येऊं शकत नाहीं; व्यक्ती जगते, कर्तृत्वान ठरते, ती स्वतःच्या पराक्रमानेंच, आईबापांच्या किंवा पूर्वजांच्या पराक्रमानें नव्हे, हा संदेश, आपण आपल्या ' शकुंतला ' बोलपटांतून दिला पाहिजे. हा आदर्श आपण जनतेपुढें ठेवला पाहिजे, ही स्वकर्तव्याची जाणीव ठेवूनच त्यांनीं ' शकुंतले 'ची निर्मिती केली. आणि वर्णश्रेष्ठत्वाच्या दिमाखानें मिरवणाऱ्या निष्क्रीय याचीबींना त्यांनीं अप्रत्यक्षरीत्या असेंच सुनविलें, कीं या देशाला ज्याचें नांव प्राप्त झालें आहे तो भरत कोण होता, त्याची आई कोण होती व त्या आईची आई कोण होती, याचा विचार करा !

व्ही. शांताराम यांच्या या ' शकुंतला बोलपटावर आमचे कांहीं अहंमन्य व शिष्ट टीकाकार कालिदासाचा कैवार घेऊन तुटून पडले. कलेपेक्षां कलावंत श्रेष्ठ आहे, असें दाखविण्याचें धाष्टर्य हा मनुष्य करतो म्हणजे काय ? कालिदासाचें ' शाकुंतल ' म्हणजे कलेची परिसीमा. त्यामध्यें आपल्याला पाहिजे ते फेरबदल करून त्या ' शाकुंतला ' ला प्रति-शाकुंतल आपल्या ' शकुंतले 'मध्यें निर्माण करतो, याचा अर्थ काय ? नाहीं, नाहीं, आम्ही हें सहन करणार नाहीं. हा कालिदासाच्या आत्म्याचा अपमान आहे !

अनुक्रमणिका

RAJHUNS FILM PRODUCTIONS

राजहंस फिल्म प्रॉडक्शन्स ही नवी चित्रसंस्था नव्या उमेदीनें चित्रित करीत आहे.

दिग्दर्शक जुन्नरकर यांची नवीन नयनरम्य कलाकृति

# नीरा और नंदा

(फक्त हिंदी भाषेत)

(PARADISE LOST)

पृथ्वीवरील नंदनवनाची निसर्ग रमणीय करुण कहाणी.

---

## कुरुक्षेत्राच्या रणांगणावर—

भगवान श्रीकृष्णानें अर्जुनाला दिलेला माणुसकीचा दिव्य संदेश —
त्या संदेशाच्या पार्श्वभूमीवरील तयार होत असलेलें—
युनिटी प्रॉडक्शनचें महान् चित्र—

# कुरुक्षेत्र

प्रोड्यूसर—दिग्दर्शक :—आर. शर्मा

भूमिका :—सैगल – नवाब – उदवाडिया – अजित –
विमन बानर्जी, कमलाकान्त, राधाराणी, श्यामली वगैरे—

युनिटी प्रॉडक्शन चित्र

(कलकत्ता.)








यांचा हा प्रयत्न म्हणून पाडलाच पाहिजे. आणि या आवेशानें त्यांनीं त्यांच्यावर हल्ला चढविला.

कालिदासाच्या भूमिकेचें या वेदाभ्यासजड विद्वानांनीं परिशीलन केलें असतें, जें प्राध्यापक अ. बा. गजेन्द्रगडकर यांच्यासारख्या मर्मज्ञ संस्कृत-पंडितानें केलें व ज्यांनीं व्ही. शांतारामना धन्यवाद दिले,—तर व्ही. शांतारामचा हा नवीन दृष्टिकोन त्यांना पटला असता व त्यांनीं प्रा० गजेन्द्रगडकरांप्रमाणेंच त्यांना धन्यवादच दिले असते.

परंतु व्ही. शांताराम यांचा खरा विश्वास आपल्या चहात्यांवर होता. वेदाभ्यासजड विद्वानांना जी गोष्ट पटली नाहीं, ती यांना पटेल, अशी त्यांना खात्री होती. हा त्यांचा आजचा अनुभव नव्हता, पूर्वीचाच अनुभव होता. आणि त्यांची अपेक्षा होती, तसेंच झालें. प्रेक्षकांनीं त्यांना दगा दिला नाहीं. कारण त्या प्रेक्षकांना माहित होतें कीं आमचा कलावंत, कलेपेक्षांही श्रेष्ठ आहे, त्याच्या हातून कनिष्ट प्रतीची गोष्ट घडणें शक्यच नाहीं. ते त्या अढळ विश्वासानें आले म्हणूनच शकुंतलेनें मुंबईत एकट्या स्वस्तिक टॉकीजमध्यें १०४ आठवडे चालण्याचा सोहाळा पाहिला.

त्यानंतर व्ही. शांतारामनीं सांवता माळ्यासारख्या खऱ्याखुऱ्या संतांचें, जनतेच्या संतांचें जीवनचरित्र चित्रित करण्याची जबाबदारी निर्मात्याच्या नात्यानें पत्करली. युद्धाचें होमकुंड त्यावेळीं पेटलें होतें. सर्वांनींच काम करण्याची त्यावेळीं आवश्यकता होती. जमिनीचा तुकडान् तुकडा कसण्याची मोहीम सरकारनें सुरू केली होती. पडिक जमीन त्या वेळीं नांगरली गेली नसती तर देशांतील लोक उपाशी मेले असते. तेव्हां नुसता टाळकुटेपणा करून कालापव्यय करणाऱ्या संतापेक्षां लोकांना श्रमजीवि होण्याची, जनसेवा हीच खरी प्रभुसेवा आहे, मनुष्यानें आपलें कर्तव्य करीत रहाणें यांतच परमेश्वराच्या भक्तीचें अधिष्ठान आहे, अशी शिकवण देणाऱ्या सावता माळ्याचें चरित्र व्ही. शांतारामनीं मुद्दाम चित्रित केलें. हा संत पंढरपुरापासून अवघ्या सहा कोसांवर रहात असतांनाही, आपल्या जमिनीची मशागत करण्याचें काम सोडून टाळकुटेपणा करीत पंढरपूरला गेला नाहीं. इतकेंच नव्हे तर जेव्हां दुष्ट लोकांनीं त्याचा मळा जाळून पोळून उजाड केला व तो हतबल होऊन बसला तेव्हां त्याला, श्रम करण्याच्या ब्रीदापासून न ढळण्याचा, आपलें कर्तव्य करीत रहाण्याचा आदेश त्याच्या मुलीच्या रूपानें प्रत्यक्ष परमेश्वरानें दिला, असें मोठें मार्मिक चित्र त्यांनीं या बोलपटांत निर्माता या नात्यानें रंगविलें आहे.

यानंतर त्यांनीं स्वतः दिग्दर्शिलेला 'पर्वत पे अपना डेरा' हा बोलपट. या बोलपटाच्या मागची त्यांची भूमिकासुद्धां टीकाकारांना समजली नाहीं. 'अत्युच्चपदीं थोरही बिघडतो, हा बोल आहे खरा!' हेंच त्यांना या बोलपटांत दाखवायचें होतें. त्या साधूचे हात स्वर्गाला लागायचे बाकी राहिले होते. इतक्यांत त्याच्या जीवनांत एक सुंदर पण आंधळी स्त्री आली. तिनें त्याला व्यवहारी जगांत आणलें. अध्यात्माकडे झुकलेल्या या साधूवर यंत्रप्रधान संस्कृतीचा प्रभाव पडून त्याचा अधःपात झाला!—ज्याला जीवन हें काय माहीत नव्हतें, स्त्री हें काय ठाऊक नव्हतें, त्याला त्या गोष्टींचा संपर्क घडतांच, तो स्वतःला सांवरूं शकला नाहीं, यांत विशेष असे कांहीं झालें नाहीं. जें कांहीं झालें तें स्वाभाविकच झालें. आणि तेंच त्यांनीं दाखविण्याचा प्रयत्न केला. ज्यांना त्याचा मतितार्थ समजला नाहीं, त्यांनीं व्ही शांतारामावर टीका केली.

या टीकाकारांची अशी मागणी होती, कीं आमचे संत, महंत, महर्षी, सिद्धपुरुष यांचा महिमा व्ही. शांतारामनीं गावयास पाहिजे होता. परंतु ज्यानें सांवता माळ्यासारख्या पंढरपूरच्या पांडुरंगाच्या दर्शनाला आजन्मांत न जाणाऱ्या व प्रत्यक्ष पांडुरंगाला व इतर तत्कालिन संतांना आपल्या भेटीला येण्यास भाग पाडणाऱ्या संताचें चरित्र रंगविलें तो एखाद्या मुमुक्षुचें जीवनचरित्र रंगवून जनतेला प्रज्ञाहत करण्याचा प्रमाद जाणूनबुजून करील कसा? तेव्हां 'पर्वत पे अपना डेरा' यामध्यें व्ही शांतारामनीं जें कांहीं दाखविलें तें अगदीं बरोबर होतें. त्यांत त्यांनीं अराष्ट्रीयपणाचें कृत्य केलें नाहीं असेंच सुज्ञ म्हणणार!

अशा उच्च भूमिकेवरून कलाकृतींची निर्मिती करणाऱ्या व्ही. शांताराम यांच्यासारख्या कलावंताचें लक्ष डॉ. कोटणीससारख्या हिंदमातेच्या सुपुत्राच्या थोर कर्तृत्वाकडे वळावें, हें स्वाभाविक होय. डॉ. कोटणीस यांचें चरित्रच असें आहे, कीं ज्याच्यापासून कुणालाही स्फूर्ति मिळावी. परतंत्र देशांत जन्मलेला हा तरुण आपलें जीवन सार्थकी लावण्यासाठीं, आपल्या देशाच्या संस्कृतीशीं ज्यांची संस्कृति मिळती जुळती आहे व आपल्या देशाप्रमाणें ज्यांचा देश परकियांच्या टांचाखालीं भरडून निघतो आहे, अशा चीनच्या पददलित जनतेला मदत करण्यासाठीं धांवून गेला. आणि जरी शेवटीं त्याचें देशबांधव, चीनचें हवामान न मानवल्यामुळें नाखुषीनें परत आले तरी हा निराश न होता, धीर खचूं न देतां तेथेंच राहिला. आणि अत्यंत बिकट परिस्थितीला तोंड देत देत, हालापेष्टांची तमा न बाळगतां, त्यानें आपल्या बहुमोल प्राणांचें बलिदान केलें.

डॉ. कोटणीसचें हें अमर चरित्र, केवळ हिंदुस्थानलाच नव्हे तर अखिल जगाला सादर करण्यासाठीं व्ही. शांतारामनीं सदरहू बोलपट हिंदी-इंग्रजी अशा दोन भाषांतन

तयार केला आहे. तो तयार करावयास त्यांना एक वर्ष लागलें. त्यांना एक अडचण खास करून जाणवली. पौराणिक किंवा ऐतिहासिक बोलपटांत जी कलाटणी आपल्याला देतां येणें शक्य असते, तशी कोणत्याही प्रकारची हातचलाखी या अशा प्रकारच्या आधुनिक चरित्रात्मक बोलपटांतून करतां येत नाहीं. त्यांतील प्रत्येक घटनेचें अधिकृत स्वरूप कायम राखावें लागतें व त्याकरितां होईल तो खर्च सोसावा लागतो. ही सर्व खबरदारी त्यांनीं या बोलपटाच्या बाबतींत घेतली आहे. अशा प्रकारचें आधुनिक हिंदी राष्ट्रीय नायकाचें चरित्र रुपेरी पडद्यावर सादर करणारा हा पहिला हिंदी बोलपट आहे.

या बोलपटांत आणखी कोणत्याही प्रकारचें वैगुण्य राहूं नये म्हणून स्वतः व्ही. शांतारामनीं आपली कलावंत पत्नी जयश्री व कन्या राजश्री यांच्या समवेत भूमिका केल्या आहेत. यांमधील त्यांची भूमिका खुद्द डॉ. कोटणीसांची असून जयश्रींनीं डॉ. कोटणीसच्या चिनी पत्नीची भूमिका केली आहे. जयश्रींची ही भूमिका 'शकुंतला' बोलपटांतील भूमिकेपेक्षां अगदीं वेगळ्या धर्तीची आहे. चिनी स्त्रीच्या भूमिकेंत-सुद्धां त्या किती सुंदर दिसतात, व त्यांनीं ती भूमिका किती आत्मीयतेनें वठविली आहे याची कल्पना प्रत्यक्ष बोलपट पाहिल्या-शिवाय वाचकांना येणार नाहीं. यापूर्वी व्ही. शांतारामनीं चित्रपटांतून काम केलें असलें तरी ती गोष्ट विस्मृतीच्या पडद्याआड गेली आहे. परंतु या बोलपटांतील त्यांची डॉ. कोटणीसची भूमिका अशी आहे, कीं आतां एक कुशल नट म्हणूनसुद्धां व्ही. शांता-रामांचा विसर कुणाला पडणार नाहीं. या बोलपटांत ज्या अर्थी त्यांनीं सहकुटुंब सह-परिवार काम केलें आहे त्या अर्थी डॉ. कोट-णीसच्या या कथेकडे ते किती आत्मीयतेनें व अभिमानानें पहात असले पाहिजेत याची कल्पना येते. हिंदुस्थानसारख्या परतंत्र देशांत-सुद्धां जेथें लोकमान्य टिळक, महात्मा गांधी पं. जवाहरलाल नेहरू, डॉ. रवीन्द्र-नाथ टागोर, सर जगदीशचंद्र बोस यांच्यासारखे भारतमातेचे श्रेष्ठ पुरुष जन्मास येतात व आपल्या अतुल कर्तृत्वानें अमर होतात तेथेंच डॉ. कोटणीससारखे आपल्याच देशाच्या केवळ नव्हे तर दुसऱ्या देशांच्या स्वातंत्र्याची किंमत ओळखणारे व त्यासाठीं आत्मसमर्पण करणारे नरपुरूष जन्माला येतात, आणि हें महाराष्ट्रभूचें खास करून वैशिष्ट्य आहे, हेंच या बोलपटांत त्यांना दाख-वून द्यावयाचें आहे. व्ही. शांतारामसारखा कलावंत हा त्यांच्या कलेपेक्षां श्रेष्ठ आहे, हें या बोलपटांत ते दाखवून देतील, अशी मला खात्री वाटते.

---









नूतन वर्ष शुभ चिंतन

**हरिभाऊ विश्वनाथ कंपनी**

हेड ऑफिस, दादर, मुंबई नं. १४,
टेलीफोन नं. 60812

★



आमचे नाविन्य
"हरि-टोन"
( रजिस्टर्ड )
**रेडिओ स्टॉइल हार्मोनियम***

★

**देशी व विदेशी तंतु वाद्यांचे कारखानदार**

कलापूर्ण बनावट, माफक किंमत

**हरि-टोन " व्हायोलीन "**

**: ब्रँच ऑफीस :**
नं. १ सॅन्डहर्स्ट रोड, मुंबई नं. ४
नं. २ गांधी रोड, अहमदाबाद.

---

दिवाळीच्या शुभमुहुर्तावर....

प्रधान पिक्चर्सचे उत्कृष्ट चित्र




## प्रभात टॉकीज, वसई

( सर्व प्रकारच्या आधुनिक सुखसोईनें युक्त असे बोलपट गृह )

**नूतन दिवाळी आमच्या ग्राहकानां आनंदाची, सुखाची आणि समृद्धीची जावो !**

चालक:—**नामदेवराव**
उर्फ
मामा मोहोळ
पोस्ट वसई **जि. ठाणें**

---

# पुस्तकें

- **कादंबऱ्या**
- **नाटकें**
- **ललीतवाङ्मय**
- **धार्मिक ग्रंथ वगैरे**

**आणि**

*

शालोपयोगी व कॉलेजला लागणारी सर्व प्रकारची
पुस्तकें मिळण्याचें एकमेव ठिकाण

## लाखाणी बुक डेपो

रामचंद्र बिल्डींग गिरगांव, मुंबई ४

**नूतन दिवाळी आमच्या ग्राहकांना आनंदाची, सुखाची आणि समृद्धीची जावो !**

---

# दृष्टीचें महत्त्व !

**अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हणजे दृष्टी. दृष्टी नेहमीं चांगली ठेवण्यासाठीं—**




## वा-प-रा

---

**जालीम जंतुनाशक ' डोंगर छाप ' शुद्ध निलगीरी तेल**



अभिष्ट चिंतन
कारागे आर्ट स्टुडिओ
मुंबई ४
















मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास





वि. ग. देशपांडे

# चले जाव — चलो दिल्ली

## चले जाव ते चलो दिल्ली—

"....देशोंकी शक्ति वकालतसे नहीं, कुश्ती लड़नेसे बढ़ती है। आपकी कमर और पैर कभी नहीं झुकना चाहिए !...." भारत छोड़ो " प्रस्तावसे अब हम हट नहीं सकते ! कॉंग्रेसके सदस्य बनिये, गांवगांवमें स्वयंसेवक बनाइये, चुनावमें कॉंग्रेसकों जिताकर अगले कदमके लिए तैयार हो जाइये। चुनाव कोई बड़ी चीज नहीं है। असेंब्लियोंमें बैठनेसे कमाल नहीं हो जायगा। पर इससे फायदा यह होगा कि इस तरह हम कॉंग्रेसका पैगाम घर घर पहुँचा सकेंगे। महज कुर्सियोंपर बैठनेसे कुछ नहीं होगा। यदि बैठनाही है तो हमें शीघ्रही दिल्लीकी बड़ी कुर्सियोंपर बैठना है। हम दिल्लीके किलेमें हमेशाके राज्य करना चाहते हैं। हमारा आजका मंत्र है—जय हिंद और चलो दिल्ली !....

—पं. जवाहरलाल नेहरू

## एक क्रान्तिकारी युग—

'१९४२ ते १९४५ ! या तीन वर्षांत एक महान् क्रांतिकारी युग सामावलें आहे' असें यथार्थ वर्णन कॉंग्रेसचे अध्यक्ष मौ. आझाद यांनीं केलें आहे. दीपावलीस भारतीयांचें नवें वर्ष सुरू होतें. त्या निमित्तानें मागील वर्षाचा आढावा घेण्याची पद्धत असतें. कॉंग्रेसनें—राष्ट्रसभेनें—गेल्या तीन वर्षांत किती प्रगति केली आहे व ती कुठें चालली आहे याची थोडक्यांत कल्पना यावी म्हणून पं. जवाहरलालजींनीं संयुक्त प्रांतांतील सातारा म्हणून गाजलेल्या बलिया-येथें ता. १३ ऑक्टोबर १९४५ रोजीं केलेल्या भाषणांतील उद्गार वर दिले आहेत.

## संस्मरणीय : ठराव व धरपकड

८ ऑगस्ट १९४२ रोजीं, जवळ जवळ जवळ मध्यरात्रीं, मुंबईंत अ. भा. कॉंग्रेस कमिटीनें 'चले जाव' ठराव पास करून, गेल्या बावीस वर्षांत संपादन केलेल्या शांततामय सामर्थ्याचा उपयोग करून, महात्माजींच्या नेतृत्वाखालीं राष्ट्रव्यापी सामुदायिक लढा लढविण्याचा निश्चय जाहीर केला. या देशांतील ब्रिटिश सत्तेचा अंत तावडतोब होण्यावरच युद्धाचें भवितव्य आणि स्वातंत्र्य व लोकशाही यांचा जय अवलंबून आहे, कॉंग्रेसला स्वत:साठीं सत्ता नको आहे, भारतीय जनतेसाठीं कॉंग्रेसची सत्तेची मागणी आहे असें त्या संस्मरणीय ठरावांत म्हटलें होतें.

पण ठराव पास होऊन पांच सहा तास होण्याआधींच, कॉंग्रेसचे सेनापती गांधीजी, वर्किंग कमिचे सर्व सभासद, मुंबईंत जमलेले अ. भा. कॉंग्रेस कमिटीचे सर्व सभासद आणि हिमालयापासून कन्याकुमारी पर्यंत पसरलेले कॉंग्रेसचे लहानथोर कार्यकर्ते यांच्यावर ब्रिटिश सरकारचे हस्तक असलेल्या हिंदुस्थान सरकारनें एक समयावच्छेदें झडप घातली ! सभाबंदी, मिरवणुकबंदी, वृत्त प्रकाशन बंदी—बंदी राज्याचा अंमल सुरू झाला आणि तोहि भारत संरक्षणाच्या नांवावर !

## केसरीय अत्याचार व लोकयुद्ध

युद्धकार्यांत हिंदुस्थानाला भाग घेतां यावा व दोस्त राष्ट्रांना नैतिक व भौतिक मदत करतां यावी म्हणून हिंदुस्थानचें स्वातंत्र्य जाहीर करावें, व हिंदुस्थानचें स्वातंत्र्य म्हणजे ब्रिटिश सत्तेच्या गुलामींत खितपत असलेल्या सर्व वासाहतिक राष्ट्रांच्या स्वातंत्र्याची सुरवात व्हावी अशी हिंदुस्थानची राष्ट्रीय मागणी उच्चस्वरानें मांडणाऱ्या स्वातंत्र्यनिष्ठ राष्ट्रसभेवर साम्राज्यनिष्ठ सरकारनें हा 'केसरीय अत्याचार" केला—कॉंग्रेसविरुद्ध युद्ध पुकारलें ! या अभावित अत्याचारानें चाळीस कोटी भारतीय जनता स्तंभित व क्षुब्ध झाली आणि सरकारी दडपशाहीला हातीं असलेल्या सर्व साधनांनीं प्रतिकार करूं लागली !

१८५७ च्या बंडानंतर इतकें मोठें, व्यापक, व सर्वस्पर्शी व स्वयंस्फूर्त बंड हिंदुस्थानांत मुळींच झालें नव्हतें !

१९४२ च्या डिसेंबर अखेरपर्यंत ६०२२९ लोकांना अटक करण्यांत आली, भारत संरक्षण नियमाखालीं १८००० लोकांना स्थानबद्ध करण्यांत आलें, पोलिस व लष्कर यांच्या गोळीबारांत ९४० लोक ठार झाले, व १६३० लोक जायबंदी झाले अशी माहिती गृहमंत्री सर रेजिनाल्ड मॅक्वेल यानीं मध्य असेंब्लींत सांगितली.

## बंड ओसरलें; परिस्थिति चिघळली

—आणि या क्रांतिकारक महिन्यांतच कम्युनिस्टांनीं लोकयुद्धाचें थोतांड उभें केलें

अनुक्रमणिका

# शालीमार पिक्चर्स
बेहतर मनोरंजन के अग्रदूत

रजपूत कालीन
अमर प्रेमकथा

★

## पृथ्वीराज संयुक्ता

— दिग्दर्शक —
नजम नकवी
— निर्माते —
डब्ल्यू. झेड्. अहमद

: भूमिका :
"एक रात" ची अपूर्व जोडी
- नीना, पृथ्वीराज
- तिवारी, भरत व्यास
- बीबीबाई
- रामावतार
- प्रेम, व इतर कलावंत

पराधीन सपनेहु सुख नाहीं!
— तुलसीदास

## गुलामी

आज़ादी के दिवानों की
अमर कहानी

रेणुका देवी, परवेज़

प्रदर्शन के लिये तैयार

भक्तीप्रेमासाठीं वेडी
झालेल्या मीराबाईची
भक्तीरसपूर्ण कथा

## मीराबाई

— दिग्दर्शक व निर्माते —
डब्ल्यू. झेड. अहमद

— भूमिका —
रहस्यमयी नीना
- भरत भूषण
- परवीज, मुमताज,
- तिवारी, बीना, श्याम

व इतर कलावंत

## श्री कृष्ण भगवान

अनेक युगें ज्याची आठवण होईल असा अमर बोलपट
दिग्दर्शकः—डब्ल्यू. झेड्. अहमद
भूमिका:—नीना, भरत भूषण, बीना, प्रेमलता, शांता, परवीन, तिवारी,
भरत व्यास, दार काश्मीरी आणि इतर हजारों









होतें. कापडाची व अन्नाची महागाई भरमसाट वाढूं लागली होती ! सरकारनें कॉंग्रेसश्रेष्ठींना अटक करून कोठें नेलें आहे याचाहि पत्ता लोकांना लागूं दिलेला नव्हता; कोणी म्हणत त्यांना पुण्याजवळीक ठेवलें आहे, कोणी म्हणत, अहमदनगरच्या किल्ल्यांत ते आहेत; सर्व पुढाऱ्यांना दक्षिण आफ्रिकेकडे नेण्यांत आलें आहे अशीहि वदंता होती. त्यांचे भयंकर हाल करण्यांत येत आहेत अशाहि अफवा होत्या. लोक या अफवांवर सहज विश्वास ठेवीत; १९४२ अखेरपर्यंत या खुल्या बंडचा जोर ओसरत चालला होता.

### महात्माजींचा उपवास—

१० फेब्रुवारी १९४३ रोजीं गांधीजी तीन आठवडे उपवास करणार असल्याचें पत्रक सरकारनें प्रसिद्ध केलें आणि त्याबरोबरच गांधीनीं १४ ऑगस्ट ४२ ला लॉर्ड लिनलिथगो यांना लिहिलेलें पत्र २२ ऑगस्टला व्हाइसरॉयानीं त्या पत्रास पाठविलेलें उत्तर व २३ सप्टेंबर १९४२ रोजीं गांधीनीं हिंदुस्थान सरकारच्या होम डिपार्टमेंटला लिहिलेलें पत्र इत्यादि पत्रव्यवहार प्रसिद्ध केला. क्षुब्ध व पीडित भारतीय जनता या बातमीनें अधिकच भीतिग्रस्त झाली !

### उपवास कशासाठीं ?

गांधीजी व व्हाइसरॉय यांच्या प्रसिद्ध झालेल्या पत्रव्यवहारावरून दोन गोष्टी स्पष्ट झाल्या. सरकारचें म्हणणें:—गांधीजीनीं नऊ ऑगस्टचा ठराव व धोरण सोडावें व भविष्यकाळांत चांगल्या वर्तणुकीची हमी द्यावी. गांधीजींचें म्हणणें: माझें धोरण व म्हणणें चूक आहे याबद्दल खात्री पटवावी; कॉंग्रेसच्या वतीनें मी कांहीं सुचवावें अशी सरकारची इच्छा असेल तर मला कॉंग्रेस वर्किंग कमिटीच्या सभासदांशीं चर्चा करूं द्यावी. केवळ सरकारनें प्रसिद्ध करूं दिलेल्या बातम्यांवर विश्वासून कोणाचाहि मी धिक्कार करणार नाहीं. यावर व्हाइसरॉयनीं धमकी दिली कीं "कॉंग्रेसवरील आरोपांचा जाब तुम्हाला, व तुमच्या सहकाऱ्यांना द्यावा लागेलच लागेल. तोपर्यंत उपवास वगैरे सोपी पळवाट काढून निसटूं पहाल तर जागतिक लोकमताचा कौल तुमच्या अनुपस्थितीत तुमच्या विरुद्धच लागेल !" यावर गांधीनीं लिहिलें, "सरकारनें केसरीय अत्याचार करून जनतेचें माथें भडकविलें. दडपशाहीबरोबरच दरटंचाई, अन्नटंचाई, महागाई थैमान घालीत आहेत. उपवास हाच एकमेव उपाय उरला आहे."

आणि अशा रीतीनें ता. १० फेब्रुवारी रोजीं गांधीजींचें एकवीस दिवसांचें दिव्य सुरू झालें.

### पुढारी परिषदेची मागणी

१९ फेब्रुवारी रोजीं नव्या दिल्लींत, सर तेजबहादुर सप्रू यांच्या अध्यक्षतेखालीं अखिल भारतीय पुढारी परिषद भरली. गांधीजींची बिनशर्त सुटका करावी अशी मागणी करणारा ठराव डॉ. मुकुंदराव जयकर यानीं मांडला. तो सर्वानुमतें पास झाला. सरकारनें या ठरावाला वाटाण्याच्या अक्षता लावल्या ! जनतेची काळजी वाढतच होती. अफवांचा सुकाळ झाला होता. २१ फेब्रुवारीस सर तेजबहादुर यांनीं एका मुलाखतींत, "चमत्कार घडला तरच गांधीजी वांचतील. त्यांच्या निर्याणाच्या शोकजनक घटनेसहि आपण तयार असलें पाहिजे" असें सांगितलें. चाळीस कोटी लोकांच्या तोंडचें पाणी पळाल्यागत झालें.

### उपवास समाप्ति व नंतर

अखेर ३ मार्च रोजीं गांधीजींचा उपवास संपला. चिंताग्रस्त राष्ट्रानें समाधानाचा सुस्कारा सोडला. आपलें व कॉंग्रेसचें गाऱ्हाणें वेशीवर टांगणें—आपल्या सरकारनें रचलेल्या जिवंत समाधीकडे जगाचें लक्ष वेधणें हा या उपवासाचा हेतु होता. तो सफळ झाला. कॉंग्रेसेतर देशांतील अत्याचारांची जबाबदारी नाहीं हे उघडकीस आलें. सरकारनें याच वेळीं "दंगलीबद्दलची जबाबदारी" हें चोपडें प्रसिद्ध केलें !

### न्यायाबरोबर कायद्याचाहि बळी !

एप्रिल महिन्यांतच फेडरल कोर्टानें भारत संरक्षण-कायद्याचा २६ वा नियम (कीं ज्या अन्वयें गांधीजींना व इतर कॉंग्रेस पुढाऱ्यांना अटक झाली होती) हा बेकायदा ठरविला ! यावर सरकारनें कॉंग्रेस पुढाऱ्यांची अटक बेकायदा आहे हें कबूल करून तावडतोब त्यांची सुटका करावयास हवी होती; पण व्हाइसरॉयनीं बेकायदेशीरपणा कायदेशीर करण्यासाठीं एक नवा वटहुकुमच काढला !

### जिनांची घमेंड जिरली

एप्रिल महिन्यांत लीगच्या वार्षिक अधिवेशनांत जिनांनीं नेहमींच्या घमेंडखोर भाषेत म्हटलें होतें, "अजूनहि गांधीजी मुस्लीम लीगशीं तडजोड करण्याबद्दल मला लिहितील तर त्यांना अडविण्याची हिंमत कोणाला आहे ? व्हाइसरॉयकडे जाण्यांत काय अर्थ आहे ? त्यांनीं मला पत्र पाठविलें तर तें माझ्याहातीं न देण्याचें धाडस व्हाइसरॉयांना होईल असें मला वाटत नाहीं !" पण सरकारनें गांधीनीं लिहिलेलें पत्र जिनांना देणार नाहीं असें २६ मे १९४३ रोजीं जाहीर करतांच जिनांची भंबेरी उडाली !

### दिवस लोटले: निशा वाढली

१९४३ चा उत्तरार्ध भर कॉंग्रेसेतर पक्षीयांकडून सरकारी धोरणाचा धिक्कार, पेंचप्रसंग सोडविण्याच्या याचना सरकारकडून नेहमीं प्रमाणें त्या विनंत्यांचा अव्हेर, कायदेमंडळांत व पार्लमेंटांत वादविवाद, अमेरीची नकारघंटा हे प्रकार चालूच होते. बंगालमधील मानवकृत दुष्काळाचें भीषण स्वरूप, सरकारची अमर्याद बेपर्वाई, लाखों लोकांचें अन्नान्न करीत मरण हेहि प्रकार चालूच होते. जातीय संस्था मृतवत् होऊन पडलेल्या होत्या. फक्त कम्युनिस्टपक्षच आलेल्या परिस्थितीचा उपयोग पक्षसंघटनेसाठीं, लोकलढ्याविरुद्ध, नफेबाजी व दुष्काळ यांच्या विरुद्ध जास्तींत जास्त कागदी प्रचार करीत होता. बंधमुक्त कॉंग्रेसजन कांहीं हताश, कांहीं दिङ्मूढ, बरेचसे कृतिशून्य अवस्थेत होते.

### कस्तुरबा गांधींचें निधन

अशाच प्रकारें दिवसामागून दिवस गेले, १९४४ साल उजाडलें, जानेवारींत महात्माजींच्या सहधर्मिणी सौ. कस्तुरबा आजारी अस-




आमच्या आश्रयदात्यांना दिवाळी व नूतन वर्ष
सुखकारक जावो.

★

मुरली मुव्हिटोन

( 'प्यास' कर्ते )

★



रामायणांतील एक अत्यंत हृदयंगम प्रसंग....

मातृ-पितृ प्रेमाचा आदर्श भावनामय स्वरूप रुपेरी पडद्यावर येत आहे—

मुरली मुव्हिटोनचें भव्य व रुबाबदार पौराणिक चित्र

# श्रवण कुमार

मुमताझ शांति-चंद्रमोहन

पहाडी संन्याल-के. सी. डे-मेनका-गुलाब-ताराबाई-राजरानी-मज्जिद-मोरे-यशवंत दवे आणि गोप

कथा : के. एस. दर्यानी ★ दिग्दर्शक : राम दर्यानी

चित्रलेखन : गोवर्धनभाई पटेल दिग्दर्शक : चंद्रशेखर त्रिवेदी

कला : वाहक : : संगीत भुलोसी राणी : नृत्यें : के. एस. मोरे : संवाद व गीतें : वल्लीसाहेब

मुरली मुव्हिटोन—दादर—मुंबई

अनुक्रमणिका

त्यांची बातमी सरकारनें प्रसिद्ध केली! २२ फेब्रुवारी रोजीं—महाशिवरात्रीच्या सायंकाळीं कस्तुरबांच्या पुण्यमय जीवनाची समाप्ति झाल्याची बातमी सरकारनें जाहीर केली! कस्तुरबांच्या स्मारकासाठीं एक कोटी रुपये जमविण्याचा संकल्प राष्ट्रानें सोडला. आगामी रचनात्मक युगप्रवृत्तीचा हा एक सूचक संकल्प होता.

### मलेरियानें गांधींना सोडविलें

सौ. कस्तुरबांचा मृत्यु म्हणजे जनतेच्या निराशेची परमावधि होती. याहि अवस्थेंत दोनअडीच महिने गेले आणि गांधींच्या आजाराची बातमी येऊन थडकली! ६ मे १९४४ रोजीं गांधींना "आजारीपणा"-बद्दल आगाखान पॅलेसमधून विनशर्त सोडण्यांत आलें!

### गांधींच्या नव्या घोषणा

आजारपणांतून बरें झाल्यानंतर गांधीजींनीं आठ ऑगस्ट १९४२ चा ठराव, त्यांतील कार्यात्मक भाग वगळून कायमच आहे व राहील असें जाहीर केलें. त्यांनीं 'न्यूज क्रॉनिकल' च्या प्रतिनिधीला—मि. गेल्डर यांना—दिलेल्या मुलाखतीनें देशांत पुनः एकदां खळबळ उडाली.

### गांधी जिना वाटाघाटी

आणि पुनः एकदां आठ ऑगस्ट येऊन थडकली. १९४५ म्हणजे १९४२ नव्हे याची जाणीव देऊन गांधीनीं फक्त मुंबईतच ८ ऑगस्ट रोजीं एक उपलक्षणात्मक निदर्शन होईल असें जाहीर केलें.

### गांधी—जिना वाटाघाटी

सप्टेंबर १९४४ मध्यें गांधीजींनीं राजाजी योजनेच्या आधारावर बॅ. जिनांशीं वाटाघाटी सुरू केल्या. या वाटाघाटी निष्फळ ठराव्यात असेंच तुरुंगांतील बहुसंख्य काँग्रेसजनांचें मत होतें या वाटाघाटीमुळें जिनांचा भाव अकारण वधारेल अशी धास्ती त्यांना होती व १९४४ च्या दसऱ्या दिवशीं वाटाघाटी फिसकटल्याची बातमी येरवडा तुरुंगांत कळतांच "बरें झालें—देशाच्या फाळणीला गांधीजीनीं संमती दिली नाहीं यावद्दल ईश्वराला धन्यवाद!" असाच विचार त्या दिवशीं तुरुंगांतील राजबंद्यांच्या मनांत वावरत होता.

### १९४५—मुक्ततेचें पर्व

गांधीजिना वाटाघाटी फिसकटल्यामुळें देशांत पुनः एकवार निराशाच पसरली हें कांहीं खोटें नव्हे. अशा वातावरणांतच १९४५ साल उजाडलें-पुनः एकदां २६ जानेवारीचा स्वातंत्र्यदिन-बंधनांत साजरा झाला. २३ मार्च रोजीं व्हाइसरॉय लॉर्ड वेव्हेल विमानांतून लंडनला गेले, आतां व्हाइसरॉय काय आणणार ? या निराशेंतील आशेवरच दोन महिने निघून गेले. १४ जूनला लॉर्ड वेव्हेल हिंदुस्थानांत परतले व त्यांनीं ब्रिटिश सरकारचें हिंदुस्थानविषयक धोरण जाहीर केलें. काँग्रेस वर्किंग कमिटीच्या सभासदांची सुटका तावडतोब केली जाईल या त्यांच्या घोषणेनें झालेल्या आनंदाच्या भरांत संकल्पित सिमला परिषदेच्या फसवेगीरीकडे फारच थोड्यांचें लक्ष गेलें!

### बंडखोरांशीं निष्फळ बोलणीं!

"उघड बंडा"चे नेते जोंवर बंडाचा धिक्कार करणार नाहींत, भावीकाळाबद्दल हमी देणार नाहींत तोंवर त्यांची मुक्तता मुळींच होणार नाहीं असें म्हणणारें सरकार सुतासारखें सरळ आलें व बंडाच्या प्रमुखांना मुक्त करून, त्यांना सिमल्यास जातां यावें म्हणून मोटारी, आगगाड्या, विमानें यांची खास तरतूद करूं लागलें! इकडे आशानिराशेंत अखेर सिमला परिषदेचा जिनांनीं बोजवारा उडविला! १४ जुलै रोजीं व्हाइसरॉयांनीं "विसरा व क्षमा करा" असें म्हणून परिषद अपेशी झाल्याची जबाबदारी स्वतःच्या शिरावर घेतली!

### आशेचे वातवारण

सिमला परिषद फिसकटल्यामुळें लोकांची कांहीं दिवस निराशा झाली. पण काँग्रेस वर्किंग कमिटीच्या सभासदांनीं देशभर दौरे व भाषणें करून ही निराशा घालविली. १९४२ सालीं जनतेनें केलेल्या स्वयंस्फूर्त उठावाबद्दल जनतेला धन्यवाद दिले. १९४२ ऑगस्ट नंतर तीन वर्षें दबलेलें लोकहृदय पुनश्च आनंदानें फुलूं लागलें. ब्रिटनमधील निवडणुकींत चर्चिलपक्षाचा पूर्ण पाडाव होऊन मजूरपक्ष अभूतपूर्व, अनपेक्षित आणि निःसंदिग्ध बहुसंख्येनें निवडून आल्यानें आशेला अंकुर फुटूं लागले. ठिकठिकाणीं काँग्रेसवरील निर्बंध उठविण्यांत आले. पुनः एकदां जनता काँग्रेसच्याच मागें आहे हें उघडपणें सिद्ध होऊं लागलें. गेल्या दोन महिन्यांतील घटना इतक्या ताज्या आहेत कीं त्यांचा सविस्तर उल्लेख करण्याची जरूरी नाहीं!

### चले जाव ते चलो दिल्ली

—"चले जाव ठराव मागें घेणार नाहीं. तो योग्य वेळीं आम्ही अंमलांत आणणारच! त्याचें स्वरूप आतां विशाल होणार हिंदुस्थानांतून चालते व्हा' या घोषणेबरोबर, 'आशियांतून चालते व्हा" ही आमची घोषणा आहे!"







अनुक्रमणिका








" आतां मुस्लिम लीगशीं वाटाघाटी अशक्य आहेत. स्वतंत्र भारतच स्वतंत्र भारताचें भवितव्य ठरवील ! "

" आझाद हिंद फौज ही जपानी हस्तकांची फौज नव्हती, स्वातंत्र्यासाठीं ते लढले ते आमचे आहेत त्यांना शिक्षा होतां कामा नये." "१९४२प्रमाणें सरकार जनतेवर पुनः कधीं हिंस्र अत्याचार करूं पाहील तर आम्ही बेसावध राहणार नाहीं. आम्ही अधिक हुषारीनें वागूं !"

" जे अज्ञातवासी कार्यकर्ते आहेत त्यांची मुक्तता आतां स्वतंत्र भारतच करील. किंवा उदित होत असलेलें स्वातंत्र्याचें तेज याच सरकारला त्यांच्यावरील निर्बंध मागें घेण्यास भाग पाडील ! "

—" मध्यवर्ती व प्रांतिक कायदेमंडळांच्या निवडणुकी " चले जाव " व " स्वातंत्र्य " या मुद्यांवर लढविणार ! काँग्रेसच्या सर्वोदयवादी राष्ट्रदालाच बहुसंख्य हिंदुमुस्लिम व अन्यधर्मीय जनतेचा पाठिंबा आहे. निवडणुकी जिंकून आम्ही घटना परिषदेंत हेंच सिद्ध करणार ! "

—" या निवडणुकी, या परतंत्र भारतांतील शेवटच्याच निवडणुकी व्हाव्यात असा प्रयत्न आम्ही करणार ! "

—" आमचें आजचें सूत्र " जय हिन्द " व " चलो दिल्ली " हेंच आहे.

बहुसंख्य काँग्रेसजनांच्या व पुढाऱ्यांच्या मनांतील आशा, विचार व स्वप्नें वरील उद्गारांत आढळतील.

त्यांतील किती खरी ठरणार ? भवितव्यताच याचें उत्तर देऊं दे !

---





अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

—प्रभाकर पाध्ये

# त्याची तिसरी बायको—

तरुण वयांत दुःखाचा आघात झाला तर माणूस अबोल बनतो आणि म्हातारपणीं याच्या बरोबर विरुद्ध परिणाम होतो कीं काय नकळे, पण दौलतराव साळुंख्यांच्या बाबतींत असा अनुभव आला होता खरा. त्यांची पहिली पत्नी, त्यांच्या वयाच्या तेहतिसाव्या वर्षी वारली, तेव्हां साधारणपणें खेळकर बोलक्या वृत्तीचे म्हणून स्नेह्यासोबत्यांस माहित असलेले दौलतराव एकदम गंभीर आणि अबोल बनले आणि परवां, तेरा दिवसांपूर्वी, त्यांची तिसरी तरुण सुंदर पत्नी निवर्तली तेव्हां त्यांच्या मनावर कांहीं तरी गूढ परिणाम झाला व त्या वेळेपासून ते पुनः पूर्वीसारखे बोलके बनले !

दौलतराव बोलके बनले एवढेंच नव्हे, तर समाचारास येणाऱ्याजाणाऱ्यापाशीं ते आपल्या तरुण बायकोचें गुणसंकीर्तन करूं लागले. लोकांना याचें आश्चर्य वाटूं लागलें. पहिल्या पत्नीच्या मृत्यूनंतर पारखी झालेली दौलतरावांची बोलकी वृत्ति ही तिसरी तरुण, सुंदर आणि शिकलीसवरलेली बायको वारल्याबरोबर परत कशी आली याचें त्यांना कोडें पडलें.

पण हीच गोष्ट कशाला, दौलतरावांचें हें तिसरें लग्न, त्यांची तरुण सुंदर पत्नी आणि त्यांचा सुखासमाधानांत आणि आनंदांत चाललेला तिसरा संसार हेंच मुळीं लोकांना एक कोडें होतें.

दौलतरावांपाशीं संपत्ति होती, खानदानी घराण्याची प्रतिष्ठा होती, शेतांत नांगराच्या सात जोड्या फिरत होत्या, दारांत दोन गाड्या सुटत होत्या, गोठ्यांत दहापंधरा दुभतीं जनावरें होतीं, तिजोरींत दागदागिने होते व गांवांत थोडी सावकारीहि होती—

तरी देखील बडोद्यासारख्या शहरांत राहिलेली, चारपांच यत्ता इंग्रजी शिकलेली तरुण सुस्वरूप मंजुळा, कोसवलीसारख्या खेड्यांत येऊन त्रेसष्ट वर्षांच्या दौलतरावांची तिसरेपणाची बाईल होईल हें लोकांना जरा चमत्कारिकच वाटत होतें. बडोद्याच्या एखाद्या सुशिक्षित, श्रीमंत घराण्यांत पडणें मंजुळेला कांहीं अगदींच अशक्य नव्हतें.

दौलतरावांचा आणि मंजुळेच्या वडिलांचा कांहीं देण्याघेण्याचा संबंध होता अशी पंचक्रोशींत वदंता होती. गांवांतलीं टारगट पोरें आणि निरेकल जिभा या वस्तुस्थितीशीं मंजुळेच्या लग्नाचा संबंध जोडीत होत्या. पण दौलतरावांच्या सुस्वभावी, उदार आणि परोपकारी वर्तणुकीमुळें गांवांत या गोष्टीस कुटाळकीचें राजरोस स्वरूप कधींच प्राप्त झालें नाहीं. चहाटळ जिभा एखाद वेळेस मनांत येईल तें बकत, पण सर्वसाधारण लोक 'दैवाची करणी आणि नारळांत पाणी' या पुराण्या म्हणीचा आधार घेऊन एकमेकांचें व स्वतःचें शंकासमाधान करीत.

आणि या चहाटळ जिभांना सुद्धां मंजुळेनें आपल्या लीन, प्रेमळ आणि सुशील वागणुकीनें गप्प बसविलें होतें. तिच्या अमदानींत दौलतरावांचा संसार जितका टापटिपीनें आणि दक्षतेनें चालला होता तितका पूर्वी कधींच चालला नव्हता. तिच्या प्रसन्न हास्यानें दौलतरावांच्या वाड्यांतलें वातावरण उजळून निघालें होतें. तिच्या लीन वागणुकीनें लहान थोर नातेवाईक खूष होऊन गेले होते. तिच्या मर्यादशील पण योग्य तें आतिथ्य करण्यास तत्पर असलेल्या वृत्तीमुळें दौलतरावांची मित्रमंडळी मोहून गेली होती. जगदेवराव कोतवालासारखा करडा अरेरावी पोलिसी गृहस्थ सुद्धां दौलतरावांच्या वाड्यांत शिरल्याबरोबर मृदु आणि आर्जवी बनत असे. पत्नीच्या या किमयेमुळें दौलतराव फारसे बोलके बनले नाहींत ही गोष्ट खरी, पण त्यांच्या नजरेंत अंतर्गत समाधानाचें पाणी झळकूं लागलें होतें ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं.

× × ×

अशी ही गृहलक्ष्मी तेरा दिवसांपूर्वी अंतर्धान पावल्यापासून दौलतरावांच्या मनःस्थितींत एक अनपेक्षितच फरक पडला. ते एकाएकीं बोलूं लागले ! लहानपणीं कधीं बोलले नसतील इतके आणि इतक्या उत्साहानें ते बोलूं लागले. त्यांच्या बोलण्याचा विषय एकच होता. तो म्हणजे मंजुळेचें गुणगान. जो कोणी येईल जाईल त्याजपाशीं ते मंजुळेच्या गुणांची मनसोक्त तारीफ करीत बसत. हें गुणवर्णन करतांना ते उत्साहानें असे कांहीं भरून जात कीं, भेटायला आलेले चकित होत. दौलरावांच्या या वृत्तीचा अर्थच लावणें त्यांना अशक्य होई. मंजुळेच्या मृत्यूमुळें झालेल्या शोकापेक्षां तिच्या गुणसंकीर्तनाचा आनंदच त्यांना अधिक होतो आहेसें वाटे. बोलतां बोलतां त्यांचा कंठ दाटून येई, डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागत, चेहरा विकल होई; पण या साऱ्यांतून एक प्रकारचें शुद्ध, निर्विकल्प, निरपेक्ष समाधान अनुभवास येत होतें. एखाद्यानें आपल्या गोठ्यांतून चोरीस गेलेल्या उमद्या खिल्लारी बैलजोडीबद्दल

अनुक्रमणिका

बोलतांना, बैल हरवल्याच्या नुकसानीपेक्षां तिच्या उमदेपणाबद्दल व देखणेपणाबद्दलच बोलत सुटावें तसेंच कांहीं जणांना दौलतरावांचें हें गुणसंकीर्तन वाटत असे. त्यांच्या वर्तनाची संगति कोणालाच लागेना.

× × ×

दौलतरावांच्या या वर्तनाचा उलगडा त्यांच्या चाणाक्ष मित्रांना तेराव्या दिवशीं झाला. श्राद्धविधि संपला. गांवजेवण झालें. दिवस परतल्यावर लोक घरोघर गेले. भवानराव देशमुख, रामभाऊ कराडे, संपतराव चव्हाण वगैरे निवडक प्रतिष्ठित मित्र मंडळी तेवढीच मागें राहिली. दौलतराव त्यांच्यापाशीं मंजुळेचें गुणगान करीत होते. बोलतां बोलतां ते म्हणाले,

" बाकी कांहीं म्हटलं तरी मंजुळेच्या एका गुणाची सर मात्र तिच्या इतर गुणांस येणार नाहीं. "

मंडळीनें त्यांच्याकडे प्रश्नार्थक मुद्रेनें पाहिलें.

" कोणता गुण म्हणतां ? " दौलतराव म्हणाले, " अहो, पत्नीचा मुख्य गुण तोच. पतिभक्ति. खरोखर, मंजुळेसारखी पतिव्रता शोधून सांपडणार नाहीं. अप्सरेसारखी ही सुंदर तरुण मुलगी अन् माझ्यासारखा हा तिचा म्हातारा, जख्खड, उतारास लागलेला नवरा; पण गेल्या बारा वर्षांत पुरुषाकडे वर नजर करून नाहीं पाहिलं तिनं कधीं ! "—

—मंडळीनें एकमेकांकडे पाहिलें. त्यांत नुसतें नवल होतें कीं कांहीं निराळाच अर्थ भरलेला होता याचा दौलतरावांना बोध झाला नाहीं. त्यांचें तिकडे लक्षच नव्हतें. ते आपल्याच गुणगानांत निमग्न होते—

"—कीं कोणा परपुरुषाची तिच्याकडे पापी नजर वळविण्याची हिंमत नाहीं झाली कधीं ! "

" खरंच ? " संपतरावाच्या तोंडून उद्गार निसटला.

या उद्गारांत अविश्वास आणि हळहळ यांचें विचित्र मिश्रण होतें.

दौलतरावांना तें जाणवलें, पण त्यांनीं तिकडे लक्षच दिलें नाहीं. ते स्वतःच्याच उत्साहांत दंग होते. पण संपतरावाचा उद्गार भवानरावांना खटकला. त्याचा कांहीं विपरीत परिणाम होऊं नये म्हणून ते शक्य तितक्या सहानुभूतीच्या स्वरांत म्हणाले,

" खरंच, ती साध्वी फार थोर. नाहींतर आपल्या या गांवांत टारगट पोरांना काय तोटा होता ? तो सद्या मळकरच घ्या ना." असें म्हणून त्यांनीं वक्र नजरेनें संपतरावांकडे पाहिलें. सद्या मळकराची संपतरावाकडे ऊठबस असे.

" काय बिशाद होती या टारगटांची ! त्या सद्याचं लक्षण दिसल्याबरोबर पार बंदोबस्त करून टाकला त्याचा ! " दौलतरावांच्या स्वरांत विजयश्रीचा संचार झाला होता.

" बंदोबस्त ! " आतांपर्यंत गप्प बसलेल्या रामभाऊंनीं विचारलें.

" हो हो, बंदोबस्त ! तो सद्या मंजुळेभोंवतीं घुटमळतो आहे याचा वास लागल्याबरोबर आमच्या दिवाणजीच्या तोंडून अशी एक बातमी पसरून दिली म्हणतां ! "

" कोणती बातमी ? " तिघांनीं एकदम अधीरपणें विचारलें.

" अहो, आपले कोतवालसाहेब आहेत ना,—जगदेवराव कोतवाल ? त्यांची नि मंजुळेची नाजुक मैत्री आहे असं दिलं उठवून नि काय ? याचा विजेसारखा उपयोग झाला, राव ! ही बातमी जरा इकडे तिकडे गेल्याबरोबर हे तुमचे सद्ये अन् सांडं, चट सारे पळाले ! काय बिशाद आहे पुनः मंजुळेच्या जवळपास फिरकतील ! "

" म्हणजे ही बातमी साफ खोटी तर ! " संपतरावांनीं विचारलें.

" कमाल आहे तुमची हं दौलतराव ! अहो, कांहीं झालं म्हणून स्वतःच्या बायकोची बदनामी—"

" अहो, म्हातारपणीं तिसरी बायको केली म्हणजे समजतात या गोष्टी ! म्हातारपणची बायको म्हणजे मोडक्या पिंजऱ्यांतलं कौलार, केव्हां कोसळेल अन् फुटेल याचा नेम नाहीं ! बाकी मंजुळेबद्दल असा विचार करण्यांत मी घोर गुन्हा केला यांत शंकाच नाहीं. " एवढें बोलून दौलतरावांनीं एक उसासा टाकला आणि ते पुढें म्हणाले,

" खरोखर मंजुळेच्या पातिव्रत्याला सर नाहीं. मरेपर्यंत ती माझ्याशीं, या थेरड्याशीं एकनिष्ठ राहिली. "

मंजुळेच्या मृत्यूनंतर दौलतराव तिचें एवढें उत्साहानें गुणगान कां करीत होते याची या वाक्यानें त्या मंडळीला एकदम उमज पडली. मंजुळेनें अखेरपर्यंत आपल्यासारख्या म्हाताऱ्या नवऱ्याशीं इमान राखलें आणि आतां ती बेइमानीच्या पार पलीकडे गेली याच गोष्टीनें त्यांना एवढा आनंद झाला होता. हा त्यांच्या आयुष्यांतला मोठा थोरला विजय होता, आणि आतां आयुष्याच्या अखेरीस, इतर कशाहि पेक्षां अब्रू आणि प्रतिष्ठा यांची चाड बाळगणाऱ्या त्यांच्या जीवाला हा विजय विशेष वाटत होता.

हें बोलणें अधिक वाढणार तोंच श्राद्धविधीसाठीं आलेले भटजी दौलतरावांचा निरोप घेण्यासाठीं दिवाणखान्यांत आले. त्यांना पाहून दौलतराव म्हणाले,

" काय निघालांत ? ठीक, ठीक ! हो पण, जरा थांबा हं. भटीणबाईंना मंजुळेची लुगडेंचोळी द्यायची आहे तेवढी घेऊन येतों. "

असें म्हणून ते आंत जावयास निघाले. त्यांची मित्रमंडळीहि निरोप घेऊन निघून गेली.









मंजुळेच्या खोलींत जाऊन दौलतरावांनीं तिची ट्रंक उघडली. पत्नीच्या निधनानंतर अगर अगोदरहि त्यांनीं कधीं तिच्या ट्रंकेच्या कुलपाला चावी लावली नव्हती. आणि लावण्याचें कारण तरी काय होतें? सारी व्यवस्था मंजुळा स्वतःच चोख पाहात होती. त्या खोलींत पाऊल टाकल्यापासून दौलतरावांचा मघांचा उत्साह मावळूं लागला होता. ट्रंक उघडून त्यांनीं मंजुळेच्या वस्त्रप्रावरणांवर नजर टाकतांच त्यांना भडभडून आलें. धोतराच्या शेवानें डोळे पुशीत ते ट्रंकेंतले कपडे उलगडूं लागले. त्यांनीं हवें होतें तें लुगडें काढलें आणि त्याची घडी उघडली, त्याबरोबर त्यांतून दोन तीन पत्रें बाहेर पडलीं. पत्रावरचें अक्षर पाहून त्यांना धक्काच बसला. त्यांचें डोकें सुन्न झालें. अक्षर जगदेवराव कोतवालाचेंच होतें. थरथरत्या हातांनीं त्यांनीं एक पत्र उचलून त्यावरून नजर फिरवायला सुरवात केली—

कोतवाल—चावडी,
कोसवली
सोमवार, रात्रीं १॥ वाजता.

प्रिय मंजू,

तुझें पत्र वाचून मला किती गंमत वाटली म्हणून सांगूं! एकंदरींत दौलरावांनींच ती बातमी उठवली म्हणायची! छान छान! त्यांनींच आपला मार्ग मोकळा करून दिला, हें झकास झालें. आतां लोक कितीहि कोकलले तरी त्यांना काडीइतका संशय येणार नाहीं. तुझ्या हुशारीचें मात्र मला अगदीं नवल वाटतं. चार चौघांत अन् नवऱ्यासमोर तूं किती आदबीनें अन् खानदानीनें वागतेस! कोणाला वाटायचें ही अहिल्याच अवतरली! याचें गोड बक्षिस आतांच्या आतां येऊन द्यावें असें वाटतें....

दौलतरावांच्या हातून पत्र गळून पडलें. कांहीं वेळ ते तसेच मूढासारखे बसून राहिले. त्यांच्या गात्रांतली सारी शक्ति गळून गेली. डोळ्यांसमोर अंधारी आली. जरा वेळानें ते तसेच उठले आणि निर्जीव कोलमडत्या पावलानें बाहेर आले. त्यांना पाहून भटजी चकित झाले. दौलतरावांचा चेहरा पार बदलून गेला होता. सारें अंग थरथरत होतें. चेहरा फिकट पडला होता आणि चेहऱ्यावरच्या सुरकुत्या अधिकच सुकट आणि रुक्ष भासत होत्या. ते आले आणि त्यांनी भटजींकडे एकवार विचित्र नजरेनें पाहिलें. भटजी विचारे कांहीं न बोलतां तसेच पहात राहिले. अखेर दौलतरावांनीं त्यांना हातांनींच जायला सांगितलें. भटजींना त्यांचे ते हातवारे वेड्याच्या हातवाऱ्यासारखे भासले. दौलतराव गेले दहाबारा दिवस मंजुळेबद्दल जें एकसारखें बडबडत होते तेंच भटजींना भ्रमिष्टपणाचें वाटत होतें. त्यांच्या भ्रमिष्टपणानें आतां हें निराळेंच रूप धारण केलें आहे असा विचार करून अधिकउणें न बोलतां त्यांनीं काढता पाय घेतला!

कांहीं वेळ दौलतराव दिवाणखान्यांत तक्क्याला टेकून बसून राहिले. नंतर उठले. त्यांना कांहींच सुचत नव्हतें, कसलाहि विचार थरत नव्हता, कांहीं बोध होत नव्हता. निर्बोधपणेंच त्यांनीं दांडीवरचें उपरणें काढलें, पांघरलें आणि ते वाड्याबाहेर पडले. त्यांचीं पावलें पडत होतीं पण कोणत्या दिशेनें पडत होतीं हें त्यांना जाणवत नव्हतें. वाटेंत गांवांतले एकदोन गृहस्थ त्यांना भेटले. त्यांनीं दौलतरावांकडे हंसून पाहिलें. गेल्या दहाबारा दिवसांतल्या अनुभवाप्रमाणें दौलतराव उभे राहून कांहीं तरी बोलतील असें त्यांना वाटलें होतें. पण दौलतरावांच्या चेहऱ्यावर स्मशान-छाया पसरल्या होत्या. त्यांना भेटलेले गृहस्थ वरमले. अधिक कांहीं न बोलतां ते आपल्या वाटेनें निघून गेले.

जरा वेळानें आपण ओढ्यापाशीं आलों आहोंत अशी पुसट-अस्पष्ट जाणीव दौलतरावांना झाली. ओढ्यावर एक छोटासा लाकडी पूल होता, त्याच्यावर ते जाऊन उभे राहिले. पुलाखालून जीवन वहात होतें आणि त्यावर मधुनमधून संध्याकाळच्या उदास छाया पसरल्या होत्या. दौलतराव त्या जीवनावरच्या छायांकडे पहात राहिले. इतक्यांत त्यांचें लक्ष कांठावरच्या एका सुकट रुक्ष, पर्णहीन फांदीचें प्रतिबिंब पाण्यांत पडलें होतें तिकडे गेलें. त्या प्रतिबिंबाशेजारींच कांठच्या एका झुडपावरच्या रानफुलाचें प्रतिबिंब पडलें होतें. कां नकळे, दौलतरावांचें लक्ष या प्रतिबिंबावर खिळलें. मधुनमधून त्या फांदीचें प्रतिबिंब हाले आणि फुलाच्या प्रतिबिंबाला येऊन स्पर्श करी. स्पर्श करी आणि पुन: दूर जाई. विमनस्क चित्तानें ते हें पहात राहिले, तों एक निराळेंच उडतें प्रतिबिंब या दोन प्रतिबिंबांच्या आसपास येऊन नाचूं-बागडूं लागलें. दौलतराव आतां त्याचा वेध घेऊं लागले. इतक्यांत तें उडतें प्रतिबिंब रानफुलाच्या प्रतिबिंबाभोंवतालींच नाचूं लागलें. दौलतरावांची नजर त्याच्याबरोबर फिरूं लागली. इतक्यांत तें उडतें प्रतिबिंब फुलाच्या प्रतिबिंबांत नाहींसें झालें. दौलतरावांनीं एकदम वर पाहिलें. एक फुलपांखरूं त्या रानफुलावर बसलें होतें. एकदम झटका बसल्याप्रमाणें त्यांची नजर खालीं वळली. त्या नजरेंत पाणी जमा झालें. खालचें स्वच्छ पाणी आतां धुकें पसरल्याप्रमाणें वाटूं लागलें—आणि त्या पाण्यांत लहान लहान असंख्य भोंवरे आहेत असा भास होऊं लागला! +

+ चेकॉव्हच्या At the Post Office या गोष्टीवरून स्फूर्ति घेऊन











अनुक्रमणिका








( पान ८ वरून )

आदि–श्री

स्मित आणि अश्रू
माझ्या जीवनाचीं हीं दोन प्रतीकें आहेत.
माझ्या स्मितांत सृष्टीची सुन्दरता आहे
आणि माझ्या अश्रूंत—
मानवी जीवनाची असहायता आहे.
स्मिताच्या खळींत संजीवनीचें सरोवर आहे.
अश्रूच्या थेंबांमध्यें शिणलेलें जीवित प्रतिबिंबरुपानें
निजलेलें आहे.
माझ्या स्मिताचीं फुलें जगावर पडून
त्याची रमणीयता वाढवतात,
माझ्या अश्रूंचीं फुलें माझ्या हृदयावर पडून
त्याची आर्द्रता कायम ठेवतात.
माझें स्मित आणि माझा अश्रू—
माझें स्मित दुसऱ्यासाठीं आहे
आणि माझा अश्रू
माझ्यासाठीं आहे !

—कुसुमाग्रज.

दत्तु बांदेकर

# विसरा आणि क्षमा करा

**साहेब**, काय विसरा आणि क्षमा करा! तुम्ही मला आत्ताच 'डॅम फूल' अशी शिवी दिली शाणि वर मला म्हणतां, विसरा आणि क्षमा करा! साहेब, या तुमच्या बट्याबोळ कंपनींत गेलीं बारा वर्षें मी हेडक्लार्क आहे आणि आज तुम्ही मला 'डॅम फूल' अशी शिवी द्यावी! माझ्यासारखा कर्तबगार नोकर तुम्हाला दुसरा लाभला असतां का? तुमच्यासारख्या चक्रम् आणि बेअकली साहेबाच्या हाताखालीं दुसरा कोणी बारा वर्षें टिकला असतां का? या बट्याबोळ कंपनीचा कारभार सर्वस्वी माझ्याच शहाणपणावर चालला असतांना, तुम्ही माझा आज अशा रीतीनें अपमान करावा म्हणजे काय? काय म्हणतां, विसरा आणि क्षमा करा! साहेब, मी काय विसरूं आणि काय क्षमा करूं? नाताळच्या सणांत तुमच्या मडमेनें मला फळें आणण्यासाठीं क्रॉफर्ड मार्केटमध्यें पाठविलें आणि मी रामा गड्याप्रमाणें तुमचें शॉपिंग केलें, तें मी विसरूं? तुमची सिनेमाची तिकिटें रिझर्व करण्याचें काम तुम्ही माझ्यावरच सोपविलें आणि ऑफीस ड्यूटी संभाळून तुमची ती चिल्लर कामें मी मुकाट्यानें केलीं, तें मी विसरूं? एक दिवस दारूच्या धुंदींत तुमच्या मडमेनें तुमच्या टाळक्यावर फ्लॉवरपॉट फेंकलें, तें चुकून माझ्या कपाळावर आदळलं, या सर्व गोष्टी मी विसरूं आणि क्षमा करूं? मी ब्राह्मण असतांहि उपरण्यांत अंडी गुंडाळून तुमच्या बंगल्यावर मी पोंचती केली, हें मी विसरूं आणि क्षमा करूं? साहेब, सांगा, मी काय विसरूं आणि काय क्षमा करूं? माझ्यासारखा हरकामी आणि घरकामी हेडक्लार्क ईश्वरकृपेनें तुम्हास लाभला असतां, आज दिवाळीला मला पोस्त देण्याचें सोडून तुम्ही मला 'डॅम फूल' अशी शिवी देतां! आणि वर म्हणतां, विसरा आणि क्षमा करा! साहेब, मी कांहीहि विसरणार नाहीं आणि कधींहि क्षमा करणार नाहीं!

× × ×

**काय** म्हणतेस, विसरा आणि क्षमा करा! आज दिवाळीच्या दिवशीं जेवणांत धडधडीत केस दिसतो आहे, आणि तूं म्हणतेस विसरा आणि क्षमा करा! तुझे केस लांबसडक हवेत म्हणून तुला केशवर्धक तेलाची बाटली आणून दिली तर तूं आमटींतच केस टाकू लागलीस म्हणजे काय! काय म्हणतेस, विसरा आणि क्षमा करा! काय विसरूं आणि काय क्षमा करूं? मला दांत नाहींत हें माहीत असूनहि ही भयंकर चकली आणि कडबोळी तूं माझ्या ताटांत वाढली आहेस हें मी विसरूं? माझ्या टेबलावरचीं बहुमोल पुस्तकें तूं उशीखालीं घेऊन झोपून, सर्व पुस्तकांना तेलाचे डाग लावले आहेस, तें मी विसरूं? दर आठवड्यागणिक कपबश्यांची एक एक जोडी तूं फोडतेस आणि वॉशिंग कंपनींतून धुवून आणलेल्या माझ्या शुभ्र सदऱ्याला तूं कोळश्यानें माखलेला हात लावतेस, तें मी विसरूं? रोज रोज माझ्याशीं भांडण उकरून काढून माहेरीं जाण्याचा मला धाक घालतेस, तें मी विसरूं? हपीसांतून मी दमून भागून घरीं आल्यावर हंसतमुखानं माझें स्वागत करण्याचें सोडून, माझ्या हातांत पिशवी देऊन मला भाजी आणायला पाठवितेस तें मी विसरूं? माझ्या खिशांतले पैसे चोरून 'झनाना शो' पाहतेस आणि रात्रंदिवस सिनेमांतली गाणीं म्हणून माझें डोकें उठवितेस, तें मी विसरूं? चौपाटीवर नवऱ्याला घेऊन फिरायाच्या ऐवजी कुत्रा घेऊन फिरतेस, तें मीं विसरूं? सांग, लाडके, सांग! मी काय विसरूं आणि काय क्षमा करूं? माझ्यासारखा प्रेमळ नवरा तुला नशीबानें लाभला असतांना, तूं अशा रीतीनें माझा छळवाद मांडला आहेस आणि वर मानभावीपणें म्हणतेस, विसरा आणि क्षमा करा! आज दिवाळीच्या दिवशीं तुझी चकली खाऊन माझे दांत निखळून पडले असतांना, ही गोष्ट मी विसरणार कशी आणि क्षमा करणार काय! छे! मी कांहीहि विसरणार नाहीं आणि कहींहि क्षमा करणार नाहीं. हा लढा असाच चालू राहणार.

× × ×

**काय** म्हणतां, विसरा आणि क्षमा करा! शरम वाटत नाहीं असं म्हणायला? तुमच्या भरंवशावर मी निवडणुकीला उभा राहिलो आणि शेवटीं सणसणीत आपटी खाल्ली, डिपॉझिट सुद्धां जप्त झालं, आणि आतां म्हणतां, विसरा आणि क्षमा करा! आपटीखाऊ उमेदवार म्हणून साऱ्या गांवांत माझी नाचक्की झाली आहे, कुठें तोंड दाखविण्याची सुद्धां सोय उरली नाहीं! कुठे गेले ते माझे प्रचारक! कुठे गेले ते अण्णाराव आणि तात्याराव! ज्या लोकांनी मतं देण्याचें वचन देऊन, माझ्या घरीं असंख्य बुंदीचे लाडू खाल्ले, ज्या लोकांनीं माझी खुशामत करून मला या नसत्या फंदांत पाडले, ते लोक आतां कुठें पळाले? काय म्हणतां, त्या लोकांनीं निरोप धाडला आहे, विसरा आणि क्षमा करा! अरेरे! मला तोंडघशी पाडणाऱ्या या धूर्त लोकांनीं शेवटीं माझें असें सांत्वन करावें ना! मी काय विसरूं आणि काय क्षमा करूं? प्रचारकार्यासाठीं खर्च केलेले हजारो रुपये विसरूं, कीं झिळमिळ्याची पगडी घालून मोठ्या रुबाबांत मतदारांपुढें केलेल्या घोषणा विसरूं! निवडणुकीच्या धामधुमींत केलेली हुल्लडबाजी आणि शिमगा विसरूं, कीं प्रतिपक्षांना दिलेल्या शिव्या विसरूं?

---

अनुक्रमणिका

—रंगराव

## पुजारीण—

चित्र मनोहर माझें सुन्दर
नका उडवुं त्यावरि शितोडा.
अभंग वरची कांच राहुं द्या
नका मारुं तिजवरी हतोडा.

अवखळतेंतहि असे चारुता.
अवखळतेला परि अवसर का ?
मस्तवाल तरि हात आवरा.
मार्गे सरका, मार्गे सरका !

पुजारीण ही अनन्य अपुली;
नका तिला परि जवळीं ओढूं.
पूजित आली ज्या प्रतिमेला
नका तिला निज करेंचि फोडूं.

तिची ढळेल न मुळींहि भक्ति.
च्युतींतही ती राहिल अच्युत.
परंतु तिजला असह्य होइल
जनतेची ह्या कुजबुज कुत्सित.

पुजारिणीला गवसतील जरि
दिव्य सुखें तव मानव रूपीं
पुजारिणीस्तव नका उतरुं परि
प्रभुजी, मानवतेच्या कूपीं.

देवा, तुमच्या प्रतिमेवरती
तुमचाहि न अधिकार राहिला.
भक्त वांछितो त्याच तऱ्हेनें
अकलंकित हो तिज सांभाळा.

पुणें
२१-९-४५

—यशवंत

आजकालचा

# तमाशा



हल्लीची तमाशाची पद्धत तीन प्रकारची आहे. जसे—

१ शास्त्रीय लावण्या म्हणजे कलगी तुरा. ही पद्धत अशी आहे कि, दोन तमाश्यांची सवाल जबाबांची चढाओढ. अर्थात त्याला पौराणिक रूप देऊन हा तमाशा होत असे. असल्या प्रकारचा तमाशे करणारे— प्रसिद्ध माणसे म्हणजे पठ्ठे बापूराव, दगडू साळी शीवा संभा वगैरे वगैरे. दुसरी पद्धत रंगबाजी तमाशा. या तमाशांत संगारीक लावण्या, छक्कड, झगडा, वगैरे. ही पद्धत अलिअलिकडे जास्त प्रमाणात आहे. आणि तीसरी पद्धत म्हणजे चौरंगी तमाशा. या तमाशात सिनेमाचे गाणे (हिंदी मराठी) याचे अनुकरण करून म्हणणें. याच तमाशांत शेवटीं एक वग (गोष्ट) म्हणून त्याला साधारण नाटकी स्वरूप दिले जाते. संगीत तमाशा मात्र या पेक्षा निराळा आहे. तोही तमाशाच. परंतु अर्थ भिन्न असण्याकरता त्याला संगीत जलसा म्हणण्याची पद्धत आहे. हा तमाशा (जलसा) हार्मोनियम, तबला व एक ट्रँगल (लोखंडी-कडी) च्या साथीत या तमाशांत गझल, कव्वाली सिनेमासंगीत म्हणतात. याच तमाशात जुन्या लावण्या म्हणजे तंबोरीवरच्या. उदाहरणार्थ (तुम्ही माझे सावकार, जसा पिकला ग गहु हरबरा वगैरे.) अलीकडे कुठल्या तमाशांत काय प्रकार आहे हे सांगता येणे कठीण झाले आहे. कारण कि, ढोलकीच्या तमाशात पेटीतबल्यावरचे गाणे म्हणतात व पेटी तबल्यावर म्हणणारे ढोलकीचे अनुकरण करून त्याला महारकी रूप आणतात. संगीत जलशात प्रसिद्ध बायका—कौसल्या कोपरगावकरीण, एश्वरा वाइकरीण, अनुसया जेजूरीकरीण, सावित्री ऊर्फ लयला जेजुरीकरीन, शेवंता ऊर्फ विजली, बकुळा वगैरे वगैरे. वरील गोष्टीवरून हे आपणास दिसते कि, ढोलकीवरचा तमाशा (मग तो कुठलाहीं असो) पुरषाच्या नावाने प्रसिद्ध असतो. व पेटीतबल्यावरचा तमाशा बाईच्या नावाने ओळखला जातो. सर्व साधारण तमाशाची पद्धत अशी—

प्रथम गण (स्तुती) नंतर गौळण. यात कृष्णलीला. राधा कृष्ण ही मुख्य पात्रे व नंतर एक नक्कल (सपान्नी) व लगेच त्याबरोबर एक झगडा. अर्थात स्त्री व पुरुष मिळून म्हणतात त्याला झगडा हे नाव आहे. यात शेवटी दोघांचे कांप्रोमाइज होते व नंतर त्याला खूश करण्याकरिता एक छक्कड गातात. यात ती त्याला लुबाडते खुश करिते. नंतर वगाला सुरवात होते. यात नक्कल छक्कड गीत वगैरे प्रसंगाप्रमाणे गातात. एन्ड.

# निःश्वास!

**श्री. स. दाभोलकर**

[ —महायुद्धाच्या पहिल्याच ठिणगीमुळें इंग्लंडवर विराट अग्निप्रळयाची छाया पसरली तेव्हांची ही षृत्तिका आहे. ]

नात्सीनीं केलेला वैमानिक हल्ला अत्यंत क्रूर आणि अमानुष स्वरूपाचा होता. अनेक शतकांच्या ऐतिहासिक परंपरेची थोरवी मिरवणारें पार्लमेंटगृह आणि वेस्ट मिन्स्टर ॲबे यांच्या अंगोपंगांचा चुराडा झाला. आग शांत करण्यांत फायरब्रिगेडनें यश मिळविलें. तरी पण उध्वस्त जळक्या भिंती भिंतींतून धूर धुमसत होता. आणि धुरकटलेल्या पाण्याचे ओघळ ठिकठिकाणीं ठिबकत होते. पार्लमेंटगृहावरचें 'बिगबेन' घड्याळ मात्र त्या अग्निप्रलयाचें तांडव नृत्य पाहून दिङ्मूढ झाल्यासारखें दिसत होतें!

वेस्टा मिन्स्टर ॲबेवर एक प्रकारची विदारक शून्यता अन् अपरंपार उदासीनता पसपसरली होती!

मध्यरात्रींचा सुमार. ब्लॅक औटच्या उदंड काळोखावर आकांशांतून चंद्रमा थंडगार प्रकाश ओतींत होता.

रस्त्याची रहदारी नियंत्रित करणाऱ्या पोलिसाप्रमाणें 'बिगबेन तासाचे नि मिनिटाचे हात दाखवीत कलाप्रवाहाला वाट दाखवीत होता.

दोन झाल्याचे मंजुळ टोले घणघणले.

पण याच सुमारास निकडे वेस्ट मिन्स्टरच्या काहीं कबरींतून खोल निःश्वास बाहेर पडत होते—

**१ ला निःश्वास**—छे, कसला उग्र वास येतोय् हा?

**२ रा निःश्वास**— मला वाटते तुझी पूजा बांधायला एखादा भक्त येत असावा, निसर्गाचा निःसीम पुजारी—अग्रेसर कवी अशी तुझी कीर्ती ना? त्या कीर्तीला साजेशीच पूजा व्हायला हवी. फुलं असतील तीं!

**१ला निःश्वास**—फुलं? नाहीं, फुलांचा वास नव्हे हा. पहा तूंच.

**२ रा निःश्वास**—( दीर्घ श्वास घेऊन ) या कबरींत राहायला आल्यापासून माझी वास घेण्याची शक्तीच नष्ट झाली आहे.

**१ ला निःश्वास**—तें तुझ्या प्रयोगशाळेंतीळ पराक्रमाचें फळ आहे. लोकांनीं तुला विख्यात संशोधक म्हणून चढविलं—तूं चढून गेलास नि सगळी ह्यात रासायनिक प्रयोग करण्यांत घालवलीस. त्यावेळचा तुझ्या नाकांत शिरलेला भपकारा अजून उतरलेला दिसत नाहीं! कशाला उगाच नाहीं ते उपद्व्याप करून जीवनशक्ती वेचलीस?

**२ रा निःश्वास**—मग तूं नाहीं वाटतं निसर्गसौंदर्याला शब्दांच्या काचनळींत कोंडून ठेवण्याची शिकस्त केलीस ती?

**१ ला निःश्वास**—हा हा! हा?

**२ रा निःश्वास**—हसूं नकोस. उत्तर दे. जिवंत असेपर्यंत, समुद्रकाठीं खेळणाऱ्या अल्लड मुलांप्रमाणें अनेक कूट प्रश्नांचे रंगी बेरंगी शंख, शिंपले नि स्फटिककण वेचून आपण काळ घालवला. आतां मेल्यानंतर देखील त्या प्रश्नांचीं उत्तरं आपण तितक्याच हावभरीनं दिलीं पाहिजेत. अनेक शास्त्रीय शोध लावून मी झक मारिली पण तूं सगळ्या जगाला गुणगुणायला लावणारं काव्य का अन् कशासाठीं निर्माण केलंस बाबा?

**१ ला निःश्वास**—स्वतःच्या समाधानासाठीं

**२ रा निःश्वास**—झूट, बिल्कूल झूट.

**१ ला निःश्वास**—मग काय लोकांनीं माझा गौरव करावा म्हणून?

**२ रा निःश्वास**—पाहिलंस, माझ्या म्हणण्याचा विपर्यास केलास! स्वतःच्या समाधानापेक्षां जगाचें समाधान व्हावें किंवा स्वतःच्या उपभोगापेक्षां जगाला उपभोग मिळावा म्हणून तूं ते काव्य लिहिलंस. It was your creative instinct! जगाच्या सुखांत भर घालणसाठीं माझीं मुलं, माझं घर, माझं जग—ही ममत्वाची भावनाच तुम्हाला तें काव्य करायला लावीत होती, खरं ना?

**१ ला निःश्वास**—कसं अचूक ओळखलंस? तें कबूल करायला मी लाजत होतो.

**२ रा निःश्वास**—खरं आहे. आपली ममत्वाची भावना इतक्या विकृत अवस्थेला जाईल याची आमच्यापैकीं कोणालाहि कल्पना नव्हती. मानवी जीवनांत अननुभूत अशा सुखसंवेदनांचा शोध करून कांहीं तरी भर टाकावी म्हणून आम्ही जें प्रयत्न केले, जे कष्ट भोगले, जो जीव झिजविला त्याचेंच हें फळ असेल अशी कल्पना नव्हती.

[ विमानांची घरघर आणि बॉम्बचा स्फोट! ]

ऐकलास हा कर्णकर्कश आवाज? त्या आवाजांतूनच हा उग्र वास निघतो आहे!

**१ निःश्वास**—नरेंच केला हीन किती नर! what man has made of man! 'मरणम् प्रकृतिः शरीरिणाम् विकृतिर्जीवितमुच्यते बुधैः' हेंच खरें तर! मरणें—नष्ट होणें—ह्यांतच सृष्टीचा सृजनशीलता साठवली नसेल ना?

**२ रा निःश्वास**—सिनीक! बोलूं नकोस! तुझ्या अभिजात काव्याचा किंवा माझ्या संशोधनाचा हा पराभव आहे—आणि त्या पराभवाची भावनाच तुला हें बोलायला लावीत आहे. पण एक खरं. हें सर्व होतं आहे तें अंतीम चांगल्यासाठींच अशी मात्र माझी ठाम समजूत आहे.

**१ ला निःश्वास**—वेडा आहेस! एखाद वेळीं या अफाट पृथ्वीचा गोळा फोडून त्याच्या कणाकणांचं पृथक्करण तुझ्यासारखा शास्त्रज्ञ करूं शकेल पण मानवी शरीराच्या रक्तपेशींतून नसनसणारी सुखदुःखाची चमक—त्याचें पृथक्करण करणें कल्पांतीहि शक्य नाहीं!

**२ रा निःश्वास**—हें सांगायला तुझ्यासारखा मेलेला शास्त्रज्ञ कशाला हवा आहे? ह्या कबरीचा जिवंत दगड देखील कल्पारंभापासून हेंच बोलतो आहे! जाऊं दे. जीवंत असे तों खूप डोकं घासलं. आतां मेल्यानंतर तरा अंमळ विश्रांति घेऊं या—पहा, शिल्पकार, चित्रकार, लेखक, शास्त्रज्ञ, वीणाकार, राजकारणी, राष्ट्र-नेता, असे अनेक कीर्तिवंत तुझं काव्य ऐकायला जमले आहेत!

**१ ला निश्वास**—वेड्या माझं काव्य ऐकण्यासाठीं नव्हे—तर जगांतील यच्चयावत ललितकलांचें अन् शास्त्रांचें मृत्युगीत गाण्यासाठीं ते इथें जमले आहेत.

[ 'बिगबेन'चा तासाचा मंजुळ टोला खणखणतो. ]

**१ ला निःश्वास**—सत्य आहे. ऐकलंस, या घड्याळ्यानं काय सांगितलं? मनुष्य मरणाधीन आहे—पण काळ अमर आहे!

**बिगबेन**—हा हा हा! किती खुळा आहेस! काळ मरत असतो—मनुष्य नव्हे! ज्याच्यांत जन्माला घालण्याची पात्रता आहे creative instinct आहे तोच खरा अमर नव्हे काय!

[ 'बिगबेन'चे ते मूक शब्द ऐकतांच सर्व निःश्वास एकाएकी निःशब्द होतात. ]

अनुक्रमणिका








अनादिकालापासून मनुष्यप्राण्यांना ध्वनि अथवा नाद कसा काढतां येईल याचें वेड असे. दोन कठीण वस्तू एकमेकांवर आपटून आवाज काढण्याची आवड त्यांना होती. त्यानंतर, लांकडाच्या पोकळ बुंध्यावर कांतडें लावलेला ढोल अस्तित्वांत आला. मधून मधून यावर ताडन केलें तर अत्यंत मधुर आवाज निघतो, असें त्यांना आढळून आलें. जसें:—

| — — ऽ | — — ऽ | — — ऽ | — — ऽ |

कोणतीही कृति वारंवार केली असतां आपल्याला नादमाधुरी मिळते आणि अशा रीतीनें आनंदबोधाची निर्मिती होते. उदाहरणार्थ, आपण जर मधून मधून घंटानाद केला, किंवा लयबद्धतेनें आपले हात, पाय किंवा सर्व शरीर यांची हालचाल केली तर आपल्याला आनंदबोधाचें सुख खात्रीनें लाभतें. आतां ही गोष्ट सुद्धां फक्त कांहीं काल आपल्याला सुखवितें. परंतु नियमित लयबद्धतेमध्यें जर आपण एखाद्या प्रकारचा अनियमितपणा आणला, अर्थातच सूत्रबद्धतेनें कांहीं विविध नादतरंग निर्माण केले तर आपल्या कानाला तो सर्वच आवाज अतिशय मधुर लागतो. जसाः—

| —— ऽ | ———— ऽ | ——— ऽ | ——— ऽ |

तुम्ही आरतीच्या वेळीं जर कधीं देवळांत हजर राहून एका ठराविक पद्धतीनें नियंत्रतेनें वाजविण्यांत येत असलेलें निरनिराळ्या आवाजाचें ३, ४ तास ऐकलेत तर ही गोष्ट तुमच्या प्रत्ययाला येईल. तोच तो एकच प्रकारचा आवाज ऐकणें कंठाळवाणें वाटतें. परंतु चार निरनिराळे सूर वारंवार परंतु लयबद्धतेनें निघाले तर त्यांतून जे तरंग निर्माण होतात ते त्यामधील नादमाधुर्यामुळें कानाला गोड लागतात.

छाया-चित्र-कलेमध्येंसुद्धां असेंच घडत असल्याचें माझ्या अनुभवास आलें आहे! आपण एखादें चित्र पहातों. आपली दृष्टि त्या मधील एक एक गोष्टीचें निरीक्षण करीत भिरभिर फिरते. जी गोष्ट आपल्याला जास्त आवडते, तीवर आपलें लक्ष जास्त केंद्रित होऊन रहातें, जिथें आपल्याला आकर्षण वाटत नाहीं, तेथें डोळे स्थिरावत नाहींत. या आपल्या डोळ्यांच्या हालचालींत एक प्रकारची लयबद्धता असते.





मी असासुद्धां अनुभव घेतला आहे प्रथम आपली दृष्टि चित्राच्या वरच्या बाजूला उजव्या किंवा डाव्या दिशेला जाते. आणि मग ती काल्पनिक वळणावळणानें फिरते. त्या चित्रांतील अत्यंत आकर्षक गोष्टी तिच्या डोळ्यांत भरतात. तिथें ती थोडा वेळ धुटमळते तेथून द्रुतगतीनें ज्या ठिकाणीं ती प्रथम गेली तेथें परत जाते. दृष्टीचा हा प्रवास सफाईदार वळणांच्या मार्गानें झाला तर एक प्रकारच्या सुखद संवेदना होतात व जिज्ञासा जागृत होते. त्यांतून लहरीवर लहरी निघतात व अशा रीतीनें तालबद्धतेचा तेथें जन्म होतो.

मी पूर्वी सांगितलेंच आहे कीं मधून मधून आवाज काढण्याची क्रिया तालबद्धतेला धरून केली तर आपल्या आनंदांत भर पडते. त्याचप्रमाणें चित्रांतील दृष्टीच्या हालचालीनें ज्या काल्पनिक रेखा उमटतात त्या जर सारख्या नि अनियमित नसल्या तर जी सुखद संवेदना निर्माण होते, ती पुढीलप्रमाणें वाढते.

अनुक्रमणिका

आपल्या सभोंवती जेवढे म्हणून आवाज आहेत त्या सर्वांमध्यें नादमाधुर्य आहे, फक्त आपल्याला त्यांची संवेदना मात्र झाली पाहिजे. आपण पहातों त्या प्रत्येक वस्तूमध्यें नादलहरी असतात. कलावंताला नादमाधुर्याच्या संवेदनेची जाणीव असल्यामुळें त्या स्थूल वस्तूमधील बराचसा श्लेष उकलून काढण्याकडे त्याची प्रवृत्ति असते. त्यामुळें त्याची दृष्टि स्वतःच्या कलाक्षम दृष्टिपथानें निर्माण केलेल्या तालबद्ध सुसंगत वलयाभोंवती फिरत राहते मग ती कलाकृति, छायाचित्र, कुंचल्यानें काढलेलें चित्र किंवा चलत्‌चित्रांतील एकादी रुपेरी पडद्यावर झळकलेली आकृति असो. कुसुम देशपांडेहिचें छाया चित्र घेऊन मी माझें म्हणणें स्पष्ट करण्याचा प्रयत्न करतों.

या छायाचित्राच्या बाजूला ज्या रेषा काढलेल्या आहेत त्यावरून हें स्पष्ट होईल, कीं आपली दृष्टि प्रथम वरच्या बाजूला डाव्या टोंकाला जाते. तेथून ती कपाळावर येते व तेथे मानेवरील आंबाड्यावर थोडा वेळ घुटमळते आणि साडीच्या किनारीच्या बाजूनें, उजव्या खांद्यावरील सॅटिन ब्लाऊझच्या प्रकाश-स्रोताच्या मार्गानें चित्राच्या तळाला येऊन पोंचते व तेथून छाया-पथाच्या कडेनें भालप्रदेशाच्या उच्च बिंदूकडे धाव घेते.

या ठिकाणीं पूर्वीच्याच मार्गानें जाण्याची पुनरावृत्ति करून कालांतरानें कंटाळवाणें वाटणारें लयमाधुर्य त्यांत निर्माण होत नाहीं. आपली दृष्टि भालप्रदेशाच्या कडेनें डाव्या कानाला जाते, तेथें थोडा वेळ स्थिर होते, नंतर जिवणीच्या बाजूनें हनुवटीवर येते, नाकाच्या शेंड्यावर जाते, तेथून कुंकवावर नंतर डाव्या भुंवईवरून व डाव्या डोळ्याला वळसा घालून वरच्या भालप्रदेशाच्या बाह्यरेषेला चाटून कपाळाच्या अगदीं वरच्या टोंकाला परत जाते. अशारीतीनें पहिलें वर्तुळ पुन्हा सुरू होते व ती लयसंवेदनेला चालना देते.

मला स्वतःला जो या बाबतींत अनुभव आला आहे तो वर दिला आहे. त्यापेक्षां निराळ्या प्रकारचा कुणाला आला असल्यास त्याचा अनुभव ऐकून घेऊन त्याच्याशीं चर्चा करण्याची माझी इच्छा आहे.

---

## संगम

माला गुंफू या ग
माला घालूं या
माला संगें देवाघरीं
चला जाऊं या ग ॥ माला ॥

सौंदर्याचे मळे झाले
आनंदाचे वारे आले
प्रेमरंगीं रंगूनीया ॥ माला ॥

तूं ग कोण मी ग कोण
देवाजीच्या ग आपण
बहीणी ग प्रेमाच्या या ॥ माला ॥

जीविताचे धागेदोरे
जाई जुई ग मोगरे
भावनांचे वेंचूनीया ॥ माला ॥

विश्वावरी पुष्परास
उधळिली ज्यानें खास
प्रीतिदेवा आळवाया ॥ माला ॥

मंद वायू सुटे गार
आंदोलनीं वर वर
गिरक्यांत चढूनिया ॥ माला ॥

—बा. सी. मर्ढेकर.




—पु. य. देशपांडे



पण मला अनेकवार प्रश्न पडतो तो असा कीं, ज्याला कोणत्याहि प्रकारच्या ऐहिक सुखोपभोगाची इच्छा उरलेली नाही, सत्ता संपत्ति इत्यादीं विषयींच्या वैयक्तिक स्वरूपाच्या कोणत्याच महत्वाकांक्षा ज्याच्या अंतर्यामांत बाकी उरलेल्या नाहींत, किंबहुना आशा—इच्छा-आकांक्षा यांच्या सर्व सीमा उल्लंघून जो खरा जीवन्मुक्त झालेला आहे, अशा महात्म्याला एकशेंपंचवीस वर्षें जिवंत राहण्याची इच्छा तरी कां होत राहावी ?

जेव्हां गांधीजींच्या या विस्मयकारक व अजब इच्छेकडे आम्हीं पाहूं लागतों, तेव्हां तर आमचें मन फारच बुचकळ्यांत पडतें. महायुद्धाच्या आगींतून निघून आसुरी साम्राज्यशाहीच्या व सर्वाधिकारशाहीच्या फोफाट्यांत शिरलेलें हें मानवी जग आम्हांला कित्येकदां इतकें किळसवाणें व कंटाळवाणें वाटूं लागतें कीं, सुबुद्ध समजल्या गेलेल्या मानवांची ही दुर्गति अखंड पाहत बसण्यापेक्षां दिवंगत होणें हें किती तरी बरें, असें आम्हाला म्हणावेसें वाटतें.

युरोपांतील बाल्कन्स राष्ट्रांतील व पूर्वेकडील सर्व दलित राष्ट्रांतील, तुकड्या तुकड्याकरतां तंटे करीत बसणारी आमची दोस्त-श्रेष्ठत्रयी व तिचे भालदार-चोपदार बनलेली इतर साम्राज्यवादी मंडळी यांच्या काळ्याकुट्ट कारवायांच्या वर्णनांनी वृत्तपत्रांचे रकानें रोज-भरलेले पाहून कोणत्या सहृदय व समंजस माणसाला मानवी जगाच्या सुखद भवितव्यासंबंधीं आशा वाटत राहील ?

पण अशाहि विपरीत परिस्थितींत आणखी पन्नास वर्षें जिवंत राहण्याची इच्छा बाळगणारे गांधीजींसारखे स्वार्थनिरपेक्ष व सुख-दुःखनिरपेक्ष महात्मे पाहिले, म्हणजे मनाला एक विचित्र धक्का बसतो. विचारांना उलटी गति मिळते. नैराश्याच्या काळोखांत आशेचे किरण दिसूं लागतात. जगण्यासारखें असें अजूनहि कांहीं तरी खास उरलें आहे, असा विश्वास वाटूं लागतो. प्रवृत्तीला पंख फुटूं लागतात. प्रयत्नांची दिशा दिसूं लागते. नव्या आशा, नव्या इच्छा, नव्या आकांक्षा मनांत पल्लवित होऊन नवें जग निर्माण करण्यासाठीं जीव भरारी मारूं लागतो.

या महायुद्धानें विज्ञानाची इतकी विटंबना करून टाकली आहे कीं, मानवतेला, मानवी प्रतिष्ठेला त्यांत आतां लवमात्र थारा उरलेला नाहीं. परमाणु-स्फोटकापेक्षांहि अधिकाधिक संहारक अस्त्रांची कधीहि न संपणारी श्रेणि आणि त्यांच्या जोरावर मूठभर सत्तापिसाटांची अखील मानवजातीवर अखंड चालणारी अमानुष सर्वाधिकारशाही, यापेक्षां दुसरी कोणतीहि परिणति आधुनिक विज्ञानांतून निष्पन्न होणें मला शक्य दिसत नाहीं.

आधुनिक विज्ञानमार्ग हा एक अत्यंत प्रभावशाली असा ज्ञानमार्ग आहे. सूक्ष्मतम अणूरेणूंच्याहि गाभ्यांत दडून बसलेली प्रचंड शक्ति संशोधून काढणाऱ्या असामान्य मानवी प्रतिभेपुढे माझें मस्तक विनम्र होतें. पण केवळ संशोधनापुरतेंच या प्रचंड निसर्ग-शक्तीचा विध्वंसक स्फोटकासाठीं उपयोग करणारे मानव पाहून मात्र आमच्या अंगावर शहारे उभे राहतात. या लोकांना 'मानव' कां म्हणावें हेंच मला समजत नाहीं. मन आहे तो मानव, असा जर 'मानव' या शब्दाचा अर्थ असेल, तर या लोकांना मानव म्हणणें म्हणजे या शब्दाची शुद्ध विटंबना करणें होय.

मन, मानव, मानवता—या शब्दांना आजच्या जगांत खरोखर कांहीं अर्थ तरी उरला आहे कां ?

म्हणून मानवी मनांत आमूलाग्र परिवर्तन घडून आल्याशिवाय 'नवे जग' निर्माण करतां येणें शक्य नाहीं. आणि अहिंसेचें सळसळतें चैतन्य नसांनसांतून संचार करूं लागल्याशिवाय मानवी मनांत क्रांतिकारक परिवर्तन घडून येणें शक्य नाही. ॲटम्-बॉंब अथवा तत्सम विध्वंस स्फोटकें मानवांवर फेकण्यासाठीं एकहि माणूस तयार न होणें, हीच अहिंसात्मक परिवर्तनाची परम सीमा होय.

मानवांना 'सुसंस्कृत मानव' म्हणून जगायचें असेल तर आंतरिक व आध्यात्मिक परिवर्तनाची ही परम सीमा त्याला गाठावीच लागेल. हिंदुस्थानापुरतें बोलावयाचें झाल्यास आज असें विश्वासानें म्हणतां येतें कीं, लवकरच अशी एक वेळ येईल कीं, ज्यावेळीं ब्रिटिशांना हिंदी जनतेवर आसुरी अस्त्रें चालविणारा एकहि माणूस या देशांत मिळणार नाहीं. हा दिवस जेव्हां उगवेल तोच आपल्या पूर्ण स्वातंत्र्याचा दिवस ठरेल !

अनुक्रमणिका









तसें पाहतां हें पहिलें पान; पण फक्त पानभर मजकूर आणि तोहि कसाबसा शेवटच्या फॉर्मवर जाऊं शकेल असें आमच्या फोरमननी आम्हाला प्रेमळपणें बजावल्यामुळें हा मजकूर शेवटच्या पानावर जात आहे.

'दीपावली' ची अस्फुट कल्पना दीड दोन महिन्यापूर्वी एका सु-संध्याकाळीं आम्हाला सुचली, पण ती अस्फुट कल्पना दीडदोन महिन्याच्या अवधींत इतक्या भरींव आणि आकर्षक स्वरुपांत अवतीर्ण होईल अशी खरोखर कल्पना नव्हती !

पण कित्येकदां जन्मजात आळशी आणि बेजबाबदार माणूस प्रसंग येतांच एखादा विलक्षण चमत्कार करून दाखवितो असें ऑस्कर वाइल्डनें कुठेंसें म्हटलें आहे ! तेंच खरें.

'दीपावली' काढायचें नक्की ठरलें, छपाईच्या मुहूर्ताचा नारळ फुटला, आणि आम्हीं छापखान्याच्या आखाडयांत उतरलो—पण पहिल्याच एका बडया लेखकाच्या सलामीची माती कपाळाला लागली न लागली तोंच आमचे पाय लटलटूं लागले—कारण,

एकदां मुद्रणयंत्रांत तुमचें पहिलें पान गेलें कीं शेवटचें पान छापून फेकीपर्यंत ते प्रचंड यंत्र विश्रांति घेत नाहीं !

मजकूर कुठें आहे ? 'दीपावलीच्या जाहीरनाम्यांत उद्घोषित झालेला मजकूर कुठें आहे ?' सिलेंडर मशीनची ही तालबद्ध ओरड, धडका आणि धडघडाट ऐकतांच आमच्या छातींत धस्स होई—आणि वाटे, कशाला या नसत्या उपद्यापांत पडलों !—आमचे थोर थोर लेखक ऐनवेळीं 'माफ करा बुवा, पुढल्या वर्षी मात्र अवश्य कांहीं तरी लिहीन' असा दीपावलीसाठीं शुभ संदेश पाठवून आमची मान तर उतरविणार नाहींत ना अशी शंका, भीति आणि धास्ती शेवटच्या पानापर्यंत आम्हाला वाटत होती ! परंतु तसें झालें नाहीं. उलट रसाळ वाङ्मयाच्या बात्रतींत अमृताशींही पैज मारणाऱ्या आजच्या नामवंत लेखकश्रेष्ठींनीं दिलेलें अभिवचन पाळलें आणि आम्हाला पुढच्या दीपावलीपर्यंत ऋणी करून ठेवलें आहे !

असो. नवभारत मुद्रणालयाचे श्री. रघुनाथराव आणि गणपतराव देसाई यांनीं दीपावलीच्या छपाईचे अवजड नि अवघड जूं मानेवर घेतले याबद्दल त्यांचे आभार मानतांना केसांतला कुठला टाईप वापरावा हें समजत नाहीं. तसेंच आमचे जुने स्नेही मौजेचे भागवत बंधू यांचें हार्दिक सहकार्य हेंच दीपावलीच्या आकर्षकतेला सर्वस्वी कारणीभूत झालें आहे. आमचे नवे प्रकाशक मित्र श्री. डी. जी. जोशी, २५५ सदाशिव पेठ, पुणे यांचें उपकार तर किरकोळ रुपये आणि पैशांच्या हिशेबांत मोजतां येईल असें वाटत नाहीं, इतकें तें अमोल आहे !

शेवटीं—

अर्जुनाचें सारथ्य श्रीकृष्णानें केलें म्हणून, गीता लिहून झाली; बी. पी. सामंत आणि कंपनीचे मालक पुरुषोत्तम सामंत हे आमच्या पाठीशीं होते आणि आहेत म्हणूनच ही 'दीपावली' आज मोठ्या अभिमानानें आणि थाटांत प्रकाशित होत आहे !

प्रभातचे बाबूराव पै, फेमस सिने लॅबोरेटरीजचे शिराजअल्ली शेट, व्ही. शांताराम, शेट वालचंद हिराचंद, डॉ. जयकर, दे. भ. शंकरराव देव, डॉ. शान्ता सहर्षि एफ्. आर सी. एस्., नवयुगचे कर्णधार बापूराव राजगुरू, नटश्रेष्ठ श्री. चिंतामणराव कोल्हटकर, डॉ. पट्टाभि सीतारामय्या, प्रो. धी. डी. सत्तेगिरि, कागदाचे सुप्रसिद्ध व्यापारी श्री. एस्. ए. वागळे व वाम्बे प्रोसेस स्टुडियोचे श्री. कामत प्रभृति थोरांनीं आशीर्वाद, अभिप्राय आणि अभिष्टचिंतन पाठविल्याबद्दल आम्ही त्यांचे अन्तःकरणपूर्वक आभार मानतो.

दीपावलीचे मुद्रक, प्रकाशक, लेखक, जाहिरातदार, असंख्य वाचक आणि हितचिंतक यांना ही दिवाळी सुखसमृद्धीची जावो !

—संपादक

## हिंदुस्थानचा प्रश्न ?



ब्रिटिश दृष्टिकोणांतून— लो.



हिंदी दृष्टिकोणांतून—

—दलाल

अनुक्रमणिका

## चुकीची दुरुस्ती

**पान** १३९–वरच्या महाराष्ट्र ग्रंथ भांडारच्या जाहिरातींत सुलभ–महाभारत ‘ १ ते ४ ’ ऐवजीं ‘ १ ते ४० क्रमशः प्रसिद्ध होणार ’ असें वाचावें.

**पान** १५१—हिन्दी वस्त्र भांडारची जाहिरातींत ‘हिन्दी’ ऐवजी ‘ **हिन्द वस्त्र भांडार,** ’ **विरार** असें वाचणें.

**पान** १६९—या पानांवर सुप्रसिद्ध लघुकथालेखक य. गो. जोशी यांची नाट्यकथा संपते. तळटीपेंत ‘ तोंड मिटून जांभई देणें याला सभ्यपणा म्हणतात. ’ या ओळी ऐवजीं ‘ वाहती गंगा या संपूर्ण नाटकांतला हा पहिला अंक आहे, ’ असें वाचावें.

## चित्रसृष्टीच्या आघाडीवर

**नामदार सर सुलतान अहमद, ना. व्हाईसरायांच्या एक्झिक्युटिव्ह कौन्सिलचे सभासद, यांची फेमस सिने लेबोरेटरी ॲण्ड स्टुडिओजच्या महालक्ष्मी (मुंबई) येथील नवीन जागेस भेट.**

शेट शिराजअली हकीम

ना. सर सुलतान अहमद हे गेल्या आठवड्यांत हैद्राबादहून मुंबईस आले. ते आल्यानंतर स्टेशनवर फेमस सिने लबोरेटरीचे मालक शेट शिराजअली हकीम व इनफर्मेशन फिल्म्स् ऑफ इंडियाचे ॲडमिनिस्ट्रेटिव्ह ऑफिसर मि. इ. एच. के. सेन यांनीं त्यांचें स्वागत केलें.

सध्यां हेन्स रोड, महालक्ष्मी येथें बांधकाम चालू असलेल्या फेमस सिने लेबोरेटरी ॲन्ड स्टुडिओजच्या नवीन जागेला ना. सर सुलतान अहमद यांनीं भेट दिली. त्यांनीं त्या कामाबद्दल अत्यंत कळकळ दाखविली. शेट. शिराजअली यांची महत्वाकांक्षी योजना पाहून त्यांच्या मनावर फारच अनुलक्षणीय परिणाम झाला.

फेमस-सिने लॅबोरेटरीच्या या नवीन जागेमधें इन्फर्मेशन फिल्म्स ऑफ इंडिया व दि इंडियन न्यूज परेड या गव्हर्नमेंट ऑफ इंडियाच्या इनफर्मेशन ॲन्ड ब्राडकास्टिंग खात्याच्या संस्थांचा समावेश करण्यांत येणार आहे. या नवीन दोन्ही जागेचें बांधीव क्षेत्रफळ १, १०, ००० चौरस फूट असून त्यामध्यें अद्यावत पद्धतीची संपूर्ण साधनांनीं युक्त अशी आटोमेटिक् डेव्हलपिंग सिने लेबोरेटरी, सात डेमान्स्ट्रेशन थिएटर्स व एक संपूर्ण एअर कंडिशन्ड स्टुडियो, शिवाय विश्रांतीची व मेकपच्या खोल्या, यांचा अंतर्भाव करण्यांत आलेला आहे.

★

बाजूच्या ग्रुपफोटोंत डावीकडून उजवीकडे: शेट शिराजअली हकीम, मि. हशम, पब्लिक रिलेशन ऑफिसर, इनफर्मेशन् फिल्म्स् ऑफ इंडिया, ना. सर सुलतान अहमद, मि. ई. एच्. के. सेन ॲडमिनिस्ट्रेटिव्ह ऑफिसर, इनफर्मेशन फिल्म्स् ऑफ इंडिया, व मि. आर. सी. एम्. नानावटी, मॅनेजर, फेमस सिने लेबोरेटरी.

अनुक्रमणिका

